


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२७७२

अंक १, २, ३, ४

संपादक — प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग

वर्ष १६वे अंक १ला (६५) जानेवारी १९४३
वर्ष १६वे अंक २रा (६६) एप्रिल १९४३
वर्ष १६वे अंक ३रा (६७) जुलै १९४३
वर्ष १६वे अंक ४था (६८) ऑक्टोबर १९४३

अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-सा[illegible]का

[त्रै [illegible]

२५

संपादक-- प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग
एम्.ए.

पौष १८६४

वर्ष १६ वें ]    जानेवारी १९४३    [ अंक १ ला

[illegible] व्याख्यानमाला

आधुनिक मराठी [illegible] काळ इ. स. १८००-१८६७

[illegible] कांही विषय

१ अिंग्रजी अंमलापूर्वी [illegible] २ सदाशिव काशीनाथ छत्रे (अिंग्रजीचीं मराठी भाषांतरें), ३ प्रा. बाळशास्त्री [illegible] पंडित (संशोधनाची सुरुवात- मासिकाचा पहिला संपादक), ४ गोविंद [illegible] (स्वतंत्र ग्रंथ व निबंधकार), ५ दादोबा पांडुरंग व अितर व्याकरणकार, ६ [illegible], ७ शालोपयोगी व बालवाङ्मय, ८ स्वतंत्र कथात्मक व नाट्यवाङ्मय, ९ [illegible] मराठी [illegible] संस्कृत ग्रंथांचें मराठीकरण, ११ मराठी खिस्ती वाङ्मय, १२ [illegible] सामाजिक सुधारणेच्या आंदोलनांतून निपजलेलें वाङ्मय, १४ [illegible] प्रकाशन, १५ मुद्रणालयें, १६ लावण्या व पोवाडे, १७ [illegible].

## सभासदांस विनंती

सभासदांकडून यावयाच्या बाकी वर्गणीचा तपशील या अंकासोबत विण्यांत येत आहे. सभासदांनी आपली वर्गणी कृपेने सत्वर पाठवावी. मार्चअ पावेतो वर्गणीची वाट पाहून अेप्रिलचा अंक व्ही. पी. ने रवाना करावा लागेल अिकडे सभासदांनी अगत्य लक्ष पुरवावें.

चिटणीस

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १६ वें ] **अनुक्रमणिका** [ अंक १ ला

(अंक ६५)



यांशिवाय रद्दींतील रत्नें (श्री. चिं. य. कर्वे), स्त्रियांच्या म्हणी (श्री. नी. शं. नवरे) अित्यादि

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

## करूं या नवीं जगें निर्माण

करूं या नवीं जगें निर्माण ॥ध्रु०॥

होऊं प्रलयंकर शिवशंकर
उघडूं तिसरा नेत्र सर्वहर
भुवनांचे मुळिंही स्थिर जर्जर
नुरवूं नामनिशाण १

करुं सुररजतगृहें खालसा
आणि त्यांसवें निरय नाहिसा
तळीं वरलीं भयें सर्वशः
करूं भस्म सत्राण २

आरंभूं जनमेजय होउनि
सर्पसत्र दास्याचें भुवनीं
मंत्रघोष करुं अेक गर्जुनी
मानव सर्व समान ३

'पय स्तनीं आसवें लोचनीं'
ही अबलेची करुण कहाणी
असे घडविली ज्या सबलांनी
दावुं तया निर्वाण ४

दैन्य देखुनी मानवतेला
जयें निर्मिलें वैषम्याला
चढवूं त्यांच्यावरती हल्ला
आणि करूं शिर्काण ५

रूढ श्रद्धा, धर्म, संस्कृति
पाडूं जाळुन यांची माती
चेतवून विज्ञानज्योति
सोन्याचें परिमाण ६

नियतीचीं तडकवूं कपाळें
उखडुं दयेचीं पाळेंमूळें
बनवूं बंडच जीवन सगळें
आणि करूं गतिमान ७

जीर्ण जगाच्या विध्वंसांतुन
जग तें उभवूंया चिरनूतन
प्रेम-सौख्य-सौन्दर्य-सनातन
केवल वसतिस्थान ८

—वसंत वैद्य

अनुक्रमणिका



# श्रीज्ञानेश्वरांचा अेक प्रगूढ ग्रंथ

(लेखक—श्री. अ. का. प्रियोळकर)

तीनचार वर्षांमागे गोमंतकांत जुन्या मराठी हस्तलिखित ग्रंथांचा शोध करीत असतां रा. व्यंकटेश शां. दळवी (मुक्काम पाळी) या आमच्या अेका आप्ताच्या संग्रहामध्ये मला ज्ञानेश्वरांच्या योगवासिष्ठाचें अेक जुनें हस्तलिखित सांपडलें. कांही वर्षांपूर्वी कै. चांदोरकरांनी असाच अेक मराठी योगवासिष्ठ प्रसिद्ध केला होता, परंतु तो आमच्या ज्ञानेश्वरमहाराजांचा नाही, अशा प्रकारचे अुल्लेख वाचल्यामुळे तो ग्रंथ मिळवून वाचण्याच्या भरीस मी पडलोंच नाहीं. मला सांपडलेलें हस्तलिखित वाचून तें ज्ञानेश्वरीकर्त्यांचेंच असावें असें मला वाटलें; तेव्हा माझ्याजवळचें हस्तलिखित व चांदोरकरांनी प्रसिद्ध केलेला ग्रंथ अेकच कीं काय हें पाहण्याकरिता मीं चांदोरकरांची प्रत मिळविली व हे दोनहि ग्रंथ वाचून पाहतां बरेच पाठभेद वगळले तर ते अेकच आहेत, असें माझ्या नजरेस आलें. पांगारकरांनी आपल्या मराठी वाङ्मयाच्या अितिहासांत (खंड १, पृ. ५२०) हा "मानभावी ग्रंथ असून ज्ञानेश्वरांचा नाहीं" असें लिहिलेलें वाचलें होतें. त्यांना पत्र पाठविलें असतां समाधानकारक अुत्तर आलें नाही. धुळ्याचे रा. शंकरराव देव यांना विचारतां, "रा. पांगारकरांचीं कारणें ठाअूक नाहींत. मला केवळ भाषेमुळें शंका आली व येते" असें त्यांनी कळविलें (१४-१-४०). पुढे रा. यशवंत खुशाल देशपांडे यांनी श्रीज्ञानेश्वरदर्शन (भा. १ ला) या ग्रंथांत "श्रीज्ञानेश्वर आणि महानुभाव" या मथळ्याखाली जो सुंदर व माहितीपूर्ण लेख लिहिला आहे, त्यांत या प्रश्नाचा त्यांनी शोधपूर्वक विचार करून हा ग्रंथ श्रीज्ञानेश्वरांचाच असावा, असें मत प्रदर्शित केलेलें आढळलें. त्यांच्या या लेखावरून चांदोरकरांनी हा ग्रंथ प्रसिद्ध केल्याबरोबर त्याच्यावर जी चर्चा झाली तिची चांगलीच माहिती मिळते. चांदोरकरांनाहि योगवासिष्ठाची मूळ हस्तलिखित प्रत सासवड येथील सोपानदेवाच्या सांप्रदायिक मठांत सांपडली होती, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. १९१४ सालीं मुमुक्षु व केसरी या पत्रांत या विषयाची चर्चा झाली. या पत्रांच्या जुन्या फायली अिकडे मला अुपलब्ध नाहीत. त्यामुळे रा. देशपांड्यांच्या लेखावरच मला माहितीकरिता अवलंबून राहणें प्राप्त आहे. हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्याबरोबर मुमुक्षूच्या ता. १६-७-१४ च्या अंकांत विष्णुबुवा जोग, पांगारकर व गुलाबराव महाराज या तिघां वारकरी पंथाच्या अग्रणींनी हा ग्रंथ ज्ञानेश्वरमहाराजांचा नव्हे, असें मत प्रसिद्ध केलें. त्यावर वा. ग. परांजपे यांनी केसरींत (ता. २१-७-१४) व गोविंदसुत (प. गो. चिंचाळकर) यांनी मुमुक्षूंत (३०-७-१४) त्यांना अुत्तरें देअून हा ग्रंथ ज्ञानेश्वरमहाराजांचा कां नाही, असा प्रश्न विचारला. यावर गुलाबरावमहाराज यांनी ता. २-८-१४ च्या मुमुक्षूमध्ये प्रत्युत्तरें दिलीं. पांगारकरांच्या मतें "या ग्रंथांत ज्ञानोबाराय कोठें दिसत नाहींत. त्यांचा ग्रंथ असल्यास त्यांचा म्हणूनच त्याची किंमत मोठी होअील." गुलाबराव म्हणतात, हा ग्रंथ "मानभावांचा आहे. त्यांचा नसून तातांचा (श्रीज्ञानेश्वरांचा) असला तरी आमच्या (वेदांती अथवा वारकरी) करितां केलेला नाहीं." विष्णुबुवा जोग लिहितात, "हा ग्रंथ महाराजांचाच असावा असा बनावट पुरावा केला आहे. हें तोतयाचें बंड आहे." दुसरे अेक वारकरी

विद्वान प्रो. शं. वा. दांडेकर हे आपल्या ज्ञानेश्वरावरील लघु ग्रंथांत म्हणतात, "ज्ञानेश्वरांनीं योगवासिष्ठावर टीका केली हें खरें आहे. परंतु 'आपल्या'समोर असलेलें योगवासिष्ठ तें नव्हे हें निर्विवाद आहे." विविधज्ञानविस्तारांतहि (पुस्तक ४५–साहित्यपत्रिका पृ. १२७) रा. अनंत नारायण पंडित या गृहस्थांनी केसरींतील रा. परांजपे व गोविंदसुत यांच्याप्रमाणे हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा असावा, असा अभिप्राय प्रकट केला आहे.

हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नाही असें म्हणणाऱ्यांच्या मताचा जो विचार रा. देशपांडे यांनी श्रीज्ञानेश्वरदर्शनांतील आपल्या अुपरिनिर्दिष्ट लेखांत केलेला आहे तो मला मार्मिक, प्रत्ययोत्पादक व समाधानकारक वाटला, व या विषयावर जास्त लिहिण्याची मला आवश्यकता वाटली नाही. यांत त्यांनी हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा असावा असा भाव प्रकट केला आहे. परंतु अलीकडे प्रो. डॉ. शं. दा. पेंडसे यांनी ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान या विषयावर जो विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहिला आहे त्यांत रा. देशपांड्यांच्या लेखाने आपली निराशा झाल्याचें मत व्यक्त करून "हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नव्हे असें म्हणणाऱ्या विद्वानांनी आतांपर्यंत जीं कारणें सांगितलेलीं आहेत त्यांशिवाय जीं कारणें आढळलीं" तीं नमूद केलेलीं आहेत. त्यांचा विचार करण्यापूर्वी हा ज्ञानेश्वरांचा कां वाटतो यासंबंधी अगदीच नवीन वाचकांकारिता दोन शब्द सांगतोः—

(१) ज्ञानेश्वरीचा कर्ता व योगवासिष्ठाचा कर्ता यांचें नांव, पितृनाम व गुरुपरंपरा अेकच आहेत.

(२) समान शब्द, समान कल्पना व सारखेच चरण दोनहि काव्यांत आढळतात.

(३) योगवासिष्ठकार ज्ञानदेवाने गीतेवर टीका केल्याचा याच ग्रंथांत अुल्लेख आहेः— जैं तुंवा गीता केली मऱ्हाटी। जैं स्तुति केली अुमेटी॥ तैंचि तूज कृपादृष्टी। अवलोकिलें ॥३४॥ —प्रकरण १ लें.

(४) ज्ञानेश्वरमहाराजांनी योगवासिष्ठ लिहिलें आहे याबद्दल अितर कवींच्या ग्रंथांत अुल्लेख सांपडतात—

(१) विसोबा खेचर—

भगवद्गीतेवरी टीका। केली भावार्थदीपिका।
अमृत-अनुभव करुनि निका। योगवासिष्ट स्वात्मपम॥

(२) नामदेव—

वसिष्टगीतेची टीका। ग्रंथ रचिला नेटका।
भावार्थ काढिला श्लोका। ग्रंथरचना दाविली॥

(३) महिपति—

योगवासिष्ट अमृतानुभव पूर्ण। श्रीज्ञानेश्वर बोलिले वचन।
त्याही ग्रंथाचें करुनि मनन। अर्थ शोधून ठेविला॥

योगवासिष्ठ हें ज्ञानेश्वराचें नाही असें त्या ग्रंथाच्या भाषेमुळे आपणांस वाटतें, असें रा. देव यांनी मला पत्रद्वारें कळविल्याचें वर लिहिलेंच आहे. चादोरकरांच्या योगवासिष्ठाच्या प्रतीची भाषा अेकनाथपूर्वकालीन मराठीच्या स्वरूपांत आहे. आधुनिकीकरण झालेल्या अेकनाथोत्तर ज्ञानेश्वरीच्या प्रती ज्यांच्या वाचनांत असतील त्यांना या योगवासिष्ठाची भाषा ज्ञाने-

श्वरीहून निराळी व महानुभावांच्या ग्रंथांच्या भाषेसारखी वाटणें स्वाभाविक आहे. कारण महानुभावियांच्या वाङ्मयामध्ये आपणांस ज्ञानेश्वरकालीन भाषेचें स्वरूप संरक्षिलेलें सांपडतें. परंतु राजवाड्यांची ज्ञानेश्वरी किंवा चोभ्यांचें अुपाहरण हे ग्रंथ ज्यांनी वाचले आहेत त्यांना तरी हा ग्रंथ भाषेमुळे महानुभावांचा वाटण्याचें कारण नाही.

प्रस्तुत योगवासिष्ठाच्या तिसऱ्या प्रकरणांत महानुभाव असा शब्द आला आहे— परिसेंसि लोहा जाली भेटी । नुरेचि लोहपणाची गोष्टी । तैसी जयांची कृपादृष्टी । ते महानुभाव ॥३९॥ यावरून हा ग्रंथाचें कर्तृत्व महानुभावियांकडे दिलें जातें कीं काय, अशीहि मला अेक शंका आली होती. परंतु असा शब्द ज्ञानेश्वरीमध्येहि आहे—अैसे जे महानुभाव । जे दैविये प्रकृतीचे दैव ॥—अ. ९, १९३ फार काय पण खुद्द योगवासिष्ठामध्येहि तो शब्द आढळतो— महानुभावसंपर्कात् संसारार्णवलंघने । युक्तिः संप्राप्यते राम दृढा नौरिव नाविकात् ॥ टीकेमध्ये 'महानुभावस्य' म्हणजे 'ब्रह्मज्ञस्य गुरोः' असा अर्थ दिला आहे. तेव्हा ही शंका व्यर्थच म्हणावी लागते.

ज्ञानेश्वरीमध्ये जो ज्ञानेश्वरांच्या काव्यकल्पनेचा किंवा शब्दचातुर्याचा विलास दृष्टीस पडतो तसा किंवा तितका योगवासिष्ठामध्ये नाही ही गोष्ट खरीच आहे. पण असें होणें अस्वाभाविक नाही. कारण सातशे श्लोकांच्या गीतेवर जवळ जवळ नअू हजार ओव्यांची ज्ञानेश्वरी ही मराठी टीका आहे. तर बत्तीस हजार श्लोकसंख्येच्या मूळ योगवासिष्ठाचा ११२३ ओव्यांत हा मराठी संसार आहे ! अशा स्थितींत या दोन ग्रंथांची तुलना कशी करतां येअील ? "अमृतातेंही पैजा जिंके । अैसीं रसिकें अुत्तरें मेळवीन" अशी पैज मारून अैन अुमेदींत ज्ञानेश्वरांनी गीतेवर टीका लिहिली व त्याप्रमाणे तो ग्रंथ सरस अुतरलाहि. तत्त्वज्ञानासारखे गंभीर विषयहि देशी भाषेमध्ये मांडतां येतात याची जगाला त्यांनी खात्री पटविली. परंतु या ग्रंथाचें प्रचंडत्व त्याच्या प्रसाराच्या आड येतें ही गोष्ट ज्ञानेश्वरांच्या लक्षांत आली असली पाहिजे. त्या काळीं पंडित लोक प्राकृत भाषेंत ग्रंथलेखन करण्याच्या विरुद्ध होते. सर्वसाधारण लोकसमाज निरक्षर होता. तेव्हा अशा अवाढव्य ग्रंथाच्या नकला करतो कोण व अशा स्थितींत त्याचा प्रसार व्हावा तरी कसा ? या अडचणीमुळे हा ग्रंथराज लुप्त होण्याच्या मार्गाला लागला होता. परंतु अेकनाथाने 'संस्कृत काय देवें केली । आणि प्राकृत चोरापासोनी आली ?' असा टाहो फोडून ज्या वेळीं देशी भाषेमध्ये नवें चैतन्य ओतलें त्या वेळीं त्यांच्याच प्रयत्नाने ज्ञानेश्वरीचा पुनरुद्धार झालेला दिसतो. ज्ञानेश्वरीच्या बाबतींत आलेल्या अनुभवाचा पुढच्या ग्रंथांत ज्ञानदेवांनी अुपयोग केलेला असावा. प्रस्तुत योगवासिष्ठाच्या पहिल्या अध्यायाच्या ३६६ ओव्या आहेत. शेवटच्या ओवींत "तवं गुरु म्हणती पारु । **बोलतां ग्रंथ घेतसे पसरु**" असे अुद्गार आहेत. दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं तर "मिं बोलतसें श्लोकार्थु । **ग्रंथ असे पसरु घेतु** । जरि बोलें संकळितार्थु । तरी ग्रंथु टाकैल ॥७६॥" असें म्हणून केवळ ८३ ओव्यांतच आटोपतें घेतलेलें आहे !

ज्याप्रमाणे ग्रंथाचा पसारा जास्त वाढूं नये म्हणून ज्ञानेश्वरांनी काळजी घेतली आहे, त्याप्रमाणे तो सर्वसाधारण लोकांना सहज रुचावा व पचावा अशा प्रकारची, जिला आपण अिंग्रजीमध्ये popular म्हणतों, अशी लोकप्रिय मांडणी करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. ग्रंथाच्या आरंभीं कवि विघ्नेश्वराची प्रार्थना करतो व गजानन प्रसन्न होअून म्हणतो, "तूं गीतेवर टीका लिहितांना जी माझी स्तुति केलीस तेव्हाच तूं माझ्या कृपेस पात्र

झाला आहेस. आता हे आर्या, तूं ब्रह्मतनया जी शारदा तिला नमस्कार कर". अशा प्रकारें मोठा ड्रामाटिक प्रस्ताव केला आहे. तसेंच विषय व विवेचनहि सर्वसामान्य लोकांच्या चित्ताची पकड घेअील व त्यांना सुलभ होअील अशी काळजी घेतलेली आहे. मराठी भाषेची स्तुति व ग्रंथाचें महत्त्व श्रोत्यांच्या गळीं अुतरविण्यासारखी भाषा ठिकठिकाणीं योजिली आहे. ज्ञानेश्वरांच्या काळीं गंभीर व भारदस्त विषयांच्या श्रोत्यांना किती वाण असावी, याची कल्पना सध्यांच्या परिस्थितीवरूनहि करतां येण्यासारखी आहे. ज्ञानेश्वरीमध्ये यासंबंधीं अुल्लेख आहेत—

वक्तृत्वा अवधानाचा होय चारा। अ. ९, २६
आहो चंद्रकांतु द्रवता किर होये। परि ते ज्ञानवटी चंद्रें कीं आहे।
म्हणोनि वक्ताचि वक्ता न्हवे। श्रोतेनि विणे ॥ अ. ९, २९.

हीच ओवी जशाची तशी योगवासिष्ठाच्या पहिल्या अध्यायांत असून शिवाय,

श्रोते जनां नमस्कारु। तुम्ही सर्व सुखाचा सागरु।
तुमचा होये कृपाकरु। तरि ग्रंथासी रूप ॥ ७
भरला पदार्थी अनेकां। वक्ता चतुर जाला निका।
परि श्रोतेनवीण वक्ता। चतुरु केवि ? ॥
तांथुवेविण प्रकारु। केवि होय मुक्तांचा हारु।
तैसा श्रोतेयाविण टीकाकारु। श्लाघ्यु कैसा ? ॥
... ... ... ... ... ... ...
तुम्ही अवळोकाल प्रियता। तरि ग्रंथु घेईल मान्यता।
मज दुर्बळासी म्हणतील ज्ञाता। योगज्ञानी ॥

अशी पुष्कळच श्रोत्यांची मनधरणी केली आहे. यावरून ज्ञानेश्वरीपेक्षा या नव्या ग्रंथाचा कल सर्वसामान्य लोकांचा लक्षवेध करण्यासारखा कां आहे तें कळून येअील. लहान मुलाला कळावें म्हणून आअी त्याच्यासारख्या बोबड्या भाषेंत त्याच्याशीं बोलते म्हणून का तिला नीट बोलतां येत नाही असें समजणार? त्याची समजूत घालावयाला त्याच्याच कलांत घ्यावें लागतें. दक्षिण हिंदुस्थानांतील हिंदूंच्या खिस्तीकरणासंबंधी लिहितांना सेंट फ्रान्सिस झेवियर ता. ३१ डिसें. १५४३ सालीं कोचीनहून रोममधील जेजूअिट सोसायटीला लिहिलेल्या अेका पत्रांत म्हणतो, "God put into my mouth arguments of such a sort, and so suited to their ways of thinking, that to their great joy I was able to prove to them the immortality of soul. *I find, by the way, that the arguments which are to convince these ignorant people must by no means be subtle such as those which are found in the books of learned schoolmen, but must be such as their minds can understand.*"

आता प्रो. पेंडसे यांच्या नव्या आक्षेपांचा क्रमशः विचार करूं:—

(१) भिंगारकर नांवाच्या गृहस्थांनी खि. स. १८८६ सालीं अेक ज्ञानेश्वरचरित्र लिहिलेलें असून त्यांत योगवासिष्ठांतील आरंभींच्या म्हणून दहा ओव्या दिल्या आहेत त्या चांदोरकरांच्या प्रतींतील आरंभींच्या ओव्यांहून निराळ्या आहेत, असा प्रो. पेंडश्यांचा पहिला आक्षेप आहे. भिंगारकरबुवांनी उद्धृत केलेल्या या ओव्या भाषा किंवा रचना यांच्या बाबतींत

त्या थेट ज्ञानेश्वरांच्या ओव्यांसारख्या आहेत असें म्हणतां येण्यासारख्या नाहीत. भिंगारकर-बुवांचा हा मूळ योगवासिष्ठ सबंध स्वरूपांत पुढे येऊन तो प्रस्तुत चांदोरकरांच्या प्रतीशीं तुलना करतां अस्सल ठरेल तर तो मान्य करतां येईल. परंतु तसें होईपर्यंत प्रस्तुत प्रत कशी खोटी म्हणतां येईल ?

(२) चांदोरकरांनी दिलेली ओवीसंख्या चुकली व रा. देशपांडेहि ती खरी धरून चालले (डॉ. पेंडसे यांचीहि बेरीज अगदी बरोबर आहे असें दिसत नाही !) हा मुद्याचा प्रश्न नाही. परंतु पहिल्याच अध्यायाला जास्त ओव्या खर्चून पुढील अध्यायांना कमी कां व "विषयांची निवड करण्यांत ज्ञानेश्वरीसारखें कौशल्य किंवा गांभीर्यहि कां नाही" या आक्षेपाचें उत्तर वरील विवेचनांत मिळेल.

(३) ज्ञानेश्वरींतील नमनापेक्षा योगवासिष्ठांतील नमनाचा प्रकार निराळा कां, यांचेंहि विवेचन मीं केलेलेंच आहे.

(४ व ५) योगवासिष्ठांची भाषा व रचना ज्ञानेश्वरीच्या ओव्यांपेक्षा निराळी असून रामदासकालीन व रामदासी थाटाची आहे; म्हणजे हा ग्रंथ रामदासांनंतर कोणी तरी बनावट तयार केला असेंच प्रो. पेंडसे यांना म्हणावयाचें आहे असें दिसतें. वास्तविक या ग्रंथांतील व्याकरणाचीं रूपें एकनाथपूर्वकालीन म्हणजे राजवाड्यांची ज्ञानेश्वरी, चौंभ्यांचें उपाहरण किंवा महानुभावांचें जुनें वाङ्मय यांच्यांतील रूपांसारखीं आहेत. परंतु या अन्तर्गत पुराव्यापेक्षा हा ग्रंथ रामदासांच्या पूर्वकालीन आहे याबद्दल भरपूर बहिर्गत पुरावा पुढे करतां येण्यासारखा आहे. तो असाः—

फादर थोमस स्टिफन्स यांचा ख्रिस्तपुराण नामक जो सुप्रसिद्ध ग्रंथ आहे त्यांत मराठी भाषेची जी स्तुति आहे ती वस्तुतः प्रस्तुत योगवासिष्ठांतील मराठी भाषेच्या स्तुतीवरूनच अल्प बदल करून घेतलेली आहे. पाहाः—

**योगवासिष्ठ** (प्रकरण १ लें)—

जैसी दिपांमाजि दिवटी । की तीर्थीमाजि पौर्णिमा गोमटी । तैसी भाषा मराठी । सर्वोत्तम ॥ २९६ ॥ जैसी सरितांमाजी गोदावरी । कीं पर्वतांमध्ये रत्नागिरी । तैसी भाषांमाजि साजिरी । मऱ्हाष्टी पैं ॥ २९७ ॥ हरळांमाजी रत्नकिळ । कीं पुष्पांमध्यें कमळ । तैसी भाषांमध्यें सोज्वळ । बोली मऱ्हाटी शोभिवंत ॥ २९८ ॥ जैसी दुर्गावरी शोभे चरी । कीं मुक्ता शोभते लहरी । तैसी शोभे भाषांमाजारी । मऱ्हाष्टी पैं ॥ ३०० ॥ तीर्थांमध्यें काशी । की व्रतांमाजि अेकादशी । भाषांमध्यें तैसी । मऱ्हाष्टी पैं ॥ ३०१ ॥ परिमळांमध्यें कस्तुरी । कीं गोडियेमध्यें साकरेची थोरी । तैसी मऱ्हाटी बैसवी मंदिरीं । अज्ञानाशाचां ॥ ३०२ ॥

**ख्रिस्तपुराण**— (पुराण १ लें, अवस्वर १ ला)—

जैसी हरळांमाजी रत्नकिळा । कीं रत्नामाजि हिरा निळा । तैसी भासांमाजी चोखाळ । भासा मराठी ॥ १२२ ॥ जैसी पुष्पांमाजी पुष्प मोगरी । कीं परिमळांमाजी कस्तुरी । तैसी भासांमाजी साजिरी । मराठिया ॥ १२३ ॥ पखियांमधें मयोरु । रुखियांमधें कल्पतरू । भासांमधें मान थोरु । मराठियेसी ॥ १२४ ॥ तारामधें बारा राशी । सप्तवारांमधें रवि ससि । यां दिपिचेयां भासांमधें तैसी । बोली मराठीया ॥ १२५ ॥

स्टिफन्सचें खिस्तपुराण अि. स. १६१४ सालीं समाप्त झालें, असें त्या ग्रंथांतील शेवटच्या ओवींत म्हटलेंच आहे. रामदासांचा जन्म शके १५३० (अि. स. १६०८)मध्ये झाला. म्हणजे खिस्तपुराणांच्या अगोदर सहाच वर्षे समर्थ जन्मले. यावरून प्रस्तुत योगवासिष्ठ हा रामदासपूर्व आहे हें स्पष्टच दिसून येअील. कदाचित् ही स्तुति योगवासिष्ठकाराने स्टिफन्सच्या पुराणावरून घेतली असेल अशीहि अेक शंका घेतां येण्यासारखी आहे. तिचेंहि निराकरण करतां येतें. स्टिफन्सच्या नंतर जो गोमंतकांत मराठी भाषेचा पुराणकार होऊन गेला त्या फादर अेतियेन द ला क्रूवा (१५७९–१६४३) या फ्रेन्च पाद्रीने आपल्या सेंट पीटरवरील पुराणांत (१६२९) प्रस्तुत योगवासिष्ठ ग्रंथाचा अुल्लेख केलेला आहे. या पुराणांत तो म्हणतो,

अितुकें न बोलतों व्यर्थी। लिहिलें आहे वसिष्टग्रंथीं। तें पाहें पां कवणे रिती। दत्त चित देअुनी ॥ ३२ ॥ म्हणे अितुकी वसिष्ठ ऋषिचीं बोली। मियां संस्कृताची मराठी केली॥ अुधरावेया केवळी। बहुतां लोकार्थे ॥ ३३ ॥ —पुराण २ रें, कांड ५, अवस्वर २.

वरील ३३ वी ओवी तर प्रस्तुत योगवासिष्ठांतून जशीच्या तशी अुद्धृत केली आहे. (प्र. १, अ. ९३) अितकेंच नव्हे तर प्रस्तुत योगवासिष्ठाच्या सहाव्या प्रकरणांत, देअूं आदरिलें अिच्छाभोजन। तेथ अुठिलेंचि असें विघ्न ॥ बळीं करूं आदरिलें दान। तो पाडिला पाताळीं। अशी जी ओवी आहे, (नं. २३) तीहि पाद्री क्रूवाच्या पीटरपुराणांत आढळते.

"विष्णु ठकु असत्यवादी आणि विविधां गुणीं नष्टु देखोनी देव नव्हे" असें सिद्ध करतांना तो म्हणतो,

वसिष्ठ ऋपीचा ग्रंथु। बोलिल्याची आहे साक्षी देंतू॥ तुमी ऐका त्याची मातु। कर्ण अुगते (अुघडे) करोनी ॥ ५१ ॥ म्हणें देवों आदरिलें अिच्छाभोजन। तेथ अुठविलें अैसें विघ्न ॥ बळीं करूं आदरिलें दान। तो पाडिला पाताळीं ॥ ५२ ॥

माझ्या मतें हा ग्रंथ गोव्यांत धर्मच्छळाची सुरुवात होण्यापूर्वीच तेथे आलेला असावा. गोवा बेटांत या छळाचा आरंभ १५४१ सालीं झाला. या वेळीं पोर्तुगीजांनी हिंदु देवतांच्या मूर्ति फोडल्या, देवळें अुध्वस्त केलीं व देशी भाषांतील ग्रंथ हिंदुधर्माचे असतील या वहिमाने जाळून टाकण्यांत आले. यांतून जे ग्रंथ राहिले तेहि गोळा करण्याचें काम धर्मांध खिस्ती पाद्र्यांकडून जोराने चाललें होतें. ता. २८ नवंबर १५४८चें बिशप दों फ्रांसिस्क जुवांव द आल्वकेर्क याने पोर्तुगालच्या राजेसाहेबाना पाठविलेलें अेक पत्र अुपलब्ध आहे. त्यांत मूर्तिपूजेचें अुचाटन करण्याकरिता आपण हिंदु लोकांचे देशी भाषांतील ग्रंथ आस्थापूर्वक गोळा करीत फिरत असल्याचें नमूद केलें आहे. १५६० सालीं गोव्यामध्ये अिन्क्विझिशन या भयंकर न्यायसभेची स्थापना झाली. या अिन्क्विझिशनच्या कोडाच्या १६४० सालच्या आवृत्तीमध्ये कोणत्या लोकांवर खटले भरावेत याची जी यादी दिली आहे तिच्यामध्ये "जे लोक निषिद्ध ग्रंथ जवळ बाळगितात किंवा वाचतात. (Contra as que tem e lem livros defesos. Folio12) असे लोक असा मजकूर आढळतो. अशा परिस्थितींत हिंदु लोकांनी आपले ग्रंथ मोठ्या कष्टाने जवळ राखिले असावेत. परंतु त्यांच्यावरहि बाटग्या लोकांना हाताशीं धरून पोर्तुगीज लोक हल्ला करीत या गोष्टीला आधार आहे. पाद्री फ्रान्सिस्क द सौज याने 'खिस्ताकरिता पूर्व कशी जिंकली' (O oriente cenquistado a Jesus Christo) या आपल्या ग्रंथांत चोडणें येथील मानुअेल नांवाच्या अेका बाटलेल्या ब्राह्मण तरुणाने शेजारच्या अेका ब्राह्मण

पंडिताच्या ग्रंथसंग्रहावर कसा डल्ला मारला व "गीताव्यास" वगैरे ग्रंथ अुपटून त्यांचा हिंदु-धर्मखंडनाच्या कामीं कसा अुपयोग केला याची हकीकत चटकदारपणें दिलेली आहे! (Conq. I, Div. II, 42-43) तात्पर्य, योगवासिष्ठ हा ग्रंथ १५४१ पूर्वीच गोव्यांत आलेला असावा. कारण त्या वेळीं गोव्यांत धर्मच्छळाची जी भयंकर धामधूम होती तीमुळे नव्या ग्रंथांची तिकडे आयात होणें संभवनीय दिसत नाही. तसेंच त्या वेळच्या ग्रंथप्रसाराची गतीहि आपणांस विचारांत घेतली पाहिजे. आज हिंदुस्थानांत कोठेहि ग्रंथ तयार झाला म्हणजे छापखाना, पोस्ट वगैरेंच्या साहाय्यानें तो गोव्यासारख्या भागांत ताबडतोब पोचूं शकतो. परंतु जुन्या काळीं अशी स्थिति नव्हती. अेखादा ग्रंथ लोकप्रिय झाल्यावर त्याच्या नकला सुरू होत. प्रथम मूळ ग्रंथाची अेकानें नक्कल करावी. त्याची मग दुसऱ्यानें. अशा प्रकारें नकलांच्या नकला होत होत ग्रंथांचा प्रसार होअी. तात्पर्य, हा ग्रंथ तयार होअून गोव्यासारख्या दूरच्या भागांत पोंचण्यास बरींच वर्षें लोटलीं असली पाहिजेत. तात्पर्य, भाषा आणि हा अितिहास लक्षांत घेतां हा ग्रंथ तेराव्या शतकांतील मानण्यास मुळींच हरकत दिसत नाही. अर्थात् त्याची भाषा रामदासकालीन आहे ह्या विधानाचा जास्त विचार करण्याचें कारणच नाही.

(५) ओव्यांची रचना ज्ञानेश्वरांची दिसत नाही या आपल्या विधानाच्या समर्थनार्थ डॉ. पेंडसे यांनी

ऋषि रोमहर्षणु। अजरामरु प्रवीणु।
जो आअुठ कोडी मार्कंडेयाचा निपुणु। लाधला मानु ॥ १ ॥ २६ ॥

हा बेढब ओवीचा नमुना म्हणून दिलेला आहे. साधारणतः पहिले तीन चरण सारख्या लांबीचे व चौथा अर्धा अशी ज्ञानेश्वराच्या ओवीची रचना असते हें खरेंच आहे, परंतु त्याला अपवादादाखल ज्ञानेश्वरीमध्ये वरच्यासारख्या वाटेल तितक्या बेढब ओव्या दाखवितां येतील; उदाहरणार्थ--

पाहे पां स्वर्ग मोक्ष अुपाअिले।
दोन्ही मार्ग तेयाचिया चि वाहाणी आहाति ठेविले।
आम्हीं आंग शेषा वेचिलें।
लक्ष्मीयेसिं ॥-१२२॥ (अ. १०)

योगवासिष्ठांतील अ. १-१४ ही ओवी साडेचारचरणी आहे असें प्रो. पेंडसे म्हणतात. परंतु मजजवळच्या हस्तलिखितांत ती ओवी पुढीलप्रमाणे आहे--

सर्व सिद्धि कल्पतरूचि वाढी। (ज्ञा)ना अमृत रसाचि गोडी।
तूं श्रुतींतील मूर्छना पुढी। मोक्षपदीं ॥ १४ ॥

यावरून चांदोरकरप्रतींतील पाठ चुकीचा आहे हें अुघड दिसून येणारें आहे.

(६) वर सांगितल्याप्रमाणें 'तैसा वक्ता परि वक्ता नोहे श्रोतेन विण' ही ओवी प्रस्तुत योगवासिष्ठांत ज्ञानेश्वरींतून जशाच्या तशी घेतलेली असून, 'ही अुसनवारी ग्रंथकाराचें कल्पना-दारिद्य सुचवितें' असें डॉ. पेंडसे यांचें म्हणणें आहे. परंतु असा कल्पनांचा पुनरुच्चार ज्ञानेश्वरीमध्येहि आढळत नाही काय? अुदाहरणार्थ—

जैसें जळीं जळ न सिंपे। पद्मपत्र ॥ अ. ३, ७१
जैसें न सिंपे जळिं जळें। पद्मपत्र ॥ अ. ५, ५०

शिवाय अेकच ओवी किंवा श्लोक दोन ग्रंथांमध्ये असणें हें ग्रंथकाराच्या कल्पना-दारिद्र्याचें लक्षण नसून हे दोनहि ग्रंथ अेकाच कर्त्याचे असल्याचा तो मरीत्र पुरावा आहे. रघुनाथपंडितांच्या दमयंतीस्वयंवर व गजेंद्रमोक्ष या काव्यांमध्ये समान श्लोक आले असल्यामुळे त्यांच्यावरहि हाच आक्षेप होता. त्या वेळीं यासंबंधी मीं दमयंतीस्वयंवराच्या प्रस्तावनेंत विस्तृत विचार केला असून, "अुत्तररामचरितामध्ये असलेलींच आठ पद्यें भवभूतीच्या महावीरचरितामध्ये व नअू पद्यें त्याच्या मालतीमाधव नाटकामध्येहि आहेत. यांतील अेक पद्य तर या तीनहि नाटकांमध्ये आढळतें. याशिवाय श्लोकार्ध चरण व गद्य वाक्येंहि अुत्तररामचरितामध्ये असलेलींच त्याच्या अितर नाटकांमध्ये आढळतात. अुत्तररामचरितामध्ये दोन श्लोक तर अेकाच नाटकामध्ये दोनदा घातलेले आहेत" अशीहि माहिती मीं दिली आहे (पृ. ४८). माझ्या या पुस्तकावरील परीक्षणांत सुप्रसिद्ध पंडित गु० रंगाचार्य रड्डी म्हणतात— "आपल्या निरनिराळ्या काव्यांचें अेककर्तृत्व सिद्ध होण्याला काव्याच्या शेवटीं सर्वत्र जसा नामनिर्देश करणें अवश्य तसेंच हाहि अेक मार्ग कवि अवलंबीत असत. तेव्हा आपल्या निरनिराळ्या काव्यांत समान पद्यें गोवणें हें प्रतिमा व शब्द यांच्या दारिद्र्याचें सूचक नव्हे तर आपलें काव्य सरस असल्यामुळे त्याचा सामान्य कवींकडून अपहार होण्याचा संभव आहे म्हणून त्याचें संरक्षण करण्याकरिता अशा तऱ्हेची पद्यावृत्ति ही अेक प्रकारची मंजूषाच समजून तिचा अुपयोग प्राचीन काळीं करीत असावेत असें समजणेंच युक्त होय."

(७) 'अनुभवेंवीण विरपत्नाच्या बापा। न बोलवे।' (१–९१). "ही व्युत्पन्नाच्या बापाचा अुद्धार करण्याची पद्धति ज्ञानेशांची खास नव्हे" असें डॉ. पेंडसे म्हणतात. परंतु अशासारखी शब्दयोजना सर्वसाधारण लोकांना पटावी म्हणून योजलेली दिसते. दहाव्या प्रकरणांतील १३८ ते १४३ ओव्यांमध्ये निंदकाची जी निर्भत्सना आहे तिला 'गालिप्रदान' असें जें प्रो. पेंडसे यांनी नांव दिलें आहे. तें योग्य दिसत नाही. प्रो. पेंडसे यांनी ज्या भिंगारकरबुवांच्या ज्ञानेश्वरचरित्राचा (अि. स. १८८६) निर्देश केलेला आहे त्यामध्ये १९० पृष्ठावर ज्ञानेश्वरांचे म्हणून जे अभंग आहेत त्यांत अशी भाषा आहेच—

हृदयीं नाहीं जालेपण । क्रोधें भवंडिसी लोचन ॥
आंगीं भस्म अुधळण । राख राखेल काओ ॥
खर लोळे अुकिरडां । काय परत्राचिया चाडा ॥
तैसी मठी बांधोनियां मूढा । वर्म चुकलासी ॥

ज्ञानेश्वरांच्या अभंगांच्या गाथ्यांत अशा भाषेचे आणखीहि अभंग सांपडतात.

(८) "मराठी भाषेची ठिकठिकाणीं केलेली अतिरिक्त प्रशंसा ज्ञानेश्वरांना शोभणारी नाही" असें प्रो. पेंडसे म्हणतात. परंतु अशी स्तुति ज्ञानेश्वरीमध्येहि आहेच. शिवाय ती कां करावी लागली याचीहि माहिती वर दिलीच आहे.

(९) चतुर्युगधर्मप्रकरण किंवा तालप्रमाण माणसाची अुंची याचा विचार रा. देशपांडे यांनी केलाच आहे.

(१०) वसिष्ठांना नागपंथी बनविलें आहे हा कालविपर्यासाचा प्रकार असून विषय मनोरंजक करतांना असे प्रकार घडले आहेत. खुद्द योगवासिष्ठामध्येहि निर्वाण प्रकरणांत (सर्ग ५२-५८) रामकालोत्तर असें अर्जुनोपाख्यान आलेंच आहे. याचा विचार रा. देशपांड्यांनी केलेला आहे.

(११) दशपवनांच्या मिळणीचा विचार मच्छिंद्रनाथ व गयनीनाथ यांना कळला नाही असें सांगून ग्रंथकार आपल्या गुरूंची निंदा करतात असा प्रो. पेंडसे यांचा आक्षेप आहे. वास्तविक याहि भागांत मनोरंजक पद्धतीने लिहिण्याचा प्रयत्न असून, "यांसी पवनाभ्यासीं प्रीति थोरी। परि ते पंचतत्वांची कुसरी। न बोलतीचि तेथें॥" असें ग्रंथकाराने लिहिलें आहे. यांत निंदा काय आहे?

(१२) 'पंचीकरणां'तील ओव्या किंवा वर सांगितल्याप्रमाणे भिंगारकरबुवांनी योगवासिष्ठांतील म्हणून दिलेल्या ओव्या या ग्रंथांत नसणें हा प्रस्तुत ग्रंथ बनावट ठरविण्यास पुरेसा पुरावा नाही. पंचीकरण हें ज्ञानेश्वरांचेंच मानलें तरी तें स्वतंत्र प्रकरण असणें शक्य आहे, आणि भिंगारकरबुवांची योगवासिष्ठाची प्रत आज कोठेहि अुपलब्ध असलेली दिसत नाही. तिच्यावरून प्रस्तुत ग्रंथ बाजूला सारतां येत नाही. चांदोरकरांची मूळ हस्तलिखित प्रत सोपानदेवांच्या सांप्रदायिक मठांत सांपडल्याचें वर लिहिलेंच आहे अशीच जुनी अपूर्ण प्रत गोमंतकांत सांपडल्याचें व काशीसहि अशी प्रत असल्याचें चिंचाळकरांनी नमूद केलें आहे (मुमुक्षु, ३०–७–१४).

महानुभाव पंथाचे आद्य संस्थापक चक्रधर हे ज्ञानेश्वरापूर्वीच होऊन गेले (शके ११९५). त्यांचें कार्य त्यांचे शिष्य नागदेवाचार्य चालवीत होते. चक्रधरांनी आपल्या अनुयायांना मराठीमध्येच ग्रंथरचना करण्यास निरोपिलें होतें याबद्दल पुरावा आहे. ज्ञानेश्वरांपूर्वी प्रसिद्ध झालेलें महानुभावी वाङ्मय म्हणजे सिद्धान्तसूत्रपाठ, मूर्तिप्रकाश (केशव व्यास), धवळे (महदंबा), शिशुपालवध, अेकादशस्कंध (भास्कर कवि), वत्सलाहरण (दामोदर पंडित), लीळाचरित्र वगैरे ग्रंथ होत. यांपैकी कांही वाङ्मय ज्ञानेश्वरांच्या वाचनांत आलें असलें पाहिजे. कारण ज्या रामदेवराव यादवाचा ज्ञानेश्वरीच्या शेवटीं ज्ञानदेवांनी मोठ्या गौरवाने व आदराने अुल्लेख केलेला आहे. त्याचा चुलता महादेवराय यांचा व चक्रधरांचा निकट संबंध आला होता असा लीळाचरित्रांत निर्देश आहे. रामदेवरावाची राणी कामाअिसा हिने तर नागदेवाचार्यांचा अुपदेश घेतला होता. ज्ञानेश्वरांनी चक्रधरांचीं सिद्धान्तसूत्रें तरी वाचलीं असलीं पाहिजेत असें मानण्याला जागा आहे. कारण चक्रधरोक्त सूत्रपाठामध्ये—

स्त्री मणिजे मंत्त द्रव्याचा रावो गा :
आणिकें द्रव्यें सेविलेया माजविति :
स्त्री दर्शनमात्रेंचि माजवी ॥९॥

(श्रीचक्रधरोक्त सूत्रपाठ— सं. ह. ना. नेने. पृ. १०)

असा मजकूर आहे; व जवळ जवळ हेच शब्द प्रस्तुत योगवासिष्ठ ग्रंथांत आढळतातः—

आणिकें द्रव्यें असती। ते सेविलेयां माजविती।
वनिता भ्राम्यगती। दर्शनमात्रें॥८॥
वनिता न ते द्रव्याचा राऊ। कीं कंदर्प सुखाचा आदि ठाऊ॥ (अध्याय ६)

याहिखेरीज आणखी समान स्थळें दाखवितां येतील असें सुप्रसिद्ध महानुभावी वाङ्मयाचे संशोधक रा. ह. ना. नेने यांचें म्हणणें आहे.

यावरून असेंहि वाटतें की, चक्रधराच्या अनुयायांमध्ये व नाथपंथी किंवा वारकरी लोकांमध्ये पुढे जी अप्रीति व लाथाळी माजली त्याचा मागमूसहि आरंभीं नव्हता. तसें

पाहिलें असतां महानुभावीय मतामध्ये पंथाभिमान सोडला तर अितर हिंदूंना तत्त्वाच्या दृष्टीने अितकें विचकून जाण्यासारखें कांहीच नाही, ही गोष्ट आता स्पष्ट झाली आहे. चक्रधरांनी आपल्या अनुयायांना मराठी निरोपिली होती हें वर लिहिलेंच आहे. देशी भाषेच्या शेजारीं होणाऱ्या या प्रसाराकडे ज्ञानदेव दुर्लक्ष करतील असें वाटत नाही. अर्थात् मूळ योगवासिष्ठांतील स्त्रीजुगुप्सेला (वैराग्यप्रकरणम्, सर्ग २१ पाहा) धरून असलेले सूत्रपाठांतील विचार त्यांच्या लेखणींतून सहज अुतरले, व ते तत्कालीन लोकांना जास्त पटले असतीलहि. अनेक विद्वानांना गोंधळांत पाडणारा म्हणून या ग्रंथाला मथळ्यांत प्रगूढ म्हटलें. परंतु याहिशिवाय या ग्रंथाचें अेक वैशिष्ट्य आहे. तें असें— मराठी भाषेचे आज मुख्य तीन प्रवाह दिसतात: ज्ञानेश्वरादिकांचें संतवाङ्मय, महानुभाव वाङ्मय व स्टिफन्सप्रभृति पाद्रींचें खिस्ती वाङ्मय. या तीनहि प्रवाहांचा त्रिवेणीसंगम प्रस्तुत योगवासिष्ठांत झालेला आहे हें वरील विवेचनावरून कळून येअील.

पांगारकरप्रभृति वारकरी संप्रदायाचे लोक हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा नाही म्हणतात म्हणून हा ग्रंथ कचऱ्यामध्ये फेकून देणें स्पष्ट वेडेपणाचें होअील. संशोधनाच्या बाबतींत सांप्रदायिकांवर सर्वस्वीं अवलंबून राहणें धोक्याचें आहे, हें त्या लोकांसंबंधी मला अत्यंत आदर असूनहि मला येथे महाराष्ट्राला बजाविलें पाहिजे. ज्यांना कोणत्याहि पूर्वग्रहाशिवाय या प्रश्नाची चर्चा करणें शक्य आहे अशा विद्वानांनी या प्रश्नाचा विचार केला पाहिजे.

अलीकडे बऱ्याच ग्रंथांवर चर्चा होतात, परंतु त्या केवळ गर्दी जमविण्याकरिता किंवा पुस्तकाची जाहिरात करण्याच्या बुद्धीने असतात असें अैकतों. महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या संस्थेने हा प्रश्न हातीं घेणें अवश्य आहे. डॉ. पेंडसे यांनी या प्रश्नाला पुनः चालना दिली आहे यांत शंका नाही. त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. या ग्रंथाची मूळ किंमत बारा आणे होती; परंतु हा ग्रंथ बनावट ठरविल्यामुळे तो आता रद्दीच्या भावाने म्हणजे दर प्रतीला तीन आण्यांच्या दराने धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेने विकावयास काढल्याचें 'रामदास व रामदासी' या मासिकाच्या अेका ताज्या अंकावरून कळतें. खरोखरच जर हा ग्रंथ ज्ञानेश्वरांचा असेल तर त्याची ही जी आम्हीं विटंबना चालविली आहे त्याच्यासारखा अन्य गुन्हा असेल काय? राजवाड्यांनी आपल्या ज्ञानेश्वरीचें मूळ हस्तलिखित नष्ट करून अक्षम्य अपराध केला आहे हें मला कबूल आहे. परंतु भाषेच्या दृष्टीने जुन्यांतील जुनी असलेली ही प्रत वारकरी लोकांनी टाकाअू ठरविली असल्याचें अैकून मला या लोकांच्या अविचाराबद्दल खरोखरच फार दुःख झालें, आणि म्हणूनच योगवासिष्ठाचा फेरविचार करावा अशी माझी महाराष्ट्रांतील विचारी लोकांना अत्यंत आग्रहाची विनंती आहे.

---

# मध्यप्रांत सरकारचा दप्तरखाना*

(लेखक—प्रो. श्रीनिवास नारायण वनहट्टी)

नागपूर शहर हें पूर्वी भोसल्यांच्या राज्याची राजधानी आणि त्यानंतर भोसल्यांच्या राज्याचे वारसदार जे अिंग्रज सरकार त्यांच्या 'सेंट्रल प्राव्हिन्सेस' नामक विस्तृत प्रांताची राजधानी या नात्याने आज सुमारें दोनशे वर्षे नांदत आहे. या दोनशे वर्षांतील या प्रांताच्या अितिहासाचीं साधनें नागपुरास केंद्रीभूत झालेलीं असावीं अशी अितिहासाच्या अभ्यासकांची व संशोधकांची अपेक्षा असावी हें स्वाभाविक होय. प्रत्यक्ष अनुभव पाहतां ही अपेक्षा मोठ्या प्रमाणांत तृप्त झालेली दिसत नाही. खुद्द भोसले राजांचे वंशज नागपूर येथे विद्यमान आहेत. परंतु त्यांच्याकडे कागदपत्रांची फार मोठी सामग्री अुपलब्ध असल्याचें अैकिवांत नाही. जे कांही थोडेबहुत कागदपत्र भोसल्यांच्या घराण्यांत अुपलब्ध झाले ते 'नागपूरकर भोसले यांचे कागदपत्र' या सदराखाली काव्येतिहाससंग्रहांत छापले गेले. त्यानंतरच्या ५०-६० वर्षांत अिकडच्या प्रांतांतील, विशेषतः नागपूर शहरांतील, कागदपत्र म्हणण्यासारखे कोणीं अुजेडांत आणलेले दिसत नाहीत. नागपूरकर भोसल्यांच्या अितिहासास अुपयोगी अशी सामग्री अितरत्र अुपलब्ध झालेली प्रसिद्ध करण्यांत आली आहे; अुदाहरणार्थ, पेशवे दप्तरांतील निवडक कागदपत्रांचे जे भाग रावसाहेब सरदेसाअी यांच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध झाले आहेत त्यांतला विसावा भाग नागपूरकर भोसल्यांच्या संबंधाचा आहे. परंतु खुद्द नागपुरांत असलेली सामग्री धुंडाळून अुजेडांत आणण्याचें काम विशेषसें कोणीं केलेलें दिसत नाही. भोसल्यांच्या अमदानींत नागपुरांत सरदारांचीं व मुत्सद्यांचीं अनेक घराणीं अुदयास आलीं. त्या घराण्यांच्या विद्यमान वंशजांकडे जाअून कागदपत्र धुंडाळण्याचें काम कितपत कसोशीने झालें आहे हें सांगतां येत नाही. अेका घराण्यांतील विद्यमान पुरुषाशीं बोलण्याचा प्रसंग आला असतां त्यांच्या मूळ गांवीं कांही जुने कागदपत्र मिळण्याचा संभव आहे असें प्रस्तुत लेखकास दिसून आलें. या दिशेने संशोधनास वाव आहे अितकेंच येथे नमूद करून ठेवणें पुरें होअील.

निरनिराळीं घराणीं व त्यांतील नाना स्वभावांच्या अनेक व्यक्ति यांच्याकडे जाअून सामग्री धुंडाळण्याचें काम जिकिरीचें व दीर्घसूत्रीपणाचें असतें. तें सोडलें तरी जो संग्रह आयता सांठवलेला, व्यवस्थित रीतीने संरक्षिलेला व योग्य अभ्यासकांस अुपलब्ध होण्याजोगा आहे, त्याच्याकडे अितिहासाच्या अभ्यासकांनी कसोशीने लक्ष पुरवूं नये ही खेदाची गोष्ट होय. भोसल्यांच्या राज्याचें वारसदार जें मध्याचें अिंग्रज सरकार त्याचा नागपूर दरबारशीं संबंध आल्यापासून तों आजतागायत जो सर्व राजकीय व्यवहार झाला त्यासंबंधाचे कागदपत्र जतन करून ठेवण्यासाठी मध्यप्रांत सरकारची अेक स्वतंत्र कचेरी असून त्या कचेरीमार्फत सर्व प्रकारचे संरक्षणीय कागदपत्र जतन करून ठेवले गेले आहेत व जात आहेत. मध्यप्रांताच्या गेल्या दीडशे वर्षांच्या अितिहासाची अफाट सामग्री नागपूर येथील सेक्रेटरीयटमध्ये आज विद्यमान

* मध्यप्रांत संशोधन मंडळाच्या ता. २७।९।४२ रोजी भरलेल्या सभेंत वाचलेला निबंध

आहे या गोष्टीची जाणीव अभ्यासकांस असावयास पाहिजे. आजपर्यंतच्या अितिहासलेखकांनी या सामग्रीचा फारसा अुपयोग केला आहे असें दिसत नाही. या प्रांताच्या अितिहासलेखनाचा सर्वांत मोठा व अुल्लेखनीय प्रयत्न म्हणजे श्री. यादव माधव काळे यांचा 'नागपूर प्रांताचा अितिहास' हा होय. श्री. काळे यांच्यासारख्या मुरलेल्या अभ्यासकास सरकारी दप्तरखान्याची माहिती नाही असें कसें होईल? तथापि त्यांनी आपल्या अितिहासग्रंथाच्या प्रस्तावनेंत मध्य-प्रांत सरकारचा दप्तरखाना व त्यांतील कागदपत्र यांचा अुल्लेख केलेला दिसत नाहीं व प्रत्यक्ष ग्रंथ चाळून पाहिल्यास त्यांतहि या कागदपत्रांचा अुपयोग थोड्याच ठिकाणीं केलेला दिसून येतो. ही सर्व परिस्थिति पाहिली म्हणजे गेल्या दीडशें वर्षांचा या प्रांताचा अितिहास सांगो-पांग रीतीने रचावयाचा झाल्यास त्यास मध्यप्रांताच्या सरकारच्या दप्तरीं असलेल्या साधन-सामग्रीअितकी विपुल व विश्वसनीय अशी साधनसामग्री दुसरीकडे कोठेहि मिळणेंच शक्य नाही ही गोष्ट अभ्यासकांच्या मनांत ठळक रीतीने बिंबविणें किती अवश्य आहे हें सहज लक्षांत येअील.

प्रस्तुत लेखकाचें लक्ष मध्यप्रांत सरकारच्या दप्तरखान्याकडे जाण्यास अेक निमित्त कारण झालें व त्यामुळेच त्याला या दप्तरखान्याच्या अैतिहासिक महत्त्वाची जाणीव विशेष ठळक रीतीने झाली. १९४२ हें साल न्यायमूर्ति रानडे यांच्या शतसांवत्सरिक जन्मदिनाचें असल्यामुळे या सालीं त्यांच्या स्मृतीस योग्य असें त्यांचें वाङ्मयस्मारक करण्यांत यावें, असें साहित्यसंमेलनाने ठरविलें. या कामासाठी जी समिति नेमण्यांत आली तिचें चालकत्व माझ्या गळ्यांत पडलें. या स्मारकाप्रीत्यर्थ जे ग्रंथ प्रसिद्ध करावे असें ठरलें आहे त्यांतील अेक ग्रंथ 'अखिल महाराष्ट्राचा सांगोपांग अितिहास' हा संकल्पिलेला आहे. महाराष्ट्रामध्ये अर्थातच वऱ्हाड व मराठी मध्यप्रांत यांचा समावेश होतो. तेव्हा या प्रांताच्या अितिहासावर प्रत्यक्ष लिखाण काय काय झालें आहे व अितिहासाची सामग्री कोठे कोठे कितपत मिळण्याजोगी आहे याचा शोध घेणें स्मारकसमितीचा संयोजक या नात्याने मला प्राप्त झालें. माझ्या शोधाचा पहिलाच मोर्चा मीं मध्यप्रांत सरकारच्या सेक्रेटरीयेटमधील पुस्तकालयाकडे वळविला व त्या-बरोबरच अमुद्रित कागदपत्रांचें संग्रहस्थान जें Record Office (दप्तरखाना) त्यांतहि प्रवेश करून घेतला. या रेकार्ड ऑफिसमधील संग्रहाची सांगोपांग माहिती अद्याप मी देखील करून घेअू शकलों नाहीं. वेळ थोडा व विघ्नें फार अशी स्थिति असल्यामुळे तेथील सामग्रीचें ओझरतें दर्शनच काय तें मी घेअू शकलों आहें. तथापि आपणाला जेवढें ठाअूक झालें तेवढें अितरांस सांगून मोकळें व्हावें म्हणजे कांहीजणांचें तरी लक्ष अिकडे वेधेल व अभ्यासास चालना मिळेल अशा हेतूने या सरकारी दप्तरखान्यांतील अैतिहासिक महत्त्वाचा जो भाग आहे त्याची येथे थोडक्यांत माहिती करून देण्याचें योजिलें आहे.

अिंग्रज सरकारचा म्हणजे ईस्ट अिंडिया कंपनीचा संबंध नागपूर दरबाराशीं जरी सुमारें १७७८ पासून आलेला असला तरी कंपनीने आपला प्रत्यक्ष स्थायी वकील (रेसिडेंट) नागपूरकर भोसल्यांच्या दरबारीं ठेवण्याची कारवाअी त्यानंतर २० वर्षांनी म्हणजे अि. स. १७९८ सालीं केली. सुप्रसिद्ध प्राच्यविद्यासंशोधक हेन्री टॉमस कोल्ब्रुक हा भोसल्यांच्या दरबारचा अिंग्रजांचा पहिला वकील होय. याला त्या वेळेचा गव्हर्नर जनरल लॉर्ड वेल्स्ली अुर्फ अर्ल ऑफ मॉर्निंग्टन याने नागपूरचे राजे दुसरे रघूजी भोसले यांच्या दरबारीं आपला दिवाण अुर्फ वकील म्हणून ता. २३ जुलै सन १७९८ रोजीं नेमलें. तेव्हापासून अिंग्रजांचें ठाणें

नागपुरास प्रस्थापित झालें तें कायमचेंच. भोसल्यांच्या दरबारीं कंपनी सरकारच्या रेसिडेंटने या सालीं आपला पाय रोवला तो १८५३ सालीं भोसल्यांचें राज्य खुलसून टाकीपर्यंत तेथून हलविला नाही. नागपूरच्या रेसिडेंटाची कचेरी १७९८ सालीं जी सुरू झाली ती १८५४ सालीं भोसल्यांच्या राज्याची वारासार होओपर्यंत चालू होती. या सुमारें ५६ वर्षांच्या दीर्घ काळांत नागपूर रेसिडेन्सीचा जो आवकजावक पत्रव्यवहार झाला तो 'रेसिडेन्सी रेकॉर्ड्स' या नांवाने सरकारी दप्तरखान्यांत जतन करून ठेवण्यांत आला आहे. या रेसिडेन्सी रेकॉर्ड्सचे अेकंदर बासष्ट खंड असून प्रत्येक खंडांत शेकडो पत्रें आहेत. त्या काळचा अितिहास जाणून घेण्यास हे बासष्ट खंड म्हणजे अेक अतुलनीय साधन आहे हें अुघड आहे. हे खंड सालवारीने व्यवस्थित तयार केलेले नाहीत किंवा खंडाच्या विभागणीच्या बुडाशीं दुसरें कोणतेंहि तत्त्व दिसून येत नाही. पत्रव्यवहार ज्यांच्याशीं झाला त्यांच्या नांवानुसार पत्रव्यवहाराचे विभाग पाडलेले दिसत नाहीत किंवा स्थलवार विभागणीचें तत्त्व अनुसरलेलें दिसत नाही. हे खंड तयार करणारांनीं वर्गीकरणाची कोणतीहि तर्कशुद्ध पद्धत न अवलंबितां जसे हातास लागले तसे कागदपत्र घेअून साधारणपणें अेका खंडास पुरेसे होतील अितके कागदपत्र चिकटवून होतांच त्यांचीं पुस्तकें बांधलीं असावींत असें दिसतें. येवढें मात्र खरें कीं अेकेका खंडांतील कागदपत्र काळजीपूर्वक कालानुक्रमाने लावण्यांत आलेले आहेत. या खंडांमध्ये कित्येक खंड निव्वळ आवक पत्रव्यवहाराचे आहेत आणि कित्येक खंड निव्वळ जावक पत्रव्यवहारांच्या नकलांचे आहेत. पैकी आवक म्हणजे बाहेरून आलेल्या पत्रांचे खंड संख्येने पुष्कळ अधिक असून जावक पत्रव्यवहाराचे खंड त्या मानाने पुष्कळ कमी आहेत. यावरून नागपूर रेसिडेन्सीं-तून बाहेर जाणारा पत्रव्यवहार सर्वच नकलून ठेवला जात नव्हता कीं काय अशी शंका येते. सर्व खंड सावचितपणें चाळून पाहिल्यास या शंकेचें अुत्तर देतां येअील. परंतु प्रस्तुत लेखकास अद्यापि तसें करण्यास वेळ मिळालेला नाही.

प्रारंभींच्या तीन चार खंडांचें किंचित् तपशीलवार वर्णन दिल्यास या रेसिडेन्सी दप्तराच्या खंडांची वाचकांस अधिक कल्पना येअील. पहिल्या खंडास ता. २३ जुलै १७९८ रोजीं हेन्री टॉमस कोलब्रुक याला गव्हर्नर जनरलने नागपूर दरबारीं स्वतःचा प्रतिनिधि नेम-ल्याचें जें आज्ञापत्र आहे त्याने सुरवात होते. हा कोलब्रुक १८ मार्च १७९९ रोजीं नागपुरास येअून पोचला असें श्री. काळे आपल्या अितिहासांत (पृ० ३१०) म्हणतात तें कशाच्या आधारावर हें समजत नाही. कोलब्रुकच्या नेमणुकीची सनद २३ जुलै १७९८ ची असल्या-मुळे व कलकत्त्याहून गव्हर्नर जनरलच्या सेक्रेटरीने ता. ८ फेब्रुवारी १७९९ रोजीं कोलब्रुकला नागपुरच्या पत्त्यावर लिहिलेलें अेक पत्र प्रस्तुत खंडांत विद्यमान असल्यामुळे कोलब्रुक हा नागपुरास १८ मार्च १७९९ च्या पूर्वींच येअून पोचला असावा असें दिसतें. अर्थात् श्री. काळे यांनी दिलेली १८।३।१७९९ ही तारीख बरोबर दिसत नाही. कोलब्रुक यास रेसिडेन्ट नेमल्याचें जें आज्ञापत्र पहिल्या खंडाच्या प्रारंभीं बांधलेलें आहे त्याची नकल मीं आपल्या माहितीकरिता करून आणली असून ती पुढीलप्रमाणे आहेः—

To

Henry Thomas Colebrooke Esqr.

Whereas it has been judged proper to appoint a minister on the part of the Govt. to the Court of Maha Rajah Raggojee Bhoosla, Rajah

of Berar, I the right Hon ble Richard Earl of Mornington K. P. &c. &c. &c., Governor General in Council, in virtue of the powers vested in me by the King and Parliament of Great Britain and by the East India Company to direct and controul the Political affairs of the Company's settlements in India, relying on your Fidelity, Prudence and Integrity, have appointed you my Public Minister to remain at Nagpur or such other place where the Rajah may reside, and in this capacity to do and transact all such business as shall be given to you in charge by me and I hereby vest you with full powers to that effect, declaring that I will confirm whatever you may transact with the Rajah in my name and on my behalf according to the instructions with which I have furnished or shall furnish you for that purpose.

Given under my hand and the seal of the Company at Fort William in Bengal the 23rd day of July in the year of our Lord 1798.

A True Copy.

J. Adam

Dy. Secretary to Govt.

पहिल्या खंडामध्ये कोलब्रुकला आलेलीं व कोलब्रुकने अितरांना लिहिलेलीं २३ जुलै १७९८ ते १ आगष्ट १७९९ या कालावधींतील पत्रें आहेत. अर्थात् या खंडांत आवक व जावक दोन्ही प्रकारच्या पत्रांचा समावेश आहे. ही गोष्ट अर्थात् अपवादात्मक होय. दुसऱ्या खंडांत १८०१ ते १८०९ पर्यंतचे महत्त्वाचे कागदपत्र आहेत. यांपैकी १८०३ ते १८०६ हीं वर्षे फारच महत्त्वाचीं असून या वर्षांत शिंदे, होळकर व भोसले यांच्याशीं कंपनीच्या लढाया होअून सुर्जी अंजनगांव व देगांव येथील तह होअून मराठमंडळांतील या मातबर सरदारांचा नक्षा कंपनी सरकारने अुतरविला ही गोष्ट अितिहासांत प्रसिद्ध आहे. त्या काळांतील घटनांसंबंधींचे अनेक अत्यंत महत्त्वाचे अस्सल कागदपत्र या खंडांत आहेत. यांत सर्व आवक पत्रव्यवहार आहे. अि. स. १८०४ च्या प्रारंभापासून माअुंट् स्टुअर्ट् अेल्फिन्स्टन् हा नागपुरास रेसिडेन्ट म्हणून आला व त्यानेच दुसऱ्या रघूजीवर वरचष्मा ठेवून त्याला मांडलिकाच्या दर्जापर्यंत आणून सोडण्याची कामगिरी केली. कर्नल क्लोज याच्या १८०४-०५ मधील लष्करी हालचालींचे सविस्तर वृत्तान्त याच खंडांत आले आहेत. कर्नल क्लोज हा १८०२ ते १८०७ पर्यंत पुणें दरबारीं अिंग्रजांचा वकील म्हणून होता. त्याने पुणें दरबारच्या हकीकतींचे वृत्तान्त वेळोवेळीं नागपुरास कळविले तेहि या खंडांत आहेत. १८०५ सालीं ओीस्ट अिंडिया कंपनीने यशवंतराव होळकरास अेकाकी गांठून त्याच्याशीं युद्ध केलें. त्यानंतर होळकरांकडून बाळाराम शेट आणि शेख हबिबुल्ला हे दोन वकील कर्नल सर जॉन माल्कम याच्याकडे तह ठरविण्याकरिता आले. त्यांच्या परस्परांशीं कित्येक दिवसपर्यंत भेटी होत होत्या. त्या भेटींचीं प्रतिवृत्तें (Minutes) या खंडांत आलीं आहेत. याप्रमाणे दुसरा खंड अतिशय महत्त्वाचा आहे. त्यांतील सामग्रीचा थोडाबहुत अुपयोग श्री. काळे यांनी आपल्या अितिहासांत करून

घेतलेला दिसून येतो. देगांवच्या तहाअन्वयें ओरिसा प्रांत भोसल्यांकडून अिंग्रजांनी घेतला. तेथे व्यवस्था लावण्याकरिता जे. मेल्व्हिल नांवाच्या गृहस्थाची कंपनीकडून नेमणूक झाली; त्याने कटकहून त्या प्रांतांतील घडामोडींचें वर्णन करणारे खलितें नागपुरास पाठविले तेहि याच खंडांत आले आहेत.

तिसऱ्या खंडांत हिंदुस्थान सरकारची राजधानी फोर्ट विलियम येथून हिंदुस्थान सरकारने जे खलिते नागपूर येथील रेसिडेंटास १८०४ सालांत पाठविले ते सर्व अनुक्रमाने आले आहेत. त्यांत दौलतराव शिंदे आणि कंपनीचे अधिकारी यांच्यामध्ये १८०५ सालीं ज्या कटकटी अुद्भवल्या त्यांसंबंधाच्या कागदपत्रांच्या अधिकृत नकला आहेत.

अशाच रीतीने पुढे भिन्न भिन्न वर्षांतील निरनिराळ्या प्रकरणांसंबंधींच्या कागदपत्रांचें संकलन निरनिराळ्या खंडांतून केलें असून ५९ व्या खंडांत १८५४ सालपर्यंत कागदपत्रांचा पल्ला येअून पोचला आहे. यांत कित्येक महत्त्वाचीं प्रकरणें अशीं आलीं आहेत की त्यांची सामान्य लोकांस तर राहोच परंतु आजपर्यंत झालेल्या अितिहासलेखकांसहि दाद नाही. दुसरी अेक महत्त्वाची गोष्ट अशी की हा रेसिडेन्सीचा संग्रह पाहिल्याने हिंदुस्थानांत ठिक-ठिकाणीं अीस्ट अिंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यांच्या काय अुलाढाली चालल्या होत्या व भिन्न भिन्न राज्यांच्या कारभारांत काय काय घटना निर्माण होत होत्या याचें आपणांस अुत्कृष्ट रीतीने ज्ञान होअूं शकतें. कारण कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यांच्या पत्रव्यवहाराची पद्धत फारच विशद व खुलासेवार रीतीची असलेली दिसून येते. निरनिराळ्या ठिकाणचे रेसिडेन्ट आपापल्या ठिकाणीं घडणारे विशेष महत्त्वाचे वृत्तान्त नागपूरच्या रेसिडेंटास लिहून कळवितात, त्यांजकडे अितरांनी पाठविलेल्या महत्त्वाच्या पत्रांच्या नकला करून पाठवितात, अशा रीतीने नागपुरास पुष्कळ ठिकाणच्या घडामोडींचे वृत्तान्त गोळा झालेले आहेत. भोसल्यांच्या राज्यास लागून अुत्तरेस बुंदेलखंडांतील राजांचीं राज्यें होतीं. त्यांच्यावर नेमिलेला कंपनी सरकारचा रेसिडेंट बांदा येथे राहत असे. निजामाचें राज्य भोसल्यांच्या राज्याच्या दक्षिण सीमेस सर्वत्र पसरलेलें होतें. तेथील रेसिडेंटाकडून सर्व हकीकतींचीं पत्रें नागपुरास यावयाचीं ही गोष्ट जवळ जवळ ठरल्यासारखीच दिसते. त्याचप्रमाणे पुण्याच्या रेसिडेंटाकडून अनेक पत्रें आलेलीं आहेत. हिंदुस्थान सरकारचें मुख्य ठिकाण जें फोर्ट विलियम (कलकत्ता) तेथून येणाऱ्या खलित्यांचा अुल्लेख करण्याचें कारणच नाही. त्यांनी कांही खंड संपूर्णपणें भरलेले आहेत. तेव्हा नागपूर रेसिडेन्सीच्या कागदपत्रांचा हा संग्रह अखिल हिंदुस्थानच्या या काळांतील अितिहासाच्या अभ्यासास अेक निरुपम महत्त्वाचें साधन ठरेल हें स्पष्ट आहे नागपूर प्रांताच्या अितिहासाच्या रचनेस महत्त्व किती आहे हें शब्दांनी वर्णनच करतां येणार नाही. ज्या क्षणा-पासून अिंग्रजांचा रेसिडेंट येथे राहूं लागला तेव्हापासून या प्रांतांतील राज्यव्यवहाराचा आटोप करून हळूहळू सर्व बाबतींत आपले पाश टाकण्यास कंपनी सरकारने सुरुवात केली. तेव्हा या प्रांतांतील सर्व प्रकारच्या व्यवहारांचें प्रतिबिंब अिंग्रज रेसिडेंटाच्या पत्रव्यवहारांत दिसतें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. येथील राजांस कोठेहि सैन्य पाठवावयाचें झालें तर त्यास अिंग्रज सरकारची परवानगी लागे यांत तर आश्चर्य नाहीच, पण बुंदेलखंडांतून हिरे आणावयाचे झाले तरी त्यांच्या व्यवस्थेबद्दल रेसिडेंटासच विनंती, राजघराण्यांतील व्यक्तींस यात्रा करावयाची झाली तरी लिहा रेसिडेंटास, कोणास जकातमाफी पाहिजे असली तरी मन-धरणी करणें ती रेसिडेंटाची, अशा रीतीने बहुतेक सर्व व्यवहाराचीं सूत्रें या रेसिडेंटापाशीं

केंद्रित झालेली या पत्रव्यवहारावरून आढळतात. अर्थात् या पत्रव्यवहाराच्या सांगोपांग व्यासंगाशिवाय लिहिलेला या प्रांताचा अि. स. १७९८ ते १८५४ या काळांतला अितिहास म्हणजे वाल्मीकीस न पुसतां वर्णिलेल्या रामकथेप्रमाणे ठरेल यांत संशय नाही.

अेकंदर रेसिडेन्सी रेकॉर्डसचे खंड ६२ आहेत असें वर सांगितलेंच आहे. या बासष्टां-पैकी खंड १ ते ५९ हे व र्णिलेल्याप्रमाणे सालोसालच्या पत्रांनी व खलित्यांनी मरलेले आहेत. परंतु शेवटच्या तीन ांची गोष्ट अगदी निराळी आहे. त्यांतील मजकूर अगदी निराळ्या तऱ्हेचा व चित्तवेधक असा आहे. कंपनी सरकारच्या फोर्ट विलियमच्या केंद्रांतून १८४० ते ४२ च्या सुमारास अेक गुप्त स्वरूपाचें 'वृत्तपत्रक'—(Confidential 'News letter') निरनिराळ्या ठिकाणच्या कंपनीच्या अधिकाऱ्यांकडे रवाना होत असे असें दिसतें. हें 'न्यूज लेटर' दर दहा दिवसांनी फोर्ट वुअिल्यमहून रवाना होत असे. या वृत्त-पत्रकांचा आकार बारीक अक्षरांनी भरलेल्या दहापासून वीस तावांअितका असलेला आढळतो. यांत जगांतल्या सर्व ठिकाणांची माहिती, विशेषेंकरून अिंग्रजांनी चालविलेल्या अुलाढालींची माहिती, दिली जात असे. अरबस्थान, अिराणचें आखात, पूर्वेकडील चीन, हाँग-कॉंग वगैरे सर्व देशांतील घटनांची माहिती संकलित रीतीने लिहिलेली या पत्रकांतून आढळते. १८४० सालच्या मे महिन्यापासून या पत्रकांस प्रारंभ झालेला आढळतो व शेवटचें वृत्तपत्र २ मार्च १८४२ चें असलेलें आढळतें. १८४० च्या मेपासून पुढच्या पत्रकांचा अेकत्र बांधलेला खंड हा रेसिडेन्सी रेकॉर्ड्सचा साठावा खंड होय. १८४१ चीं सगळीं म्हणजे अेकंदर ३६ वृत्तपत्रकें शाबूत असून तीं ६१ व्या खंडांत क्रमवार बांधलेलीं आहेत. बासष्टाव्या खंडांत १८४२ चीं २ मार्चपर्यंतचीं वृत्तपत्रकें अेकत्रित केलेलीं आहेत. या वृत्तपत्रकांची ही टूम अेवढ्याच काळापुरती सुरू होती की अेकंदर वृत्तपत्रकांपैकी नागपूर रेसिडेन्सीमध्ये अेवढी जतन करून ठेवण्यांत आलीं असून यांच्या आधीचीं व नंतरचीं गहाळ झालीं हें तूर्त तरी सांगतां येण्यासारखें नाही. ज्या काळापुरतीं हीं अुपलब्ध आहेत तेवढ्या काळांतल्या सर्व ठिकाणच्या घडामोडी त्या वेळच्या कंपनी सरकारच्या अधिकाऱ्यांस कशा रीतीने भासत होत्या हें मात्र य पत्रकांतून अुत्कृष्ट रीतीने निदर्शनास येतें. तत्कालीन घटनांच्या ज्ञानास व अितिहासाच्या रचनेस या पत्रकांचा अतोनात अुपयोग होअील हें निःसंशय आहे.

---

## भाषेचें सामर्थ्य

भाषा ही समाजाचें बंधन आहे; भाषा ही विचाराचें वाहन आहे; भाषा ही धर्माचें पुरस्करण आहे. भाषेशिवाय मनुष्यप्राणी संभवत नाहीं. भाषा आणि मनुष्य ह्या दोन वस्तूंचें सामान्याधिकरण्य आहे. ह्या अीश्वरी देणगीच्या द्वारें अेकमेकांचीं सुखदुःखें आपण अेकमेकांस कळवितों. ही मायादेवी जें जें स्वरूप धारण करील त्या त्याप्रमाणे निरनिराळ्या अुचनीच विकारांची मोहिनी मनुष्यमात्रावर पडते. सर्व मानवी शक्यता हिच्या कृपाकटाक्षावर अवलंबून आहे. अुदार विचारांचे अंकुर ह्या अमृतवल्लीलाच तेवढे फुटतात. हिच्या अभावीं सर्वत्र स्तब्धता व शून्यता राज्य करते. ह्या देवतेची मनोभावेंकरून आराधना केली असतां सर्व कांही प्राप्त होतें व वर सांगितलेलें बहुरूपी जें स्वत्व त्याचेंहि रक्षण हिच्याच साहाय्यानें होतें.

—वि. का. राजवाडे, भाषान्तर मासिक वर्ष १, अंक ११।१२.

# म. म. विद्वद्रत्न वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांचे स्मृतीस

(लेखक—श्री. वि. ह. निजसुरे, धुळें)

'विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम, गोपाय मा शेवधिष्टेऽहमस्मि ॥'
निरुक्त यास्काचार्यः ।

'विद्या ब्राह्मणाकडे येऊन त्यास म्हणते, हे ब्राह्मणा, तूं माझें रक्षण कर. कारण, मी तुझा अमूल्य असा ठेवा आहें.' निरुक्त–यास्काचार्य.

वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या मृत्यूमुळे महाराष्ट्रांतील संस्कृत विद्येच्या परंपरेंतील पहिल्या प्रतींतील पहिलाच तारा निखळून पडला कीं काय असें वाटतें. महाराष्ट्रांतील संस्कृत विद्येंतील विद्वन्मुकुटमणि म्हणून कोठल्याहि सार्वजनिक सभेंत त्यांच्या मृत्यूविषयीं खेद प्रदर्शित व्हावा हें योग्यच. तथापि शांकरब्रह्मसूत्रभाष्य व पतंजलीचें व्याकरणमहाभाष्य यांच्या मराठी भाषांतरानें मराठी साहित्यिकांतहि त्यांचें मानाचें स्थान आहे. म्हणून नाशिक येथील साहित्यसंमेलनांत त्यांचे मृत्यूबद्दल खेद प्रदर्शित करण्यांत आला हें योग्यच झालें.

शास्त्रीबोवांचा जन्म खि. १८६३. मृत्यु खि. १९४२. ते सातारचे राहणारे. प्रसिद्ध नागेशभट्टाच्या परंपरेंतील रामशास्त्री गोडबोले यांजपाशीं त्यांचें अध्ययन झालें. ८ ते २० या बारा वर्षांत व्याकरण, शास्त्राध्ययन व लगेच अध्यापनास प्रारंभ. सातान्यास अध्ययन व १८९२ त पुण्यास आगमन आणि फर्ग्युसन कॉलेज व वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या पाठशाळेंत अध्यापन. अध्यापन करीत असतांच वेदान्त, न्याय, धर्मशास्त्र, मीमांसा वगैरे शास्त्रांचें अध्ययन. १९२८ त सेवानिवृत्ति. फर्ग्युसनमध्ये ३० रु. पासून १०५ रु. दरमहापर्यंत त्यांस पगार मिळत होता. सरकारनें त्यांस महामहोपाध्याय पदवी १९२१ त दिली व त्यांस त्याबद्दल सालिना १०० रु. दक्षिणा मिळत असे. सेवानिवृत्त झाले तेव्हा फर्ग्युसन कॉलेजांत व १९३८ त वयाच्या ७६ व्या वर्षीं पुण्यांत अनेक संस्थांतर्फे त्यांचा मोठा सन्मान करण्यांत आला. दुसऱ्या समारंभाचे वेळीं पंतप्रधान बाळासाहेब खेर हे अध्यक्ष होते. शास्त्रीबोवांस दरमहा ५२॥ रु. पेन्शन मिळत असे. संतति व संपत्ति या दोहों बाबतींत ते भाग्यवानच म्हटले पाहिजेत.

शिकवण्याच्या कार्यांतून ग्रंथ निर्माण होतात. बी. ए. परीक्षेला रामानुजांच्या श्रीभाष्याचा चतुःसूत्री हा भाग नेमतात. तो शास्त्रीबुवांस शिकवावा लागे. म्हणून तेवढ्या भागावर त्यांनी समासोक्ति नांवाची सुबोध व स्वल्प अशी टीका लिहिली आहे. बाकीच्या भाष्याच्या भागावर विवृति म्हणून टीका लिहिली आहे. तसेंच सर्वदर्शनसंग्रह या प्रसिद्ध ग्रंथावर टीका नव्हती ती त्यांनी लिहिली आहे. मधुसूदनसरस्वतींच्या सिद्धान्ततत्त्वबिंदु या ग्रंथावर जुन्या, विस्तृत व कठिण टीका आहेत. हा ग्रंथ वेदान्ताचें एक उत्कृष्ट पाठ्यपुस्तक म्हणून प्रसिद्ध आहे. करितां त्यावर शास्त्रीबुवांनी सुलभ व अतिविस्तृत नव्हे अशी टीका लिहिली आहे. तसेंच आपोदेवी या मीमांसेच्या पाठ्यपुस्तकावर व यतीन्द्रमतदीपिका या विशिष्टाद्वैती ग्रंथावरहि त्यांनी अशाच

सुबोध टीका लिहिल्या आहेत. स्वतःचें सांप्रदायिक मत अद्वैतवेदान्त असतांना त्यांनी विशिष्टाद्वैताचा त्या संप्रदायाच्या दृष्टीने अभ्यास करुन त्या मतान्या ग्रंथावर टीका लिहिल्या व नंतर स्वमतमंडनार्थ त्यांनी 'अद्वैतामोद' हा छोटा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथांत प्रथम त्या त्या मताची प्रक्रिया देऊन अुत्तरभागांत विशिष्टाद्वैत्यांनी अद्वैतावर आणलेल्या आक्षेपांस अुत्तरें देअून अद्वैताचा अुद्धार केला आहे. तसेंच त्यांनी कांही संस्कृत ग्रंथ लिहिलेले प्रसिद्ध झालेले नाहीत. कित्येक संस्कृत ग्रंथांचें त्यांनीं संपादकत्वाहि केलेलें आहे.

गायकवाड सरकारच्या सूचनेवरून शास्त्रीबुवांनी शंकराचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्याचें मराठी रूपांतर केलें आहे. त्यानंतर कै. लेले व बापटशास्त्री यांनीहि आपआपलीं भाषांतरें केलीं. तथापि अभ्यंकरांचेंच भाषांतर सरस अुतरलें आहे. पतञ्जलीच्या व्याकरणमहाभाष्याचेंहि भाषांतर त्यांनी लिहून तयार ठेविलें आहे. त्याचे दोन भाग गिन्हाअिकांचे पदरांत पडले आहेत. बाकीचे तीन लढाअीचे धांदलीने केव्हा छापून निघतील ते खरें. भाष्याचा विस्तृत अुपोद्घात लिहिण्यास मात्र शास्त्रीबुवा समर्थ झाले नाहीत.

संस्कृत व मराठी दोनहि भाषांवर शास्त्रीबुवांचें अुत्कृष्ट प्रभुत्व होतें. त्यांचें मराठी, ते संस्कृतांत मुरलेले शास्त्री असूनहि, अस्खलित व घरगुती, साधें म्हणूनच सुबोध आहे. त्यांत शास्त्रीयतेचा अवजडपणा व अवघडपणा नाही. त्यांचें संस्कृत साधें, सुबोध व ओजयुक्त आणि माधुर्ययुक्त आहे. तेथेहि पांडित्यप्रदर्शनाचा अभाव आहे. त्यांच्या संस्कृताचा अेक स्पृहणीय विशेष म्हणजे जुन्या टीकाकारांच्या तुटक पद्धतीप्रमाणे ते लिहूं शकतच पण अलीकडील अिंग्रजी व मराठी निबंधपद्धतीने ते सलग विषयप्रतिपादनास साजेसेंहि संस्कृत त्यांनी निरनिराळ्या ग्रंथांच्या प्रस्तावना व अुपोद्घात यांत लिहिलें आहे. अशा भाषाशैलीने जर संस्कृतांतलें ज्ञान संस्कृतांतूनच लोकांपुढे ओतलें तर तें लोकांना ग्रहण करण्यास किती तरी सुलभ जाअील.

शास्त्रीबोवांच्या युक्तिवादाचा व वर्णनशैलीचा अेक नमुना म्हणून त्यांच्या लिखाणांतील पुढील अुतारा वाचकांस सादर करितों. भाषान्तरावरूनहि मुळाची कल्पना सहज करतां येअील असा हा अुतारा आहे. शंकराचार्यांनी गौडपादाचार्यांच्याच कार्याचा परिपोष केला हें दाखवितांना शास्त्रीबुवा लिहितातः—"माण्डूक्योपनिषदावरील कारिकांत गौड. ना जें अभिप्रेत होतें तें शंकरा. नी ध्वनित केलें. गौ. नी जें ध्वनित केलें, तें शं. नी प्रतिपादिलें. गौ. नी जें प्रतिपादिलें, तें शं. नी युक्तीने सिद्ध केलें. गौ. नी जें युक्तीने सिद्ध केलें, तें शं. नी सिद्धान्तरूपाने प्रतिष्ठापित केलें. तसेंच गौ. नी जें तुच्छ म्हणून सुचविलें, तें शं. नी खूप निंदिलें. गौ. नी जें निंदिलें, त्याची शं. नी कडकपणें निर्भर्त्सना केली. गौ. नी ज्याची निर्भर्त्सना केली, तें मान्य नाही म्हणून शं. नी टाकून दिलें. जें गौ. नी टाकून दिलें, तें शं. नी खिळखिळें केलें व जें गौ. नी खिळखिळें, केलें तें शं. नी समूळ खणून काढलें. तात्पर्य, आपल्या परमगुरूंनी प्रवर्तित केलेला मायावाद शं. नी केवळ प्रतिपादिला अेवढेंच नव्हे, तर आपल्या अप्रतिहत तर्कशक्तीने त्याचें व्याख्यान केलें, पुरस्कार केला, त्याची सिद्धि केली व दृढस्थापना केली." सिद्धान्तबिंदूवरील टीकाग्रंथाच्या अुपोद्घाताच्या ४।५ पानांवरील हा अुतारा आहे. गद्यरूप अशाहि या अुताऱ्यांत शास्त्रीबुवांनी 'सार' या अलंकारासारखी वाक्यरचना करून मोठी मौज केली आहे.

शास्त्रीबुवा व्याकरणशास्त्रांत पूर्ण प्रवीण असून अितर शास्त्रेंहि त्यांनी हस्तगत केलीं. तथापि वेदाध्ययनाच्या अभावीं वेदशून्यत्व कपाळीं येअूं नये म्हणून स्वशाखेचा

वेदभाग त्यांनी शास्त्राध्ययनानंतर मुखोद्गत केला व वेदाध्ययन हें जें ब्राह्मणाचें कर्तव्य तें पार पाडलें. शास्त्राध्ययनाचें ओझें मस्तकावर वाहणारे व स्वतःस वेदसंपन्नहि म्हणवणारे पुष्कळ शास्त्री वेदाध्ययन न करतां वेदाभिमानाचा फुकट डौल मिरवितात त्यांनी शास्त्रीबुवांचें हें अुदाहरण लक्षांत ठेवावें. शास्त्रीबुवा व्याकरण, न्याय व मीमांसा पढलेले असल्यामुळे अर्थज्ञानाचा प्रश्नच अुरला नाही.

पढलेल्या विषयांची शास्त्रीबुवांना विलक्षण अुपस्थिति होती म्हणून कोणाचेंहि शंकासमाधान ते तत्परतेने करीत. याचें कारण शास्त्रांचे पायाभूत असे त्यांचे बारा ग्रंथ टरलेले होते. ते मुखोद्गत असून त्यांची आवृत्ति ते मनांतून अनुक्रमें सदोदित करीत असत. त्यामुळे विषयाचें नेहमी चिंतनहि चालू राही, अुपस्थिति साधे व नवीन कल्पना सुचून विषयावर नवा प्रकाश पडे. प्रसिद्ध अिंग्रजी कादंबरीकार डिकन्स व अलेक्झांडर ड्यूमा हे स्पेटीच्या वेळीं व प्रवासांत आपल्या कादंबऱ्यांचीं कथानकें व पात्रें निर्मीत असत त्याची या वेळीं आठवण होते.

शास्त्रीबुवांच्या दैनिक क्रमांतील दिसण्यास क्षुल्लक पण विद्याभ्यासाचे दृष्टीने महत्त्वाची गोष्ट म्हणजे धर्मशास्त्राने निंदिलेलें, आरोग्य व आयुष्य यांची व परलोकाची हानि करणारें (अस्वर्ग्यम्) असें अतिभोजन ते निश्चयाने टाळीत. त्यामुळे त्यांच्या अध्ययना-ध्यापनांत खंड पडत नसे. जुन्या विद्यांच्या ऱ्हासाचें अतिभोजन हें अेक कारण आहे ही गोष्ट ओ येथीपर्यंत ब्राह्मणास भोजनांत आग्रह करणारे यजमान व तो करून घेणारे ब्राह्मण स्वतः ध्यानांत घेतील का ?

सुमारें वीस वर्षांपूर्वी मध्वसंप्रदायाचे स्वामी श्रीसत्यध्यानतीर्थ हे महाराष्ट्रांत संचारासाठी आले होते. त्यांनी सर्व विद्वानांचा परामर्श घेतला. द्वैती पंडितांबरोबर तोंडी वाद करणारे महाराष्ट्रांत तरी नाहीत. तेव्हा स्वामींनी शास्त्रीबुवांच्या विद्वत्तेचा अनुभव घेण्याच्या अिच्छेने वेदान्तावरच बोललें पाहिजे असें नाही, कोणत्याहि शास्त्रावर बोलावें, म्हणून सुचविलें. त्यांनी आपल्याबरोबर अेक व्याकरणनिष्णातहि विजयेच्छेने आणिला होता. तेव्हा शास्त्रीबुवांनी पाणिनी-च्या अेका दुर्बोध सूत्रावर चर्चेस सुरुवात केली व चार दिवस सभा गाजवून सोडली. तेव्हा त्यांचें शास्त्रनैपुण्य, युक्तिकुशलता, वादविवादाची हातोटी व संस्कृतांतील अस्खलित वक्तृत्व अैकून सर्व सभा थक्क झाली व स्वामींनी महावस्त्र व दोनशे रुपये दक्षणा देअून त्यांची महान् संभावना केली. विजयेच्छा जागच्या जागीं दबून गेली. मात्र शास्त्रीबुवांनी विनयाने कबुली दिली की नैयायिकांच्या परिष्कारयुक्त परिभाषेंत हा विषय आपल्याला मांडतां येणार नाही.

सर्वदर्शनसंग्रहावर टीका लिहिण्याविषयी आत्मविश्वास वाटेना, अशा स्थितींत अेके रात्रीं स्वप्नांत त्यांचे आजे व गुरूंचे गुरु भास्करशास्त्री अभ्यंकर यांची मूर्ति त्यांस स्वप्नांत दिसली. त्यांचे पायांवर मस्तक ठेविलें असतां परमगुरूंनी स्मित करून अनुग्रह केल्यावर तो अत्यानंददायक क्षण— त्याचा क्षणिकत्व हा स्वभावच असल्याने— निघून गेला व ते जागे झाले व लगेच टीका लिहिण्याचा अुद्योग त्यांनी सुरू केला. ही गोष्ट त्यांनी त्या ग्रंथाचे प्रस्तावनेंत स्वतःच दिली आहे.

शास्त्री म्हटला म्हणजे तो केवळ तर्ककर्कश व नीरस असला पाहिजे अशी पुष्कळांची चुकीची समजूत असते. परिनिष्ठित शास्त्री हे साहित्यसागरांतहि चांगले पोहणारे असतात. शास्त्रीबुवांच्या बाह्य गांभीर्याच्या आंत रसिकतेचे कप्पे अुघडे होते. त्यांच्या भाषाशैलींतहि मधून मधून सरसतेचे निदर्शक असे कोटिबाजपणा, विनोद, खोंचदार अुत्तर, अुपहास अित्या-

दींचे फवारे वाचावयास सांपडत. अेकदा बी. अे.च्या वर्गांत कादंबरी शिकवितांना, कादंबरी चंद्रापीडास तांबूल देण्याच्या अगोदर लाजून तोंड फिरविती झाली असा प्रसंग आला. तेथे 'विवर्तितावनतमुखी' असे शब्द आहेत. प्रथम 'विवर्तित' याचा अर्थ तोंड फिरवून असा सरळ सांगून नंतर येथे 'विवर्तितमुखी' याचा अर्थ 'मुरका मारून' असा समजावयाचा हें शास्त्रीबुवांनी सांगितलें. पुढे बाणभट्टाने म्हाताऱ्या द्रविड धार्मिकाचें जें विनोदपूर्ण वर्णन केलें आहे तें सांगतांना शास्त्रीबुवांनी अेखाद्या लहान मुलाप्रमाणे अगदी मोकळेपणानें खो खो हसून हास्यरस अुत्पन्न केला. असो.

अशा तऱ्हेचे हे विद्वद्वरेण्य गेल्या ऑगस्टच्या १४ तारखेच्या आदल्या रात्रीं शास्त्र-गोष्ठी वदून विद्यादेवीचे मांडीवर शयन करते झाले ते प्रभातसमयीं विद्यारूपच झालेले आपले शयनस्थळीं आढळले. अशा तऱ्हेने त्यांस 'अनायासेन मरणम्' प्राप्त झालें. त्यांची कर्तव्यदक्ष पत्नी त्यांचे प्रकृतीची हरअेक तऱ्हेने काळजी घेत असे. त्या पुण्याचें जणूं फळच म्हणून त्या पतीचे अगोदर त्यांच्या स्वागताची तयारी करण्याकरिता सात आठ महिने अगोदर पुढे जाअून शास्त्रीबुवांस आता घेअून गेल्या. खडतर विद्याभ्यासी शास्त्रीबुवांस दीर्घायुष्य लाभ-ण्याचें हें अेक कारण होतें. असो.

महाराष्ट्राखेरीज हिंदुस्तानचे अितर भागांत न्यायमीमांसा, वेदान्त वगैरे शास्त्रांतील पांडित्याचे ध्वज फडकत आहेत. महाराष्ट्रांत फडकणारा व्याकरणाचा ध्वज मात्र आता अुतरला आहे. तो पुन्हा फडकवणारा कोण आणि केव्हा निपजणार हें कोणीं सांगावें ?

---

## हत्तीची भाषा

हत्तीबरोबर बोलावयास त्यास समजेल अशी पुढील परिभाषा आहे.

| संज्ञा | अर्थ | संज्ञा | अर्थ |
|---|---|---|---|
| १ भट | बैस | १३ सम त्रे त्रे | बरोबर अुभा रहा |
| २ समभट | बरोबर बैस | १४ हादी हादी | पाय अुचल |
| ३ म्हल अूठ | अूठ | १५ ढील सम | भीड |
| ४ बोल | बोल | १६ छुम छुम | नाच |
| ५ दम बोल | सावकाश बोल | १७ लगी लगी | मार |
| ६ भर | हात वर कर | १८ आअू | पाय लांब कर |
| ७ भिड | पुढे ये | १९ लुलु | चवरी पंखा वार |
| ८ म्हलधा | चाल | २० झवक झवक | मान खाली कर |
| ९ धर धर धर | जलद चाल | २१ झुक झुक | सोंड मार |
| १० हालो | पुढील पाय अुचल | २२ ताल | मान अुचल |
| ११ भिर भिर | सोड, टाक | २३ भड भड | बाजूस फीर |
| १२ धत्त धत्त | मागे सर | २४ पुरु पुरु | गुडध्याने चाल |

—हत्तीचें वर्णन, राजविलास ग्रंथ, शके १७७८.

# नागरी ध्वनिलिपि



(लेखक— श्री. ग वा. तगारे)

भाषाशास्त्रावर मराठींत लिहितांना परिभाषा व ध्वनिलिपि ( Phonetic script ) या दोन प्रमुख अडचणी अुभ्या राहतात. यांपैकीं मराठी भाषाशास्त्रीय परिभाषेची माझी जंत्री महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या परिभाषा चर्चा-मंडळासमोर असून तिच्यांतील न्यूनाधिक्य पुरतें-सरतें करून प्रसिद्ध झाल्यावर ती अडचण थोडीबहुत दूर होअील अशी आशा आहे. नागरी ध्वनिलिपीच्या प्रश्नाला मीं आठ नअू महिन्यांपूर्वी म. सा. पत्रिकेंतून* चालना देण्याचा प्रयत्न केला पण त्या प्रश्नास अजून कोणीं हात घातल्याचें दिसत नाही. मी भाषाशास्त्रज्ञ नसलों तरी या प्रश्नाचें महत्त्व लक्षांत घेअून याच्या व्यापकपणाकडे महाराष्ट्रांतील सुबुद्ध वाचकांचें लक्ष वेधूं अिच्छितों. अपेक्षा अशी आहे की, महाराष्ट्रीय भाषाशास्त्रज्ञ या विषयाकडे लक्ष देअून मराठींत भाषाशास्त्रीय लिखाण होण्याच्या आड येणारी ही धोंड दूर करतील.

सामान्य समजूत अशी आहे की, नागरी लिपि सर्व भाषांतील सर्व वर्ण संपूर्णतया व्यक्त करूं शकते. पण अरबी, फारसी, अुर्दू, अिंग्लिश, फ्रेंच किंवा जर्मन भाषांतील ध्वनि-समूह व्यक्त करतांना तिच्या मर्यादा स्पष्ट होतात; अुदाहरणार्थ, अरबीमध्ये त्, द्, ल्, झ्, स् व ज् हे कंठ-स्थानयुक्त वर्त्स्य ध्वनि आहेत. याशिवाय साधे वर्त्स्य (Alveolar) त्, द्, स्, ज् असून वर्त्स्य-तालव्य ल् आणि झ् आहेत व दन्त्यमध्यस्थानीय संघर्षी (Fricative) द् वेगळाच आहे. अरबी 'ह'चे अुपालिजिह्व संघर्षी (Pharyngeal fricative) व स्वर यंत्रमुखी संघर्षी असे दोन अुच्चार आहेत; पण अघोष महाप्राणांना अरबी ح व ه ला नागरी ह् हा स्वरयंत्रमुखी घोष संघर्षी योग्य प्रतीक नव्हे.

अरबी लिपि आदर्श नव्हे. ती सर्व वर्ण व्यक्त करूं शकते असें मला म्हणावयाचें नाही. जोय (ط), लाम (ل) व जीम (ج) या चिह्नांवर अेकापेक्षा अधिक वर्ण व्यक्त करण्याचा प्रसंग येतो हें मान्य. पण नागरी लिपींत सुधारणा झाल्याशिवाय ती सर्व अरबी ध्वनि व्यक्तअूं शकणार नाही हें खचित.

स्पष्टोच्चारणाबद्दल प्रसिद्ध असलेल्या मॅनमधील पुढील अुतारा नागरींत लिहिण्याचा प्रयत्न करा.

Niemand kann zwei Herren dienen ; denn entweder wird er den einen hassen, und den andern lieben ; oder er wird sich dem einen unterwerfen, und den andern verachten. Ihr könnet nicht Gott dienem, und dem Mammen.

---

* 'मराठीच्या भाषिक अभ्यासाच्या कांही दिशा' म. सा. पत्रिका पृ. १२१-१२३ अेप्रिल १९४२.

Darum sag ich euch: Sorget nicht ängstlich für euer Leben, was ihr essen werdet, noch für euern Leib, was ihr anziehen werdet Ist nicht das Leben mehr als die Speise. und der Leib mehr als die kleidung ?

—Das heilige Evungelium Jesu Christi nach Matthäus 6.24-25.

भावार्थ : कोणीहि दोन धन्यांची सेवा करूं शकत नाही (कारण) तो अेकाचा द्वेष किंवा तिरस्कार करील व दुसऱ्यावर प्रेम करील; अथवा तो अेकाला नमून वागेल (unterwerfen) व दुसऱ्यास तुच्छ लेखील (verachten). तुम्ही परमेश्वर व मॅमॉनची सेवा करूं शकत नाही.

म्हणून मी तुम्हांस म्हणतों : स्वतःच्या जीविताची, खाण्यापिण्याची, वस्त्रप्रावरणाची चिंता करूं नका. जीवित हें अन्नापेक्षा व शरीर हें वस्त्रापेक्षा श्रेष्ठतर नाही काय ?

येशू ख्रिस्ताच्या सुप्रसिद्ध अशा पर्वतावरील प्रवचनांतून (Sermon on the mount) हा अुतारा घेतला आहे.

चिरपरिचित अशा अिंग्लिशमधील पुढील अुतारा देवनागरींत लिहिणें किती कठीण आहे पाहा :

But the age of chivalry is gone. That of sophisters, economists and calculators, has succeeded, and the glory of Europe is extinguished for ever. Never, never more shall we behold that generous, loyalty to rank or sex, that proud submission, that dignified obedience, that subordination of the heart which kept alive, even in servitude itself, the spirit of an exalted freedom.

बर्कच्या फ्रेंच राज्यक्रांतीवरील पुस्तकांतून घेतलेला हा अुतारा 'बट् द अेज ऑफ शिव्हल्री अिज गॉन' अशाप्रमाणे लिप्यंतर केला जाअील पण अिंग्लिश ध्वनि मराठी ज्, फ्, ट् या ध्वनींपेक्षा भिन्न आहेत आणि त्यामुळे अिंग्रजी शिकवतांना मराठी अुच्चार लिहून देण्याची जुनी पद्धत शिक्षणशास्त्रांत निकामी ठरली.

सध्याच्या नागरी लिपींत परभाषांतील ध्वनि लिहितां येत नाहीत हें वरील अुताऱ्यांवरून स्पष्ट होअील.

मराठीवर प्राचीन द्राविडी, मध्ययुगीन पर्शो-अरेबी व अर्वाचीन युरोपियन भाषांचे परिणाम झाले आहेत. अर्थातच मराठीचा अभ्यास करतांना या भाषांचे संबंध येणें अपरिहार्य असतें. पण मराठीवर मराठींत लिहितांना परभाषांचें मराठीकरण कसें झालें याचे नियम वा अुदाहरणें देणें किती कठीण होतें तें पहा. मराठींतील, किंमत, खबर, गरीब, जालीम, फारशी हे शब्द अनुक्रमें फारसींतील कीमत्, खबर्, ग़रीब्, जालिम् व फारसी (Persian) या शब्दांपासून व्युत्पादतात, पण फारसी ख् व ग् कंठ्य नसून जिह्वामूलीय संघर्षी (fricative) आहेत. ज् तालव्य नसून दंत्यसंघर्षी आहे व फ् ओष्ठ्य नसून दंत्योष्ठ्यसंघर्षी आहे. तसेंच अुपर्युक्त शब्दांतील ठळक अक्षरांतील अ विवृत अग्रस्वर (open front vowel) असून त्या जुन्या फारसी ध्वनींचें मूल्य मराठी 'अ'पेक्षा निराळें आहे.

सद्यःकालीन मराठीच्या बोलभाषांतील शब्द किंवा हिंदी व बंगालीच्या बोलभाषा आपण यथातथ्य रीतीने लिहूं शकत नाही ही गोष्ट डॉ. कत्र्यांच्या कोंकणीवरील पुस्तकांतील शब्दसूचीचें किंवा प्रा. चतर्जींच्या Orgin and Development of Bengali या ग्रंथांतील ध्वनिवाचक लिपीचें नागरीकरण करतांना आढळून येतें.

वर्णध्वनिशास्त्राचा (Phonetics) अंतर्भाव ट्रेनिंग कॉलेजांतून झाल्यामुळे त्याचें महत्त्व, ध्वनिलिपीची उपयुक्तता, स्वाभिमानाचा प्रश्न सोडला तरी युरोपमध्ये रूढ झालेली आंतरराष्ट्रीय ध्वनिलिपि शिकतांना येणाऱ्या अडचणी व नागरी ध्वनिलिपि रूढ झाल्यास तिची सुलभता व परभाषा शिकण्याच्या दृष्टीने उपयुक्तता अित्यादि प्रश्नांत न शिरतां (कारण त्या गोष्टी उघड आहेत) नागरी ध्वनिलिपि तयार करतांना कोणकोणत्या गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत तें संक्षेपतः सांगतों.

१. नागरी ध्वनिलिपि सर्वांस परिचित अशा देवनागरीवर आधारलेली असली तरी तिचें स्वरूप ध्वनिपृथक्करणात्मक असावें.

२. सर्व देवनागरी मूलाक्षरें तिच्यांत स्वीकारून ध्वनिचिह्नांची संख्या व लिपीचा बोजडपणा न वाढवतां International Phonetic Association च्या ध्वनिचिह्नांप्रमाणे तिच्यांत आटोपशीरपणा व व्यापकपणा आणावा.

३. नागरी लिपि सुधार-समितीचें व नागरी ध्वनिलिपीचें कार्य भिन्न असल्यामुळे लिपिसुधारसमितीचे निर्णय नागरी ध्वनिलिपीवर बंधनकारक आहेत असें मानूं नये.

४. ही ध्वनिलिपि द्राविडी, पर्शो-अरेबी व मुख्यतः अिंग्रजी, फ्रेंच व जर्मन या युरोपियन भाषांतील ध्वनि व्यक्त करण्यास समर्थ असावी.

५. सलमता व काटकसर या दृष्टींनी सर्वसाधारण मुद्रणचिह्नांपलीकडे जाऊन नवीन मुद्रणचिह्नें तयार करण्याचा प्रसंग शक्य तोंवर आणूं नये.

परकीय भाषा शिकतांना, लोकगीतें किंवा बोलभाषांचें शास्त्रीय संकलन करतांना व भाषाशास्त्रावर लिहितांना नागरी ध्वनिलिपीचें महत्त्व अमोल आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन महाराष्ट्रांतील भाषाशास्त्रज्ञांनी या प्रश्नाकडे लक्ष द्यावें अशी विनंती आहे.

---

# 'छंदोरचने'विषयीं

## (१) गुजरातींत व (२) मराठींत

(लेखक—श्री. ना. ग. जोशी)

**(१) गुजरातींत**—'गुजरात साहित्य सभा' या अमदावादच्या प्रसिद्ध संस्थेने कै. डॉ. पटवर्धनांचा 'छंदोरचना' ग्रन्थ व त्याच्या अनुरोधाने 'गुजराती छंदोरचना' या विषयाचा फारच सुंदर परामर्श घेतला आहे. १९४१–४२ या कार्यवर्षांत छंदोरचनाविषयाचा ऊहापोह करणारीं तीन व्याख्यानें तीन अभ्यासी साहित्यिकांकडून देण्यांत आलीं. पाहिलें गुजरातचे साहित्याचार्य व विवेचकश्रेष्ठ प्रो. रामनारायण विश्वनाथ पाठक यांनी दिलें. त्यांत त्यांनी 'आवर्तना'दि परिभाषा, 'षड्-अष्टमात्रका'दि मात्रासमूह, गुरु-अुच्चारयुक्त 'संख्यामेळ' छंद म्हणजेच डॉ. पटवर्धनांच्या परिभाषेंतील (अभंगादि) 'छंद' वगैरे गोष्टींच्या तौलनिक चर्चेने "गूजराती गेय कवितामां पिंगळ-(शास्त्र)" याचा विचार केला आहे. दुसरें व्याख्यान श्री. चुनीलाल वर्धमान शाह या प्रसिद्ध साहित्यिकानें खुद्द "कवि माधव जूलियननो 'छंदो-रचना' ग्रंथ" याच विषयावर दिलें. त्यांत त्यांनी 'छंदोरचने'चा मार्मिक परिचय करून दिला आहे. त्याच वेळीं अध्यक्षस्थानावरून श्री. रामनारायणभाअी पाठक यांनी 'छंदोरचने'ची मौलिकता योग्य शब्दांत सांगून आपले मतभेदहि दर्शविले आहेत. तिसरें व्याख्यान श्री. केशवराव का. शास्त्री या गुजरातीच्या प्रसिद्ध पंडितांनी दिलें असून त्यांत "देशी ठेक्यांच्या गीत-पद-कडव्यांचें मूळ" शोधतांना कै. केशव ह. ध्रुव व कै. नरसिंहभाअी दिवेटिया या गुजरातच्या सूक्ष्मग्राही पंडितांच्या छंदोरचनाविषयक मतांशीं कै. डॉ. पटवर्धन यांच्या कांहीं मतांची तुलना करून आपले मतभेद व्यक्त केले आहेत. वरील तिहींच्या भाषणांचा सविस्तर वृत्तान्त 'गू. सा. सभे'च्या १९४१–४२ च्या 'कार्यवहीं'त आलेला आहे. त्यांतील महत्त्वाचे अुतारे माझ्या स्पष्टीकरणांसह खालीं दिले आहेत.

**श्री. रामनारायण पाठक**—"आपण म्हणतों कीं 'मनहर' छंदांत ऱ्हस्व-दीर्घांचें बंधन नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे की त्यांत गुरु व लघु अुच्चारांत भेद नाहीं; अर्थात् लघु-वर्ण गुरु म्हणून गुरूसारखाच बोलला जातो. लघूला गुरु मानूनच येथे काम चालतें, जसें—

पे रं भ ना हिं दु पा द - शा ह पा से पो ते र ह्यो
क च्छी र ज पू त सु त ला रा स र दा र नो।"

[गुजराती 'मनहर' छंद हा 'वनहरिणी' ह्या 'छंदोरचना'निविष्ट छंदाचा पहिला चरण व 'हरिभगिनी' छंदाचा दुसरा चरण अशा रचनेच्या द्विपद्यांचा बनलेला आहे.]

"प्रत्येक (गायकी) गीतांतील गेय बीज आपण बरोबर शोधून काढूं शकूंच असें नाहीं. ...तें गाअिलेलें अैकलें नसेल आणि गीताच्या मापेंतच (मात्रांच्या गटांच्या) संधीचें स्वरूप बरोबर व्यक्त झालें नसेल तर गेयत्वबीज आपणांस सांपडणार नाहीं...(स्वर किंवा मात्रांचे)

---

ना. ग. जोशी, ७ महाराष्ट्र सोसायटी, प्रो. अभ्यंकरांचा बंगला, अहमदाबाद ६.

अेवढे लांब लांब विराम किंवा विलंबन गीताच्या फक्त वाचनाने कळणार नाही... पिंगळ-शास्त्र भाषेंत प्रतिबिंबित झालेल्या छंदःस्वरूपाचा अभ्यास करतें. संगीताच्या योगें जें स्वरूप व्यक्त व्हावयाचें तें झालें नसेल तर तो त्या शास्त्राचा प्रांतच नव्हे." (पहिल्या व्याख्यानांतील अुतारे.)

"माझ्या अभ्यासासाठी सद्‌गत माधव जूलियनांचें 'छंदोरचना' पुस्तक मीं बरेच वेळां वाचलें आहे. त्यांनी छन्दामध्ये जी नवी व्यवस्था दाखल करण्याचा प्रयत्न केला आहे ती त्या विषयाच्या अभ्यासासाठीच फार महत्त्वाची आहे. अभ्यास करतांना कै. पटवर्धनां-बरोबर माझा कित्येक बाबतींत मतभेद झाला. कित्येक संस्कृत वृत्तांना मध्येच मात्रा वाढवून आवर्तनयुक्त केलें आहे तें मला अशास्त्रीय वाटतें; अुदा०—भागवताच्या वेदस्तुतीचा श्लोक 'जय जय जह्यजा' अि० (पृ. २७० वृत्त ५०२)"

[प्रस्तुत श्लोकाचा 'ज य ज य ज य् ऽ ऽ' असा प्रथम मात्रासमूह दिलेला आहे. तो श्री. पाठक म्हणतात त्याप्रमाणे 'ज य ज य ज य् ˘ ˘' असा दिलेला नाही. ऽ ऽ या दोन अवग्रहांनी मात्रा सुचविल्या नसून संभवनीय खटका सुचविला आहे. वृत्ताच्या मात्रासंख्येंत ढवळाढवळ नाही. फक्त शक्य तें आंदोलन सुचविलें आहे म्हणून तें पूर्ण शास्त्रीय आहे. तसेंच 'अवितथ' वृत्त यतिरहित आहे असें श्री. पाठकांचें म्हणणें अवास्तव वाटतें.]

"दुसरी चूक त्यांच्या मात्रागणनाच्या पद्धतींत दिसते; अुदा०—'पाखरा येशिल का परतून्' अित्यादि. यांत पटवर्धन अंत्य 'न'ला स्वररहित मानतात व अष्टमात्रक आवर्तन मध्येच पाडतात. त्याच्या पठनांत व गायनांत ओळी जशा जोडल्या जातात व पुन्हा म्हटल्या जातात त्या रीतीने गाअिल्यानेच आवर्तनात्मक मात्रा (= संधि) दिसल्या पाहिजेत. याप्रमाणे—

पाखरा। येशिल का पर। तून पाखरा। येशिल का पर। तून
मत्प्रेमाने। दिल्या खुणांतुनि। अेक तरी अठ। वून पाखरा।...

'तून पाखरा' पण अष्टमात्रक झालें पाहिजे व त्याच्या मात्रा मोजल्यास 'तून'मधील 'न'ची अेक मात्रा समजली पाहिजे." [या अुदाहरणांतील विवेचन मार्मिक आहेच. पण श्री. राम-नारायणभाअी मानतात त्याप्रमाणे 'न' पूर्ण अुच्चारून हें गीत प्रत्यक्ष मराठींत गायलें जात नाही. शिवाय त्यांच्याच संस्कृत नमुनापद्यांतील 'विजयते रामदूत हनुमान्' या ओळींत अुचार व व्याकरण या दोन्ही दृष्टींनी 'न्' स्वररहितच रहातो. मात्र गातांना अेकंदर मात्रांचा आठ-आठांचा गट पडत असल्यामुळे ही अेक मात्रेची कूस 'न्'नंतरच्या विरामांत भरून निघते. अेवढें खरें की, अशा चालीचें पद्य गुजरातींत श्री. पाठक यांनी दाखविल्याप्रमाणे म्हटलें जातें व 'गुजराती छंदोरचनें'त त्याचें पृथक्करण त्यांनी दाखविल्याप्रमाणेच होअील.]

"श्री. पटवर्धन 'प्लुत' मात्रा देतातच, पण ती पद्धति त्यांनी पूर्णपणें अमलांत आणली नाही, व म्हणून सर्व छंदांची शास्त्रीय व्यवस्था होअू शकली नाही. पण मानवप्रयत्न असेच हळूहळू शास्त्रीयत्व प्राप्त करीत असतात. मला स्वतःला कै. पटवर्धनांची भर फारच महत्त्वाची वाटते." (अध्यक्षीय भाषणांतील अुतारे.) [श्री. रामनारायणभाअी स्वतःच 'गुजराती छंदो-रचना' नांवाचा संशोधनपूर्ण ग्रंथ लिहीत आहेत. वरील 'साहित्यसभे'नेच त्यांना सदरहू विनंती केलेली आहे.]

**श्री. चुनीलाल शाह**—" 'छंदोरचना' ग्रंथ वस्तुतः कवितेच्या बाह्य कलेवराबरोबर संबंध असलेला अेक पिंगळशास्त्राचा ग्रंथ आहे; परंतु त्याच्या रचनेंत अनेक प्रकारची नवीनता आहे. सबंध ग्रंथाचें परिशीलन केल्यास आपणाला (गुजरातेंतील विद्वानांना) गुंतागुंतीचीं

वाटणाऱ्या कोडीं अुकलण्यासाठीं चांगल्या रीतीनें मदत मिळेल अितकी सामग्री त्यांत सामावलेली आहे.

"ज्याला आपण 'Rhythm रिदम्' म्हणतों तीच (पटवर्धनांची) 'लय' आहे. अक्षर ही फार अगत्याची गोष्ट आहे. अक्षर कांहीं वर्ण नव्हे. अेका वेळीं तोंडांतून बाहेर पडणारा ध्वनि तें अक्षर होय; मग लिहितांना अेक किंवा अनेक चिह्नांचा लिपीमध्ये खुशाल अुपयोग होवो.

"अशींच (अभंगादि सारखीं दीर्घोच्चाराचीं) लोकगीतें व भजनें आपल्या (गुजराती) प्राचीन पद्यसाहित्यांत आहेत. हीं पद्यें वर्णसंख्यात्मक 'छंद' स्वरूपाचीं असल्यामुळे प्रत्येक लघु-गुरु दोन मात्रांच्या काळाचा मानावयाचा आहे."

**श्री. केशवराम शास्त्री**—"स्वर्गस्थ दि. ब. केशवलाल ह. ध्रुव यांचीं 'पद्यरचनेची अैतिहासिक आलोचना' हीं भाषणें व कवि माधव जूलियन यांचा मराठी 'छंदोरचना' ग्रंथ (छंदांच्या सूक्ष्म, अैतिहासिक विकासाच्या अभ्यासासाठीं) बरेचसें मार्गदर्शन करतात. 'छंदोरचनें'त महत्त्वाची प्रगति साधलेली आहे. जरूर, परिभाषेच्या विषयांत कित्येक मतभेद आहेत; अुदा०—'लय' व 'ताल' या विषयांत. बाकी छंदःशास्त्राचे ताल—ज्याला मी (स्व. नरसिंहरावभाअींनी 'शब्दनृत्य' शब्दानें सुचविल्याप्रमाणे) 'भार' म्हणतों त्या विषयांत स्व. माधव जूलियनांची मीमांसा अवश्य मौलिक आणि माननीय झाली आहे.

"प्राकृत भाषेला आवर्तनी छंद साधून गेले होते; व मात्रासंख्यात्मक छंदांची अुत्पत्ति प्राकृत भाषांतून झाली ही गोष्ट स्व. माधवजूलियनहि स्वीकारतात. सूत्रकालांत त्याचा पाया घातला गेला. कांहीं मतभेद सोडले तर अनेकविध देशी बंधांची तात्त्विक मीमांसा करण्यांत स्व. माधव जूलियनांनी निर्देशिलेला रहदारीचा मार्गसुद्धा खूप साहाय्यकारक होअील असें मला वाटतें." [श्री. शास्त्री यांच्या म्हणण्याप्रमाणे "छंदोगत ताल (किंवा माधवजूलियनांची 'लय') म्हणजे अनियंत्रित स्थितींतील 'शब्दनृत्या' (Rhythm)साठीं येणारा 'भार' होय. त्याचा संगीताच्या तालाशीं मुळींच संबंध नाहीं: दोन्ही स्वतंत्र प्रकार आहेत. स्व. माधव-जूलियनांच्या हें लक्षांत आलें नाहीं, पण स्व. नरसिंहभाअींना ही गोष्ट समजली होती." खरोखर कै. पटवर्धनहि 'लय' शब्द याच Rhythmच्या अर्थानें वापरतात. आवर्तनें हीं त्या 'भार'चें, Rhythmचें वाहन आहेत. त्याला 'गायकी'च्या लयीचें किंवा संगीतांतील विविध तालांचें कडक बंधन नाहीं. त्या आवर्तनांची नैसर्गिक, वाचतांना अनुभवाला येणारी, 'गति'तीच शब्द-निष्ठ लय, तीवरच मात्राक्षरांतील ताल किंवा चाल अवलंबून असते. मात्र क्वचित् गायकीचा ठेका व साधी चाल यांत अंतर असतेहि नाहीं. विशेषतः आद्य—तालकसहित व अंत्य विरामावांचून असणाऱ्या पद्यप्रकारांत नैसर्गिक आवर्तनें व गायकीचा तदनुकूल ठेका फारच स्वाभाविकपणें मिळतात. म्हणून आपण फार तर असें म्हणूं की, अनावर्तनी वृत्तांत लय (म्हणजे शब्दनृत्यात्मक भार) अनियमित (irregular rhythm) असते पण ती भासमान होतेच, कारण त्या वृत्तांचीहि कांहीतरी चाल असतेच. आवर्तनी जातिछंदांतून ती नियमित (regular rhythm) असते. सर्व पद्यजगतांतील लय शब्दार्थनिष्ठ आहे. संगीतांत ती स्वर-काल-निष्ठ असते. संगीतांतील लय विविधविलासी व पूर्ण नियमित असते. अशा प्रकारें पद्यांतील छंदोगत (metrical) लय व संगीतांतील स्वरगत (notes) आणि शिल्पकलेंतील रेखागत (lineal) लय यांतील फरक बरोबर जाणले पाहिजेत. श्री. केशवलालशास्त्री यांच्या तौलनिक विवेचनानें तें स्पष्ट होण्यास चांगली मदत होते. ते स्वतः प्राकृतभाषाकोविद, संगीतशास्त्र जाणणारे व संशोधक वृत्तीचे श्रेष्ठ साहित्यिकशास्त्री आहेत.]

(२) **महाराष्ट्रांत**— गुजरातेंत ज्या निःपक्षपाती वृत्तीने 'छंदोरचने'चा अभ्यास व दोषनिदर्शक चिकित्सा होत आहे तशी तटस्थ वृत्ति महाराष्ट्रांतील 'छंदोरचने'च्या टीकाकारांत विशेषशी आढळत नाही. महाराष्ट्रीय शास्त्री-पंडितांची शब्दप्रामाण्यवृत्ति गेली नसून ते 'पिंगला'च्या आवती-भोंवती घुटमळत राहिले आहेत; आणि नवीन वृत्तीच्या पंडितांमध्ये वैयक्तिक दोषैकदृष्टिच जास्त आहे. सुदैवाने श्री. खुपेरकरशास्त्री, श्री. रंगाचार्य रड्डीशास्त्री व श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांसारख्या अधिकारी-अभ्यासी लेखकांनी समतोलवृत्ति दाखविली आहे. प्रत्यक्ष छंदःशास्त्राच्या विकासाच्या दृष्टीने श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांनी 'पद्यमीमांसें'त कै. पटवर्धनांच्या जातिविषयक मतांचा घेतलेला परामर्श विचारणीय आहे. त्यांच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेच्या निमित्ताने प्रसिद्ध विद्वान् अभ्यासक प्रो. बनहट्टी यांनीहि कांही आक्षेप घेतले असून त्यांचाच अनुवाद 'साधना' मासिकाच्या संपादकांनी 'पद्यमीमांसे'च्या परीक्षणांत केलेला आहे. प्रो. बनहट्टी व साधनेचे संपादक यांनी छंदःसंशोधन कितपत केलें आहे किंवा माधवराव पटवर्धनांना न समजलेलें 'मर्म' त्यांना कितपत 'आकलितां' आलें आहे तें पुराव्याच्या अभावीं समजणें शक्य नाही. पुस्तकाची ती प्रस्तावना व ज्या पुस्तकांचें तें परीक्षण आहे त्याच्या लेखकांनी मात्र कै. पटवर्धनांच्या आवर्तनादि गोष्टी स्वीकारून पद्यमीमांसा केलेली आहे. त्यांचे कांही मतभेद आहेत. ते विशेषतः चरणांतील अंतर्गत आवर्तनांचें नियमन करण्याच्या बाबतींतील आहेत; कांही परिभाषाविषयक आहेत तर कांही मूलभूत सिद्धान्तावरील आहेत. त्यांचा थोडक्यांत विचार करणें योग्य होईल.

**श्री. सहस्रबुद्धे** यांचें (१) म्हणणें असें की कै. पटवर्धनांनी 'छंद'नामक तिसऱ्या पद्यविभागांतील सर्व अक्षरें गुरु मानावींत असें म्हटलें तें योग्य नाही. परंतु वरच प्रो. रामनारायणभाईंनी दाखविल्याप्रमाणे दीर्घोच्चारांची पद्धति गुजराती-(बंगाली) मापांतहि आहे. मराठींतहि ती दररोजच्या अनुभवाची आहे. त्यांच्या एकंदर विवेचनांत संगीताचा वाजवीपेक्षा जास्त पगडा दिसून येतो. त्या बाबतहि प्रो. पाठकांचे विचार कै. डॉ. पटवर्धनांच्या विचारांशीं जुळते आहेत. श्री. केशवरामशास्त्री यांनीहि ती गोष्ट स्पष्ट केली आहे. स्वतः प्रो. रामनारायणभाई संगीततज्ज्ञ आहेत ही गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. [आक्षेप—'सह्याद्रि' फेब्रुवारी १९४१.]

(२) 'रसना' जातीच्या पृथक्करणाच्या निमित्ताने संगीतांतील स्वरलेखनाच्या आधारें कांही जातींचें नवीन प्रकारें नियमन करतां येणें शक्य आहे असें त्यांनी दाखविलें तें खरोखरच स्वागतार्ह आहे परंतु ही गोष्ट संगीतसुलभ जातींनाच लागू पडेल. सर्वच जातिरचना कांही संगीतासाठी झालेली नाही. तेव्हा त्या शास्त्राच्या अनुरोधाने चरणांतर्गत प्लुत मात्रा किंवा कालमान शोधून त्याप्रमाणे रचना सांगणें नेहमीच बरोबर होणार नाही. त्यापेक्षा जी रूढ चाल असते तिच्या अनुरोधानेच जसे उच्चार होत असतील त्याप्रमाणे विचार केल्यास बरें. जेथें चालीची भिन्नता संभवेल.तेथे नियमन थोडें निराळें होईल, पण तें छंदोगत उच्चारांवर अधिष्ठित असेल, संगीतगत स्वरांवर नव्हे किंवा तालांवर नव्हे. त्यांनी चरणांतील आवर्तनांतील प्लुत मात्रा योजून 'रसना' व 'मोहिनी' जातींचें पृथक्करण केलेंच आहे. पण 'आत्मवंचना' या नवीन जातीच्या 'आकळे न अघटित घटना । तव दयाघना ।' इ० पद्याला भृंगावर्तनी व पद्मावर्तनी आहे असें म्हटलें आहे तें कसें तें स्पष्ट होत नाही. तालाच्या दृष्टीने तें अष्टमात्रक मानलें पाहिजे असें वाटतें. याविषयी त्यांनी खुलासा करणें इष्ट आहे. ['साधना' जून १९४२.]

(३) परिभाषेसंबंधी चिकित्सा करतांना त्यांनी (अ) 'लय' संज्ञेला विरोध दाखविला आहे. 'लय' किंवा 'ताल' हे जरी पूर्वी संगीतशास्त्रांत निश्चित अर्थाने वापरले होते तरी मागे दाखविल्याप्रमाणे ते शब्द 'छंदोरचनें'त विस्तृत अर्थाने वापरले आहेत. संज्ञा कुठल्या वापराव्या हा मूळ लेखकाचा प्रश्न आहे; त्यांची मर्यादा स्पष्ट असावी म्हणजे झालें. संकेताने त्याच रूढ होतात. कै. माधवरावांच्या 'लय' संज्ञेचा अर्थ 'इंग्रजी 'rhythm' सारखा आहे. ती rhythm तीन प्रकारची असते, त्यांपैकी संगीतशास्त्र व शिल्प-चित्रादि कला यांतील लय भिन्नार्थक असून येथे फक्त छंदान्तर्गत आवर्तनांतील लय अभिप्रेत आहे. तीच इंग्रजींतील metrical rhythm. याविषयींचें विवेचन गुजरातच्या पंडितांनी उत्तम केलें असल्यामुळें पुनरुक्ति करीत नाही. पद्याच्या संपूर्ण लयीलाच 'लय' म्हणावें व आवर्तनांतर्गत लयीला 'ताल' (किंवा गुजराती 'भार') म्हणावें. कै. माधवरावांनी ज्या कांही ठिकाणी लय, ताल समानार्थक वापरले आहेत, त्या ठिकाणीं ते सामान्य विस्तृत अर्थाचे वाचक पर्याय आहेत. मात्र थोडीशी जास्त खबरदारी घेणं योग्य झालें असतें. (ब) 'मात्रा' संज्ञेच्या व्याख्येंतील 'आखूड' अक्षर याचा अर्थ असाच (genus) 'सामान्य जाति'वाचक आहे. लिखित स्वरूपांत ऱ्हस्व असूनहि कांही अक्षरें जशीं दीर्घ उच्चारलीं जातात, तशींच दीर्घ लिखित अक्षरेंहि 'आखूड' उच्चारिलीं जातात. म्हणून 'आखूड' हा मोटा शब्द मानून त्याचे ऱ्हस्व व ऱ्हस्वोच्चारित दीर्घ असे भाग पाडले म्हणजे झालें. पण व्याख्येंत मात्र उच्चारदर्शक 'आखूड' शब्दच योग्य होईल. त्याप्रमाणेच (क) 'अक्षर' शब्दाच्या व्याख्येसंबंधी जो आक्षेप घेतला गेला आहे त्यांतहि प्रत्यक्ष उच्चारावर अधिष्ठित अशा शास्त्रीय परिभाषेचाच अवलंब केलेला आहे. Phonetically म्हणजेच 'उच्चारतत्त्वानुसार' अक्षरांचे स्वर किंवा व्यंजन असे भेद असत नाहीत: ते नंतर व्याकरणशास्त्र करतें. तेव्हां उच्चारावर आधारलेल्या छंदोरचना-शास्त्रांतील व्याख्यांपैकी 'अक्षरां'ची व्याख्या देतांना जास्तींत जास्त स्पष्ट व सामान्य अशीच परिभाषा वापरली पाहिजे. (ड) 'यति'च्या व्याख्येंतील 'स्वाभाविकपणें' थांबणें याला आक्षिप्त मानण्याचें कारण नाही 'यति म्हणजे थांबणें' असें म्हणून चालणार नाही. तसे आपण चरणान्तींहि थांबतों. पण तें थांबणें 'विराम' होईल. कारण चरणान्तीं कांही मात्रांची कूस राहिलेली असते. त्या वेळच्या थांबण्यास 'विराम' अशी पटवर्धनी संज्ञा आहे. शिवाय निश्चित यतींवांचून किंचिन्मात्र थांबण्याचे (pauses) 'खटक्या'चे प्रकार आहेतच. म्हणून वरील आक्षिप्त शब्द differentia वाचक– असाधारणधर्मवाचक म्हणून आवश्यक मानले पाहिजेत. (इ) 'यतिभंगां'ची व्याख्या मात्र थोडीशी सदोष आहे. कारण ती तार्किक स्वरूपाची न होतां वर्णनात्मक व्याख्या झाली आहे. "यतिभंग म्हणजे यतिस्थानीं शब्दपूर्ति न झाल्यास यतीमुळे शब्दाचे चमत्कारिक तुकडे पडण्याने होणारा दोष" यांच्या ऐवजी थोड्या फरकाने 'यतिभंग म्हणजे यतीसाठी आवश्यक शब्दपूर्ति न झाल्यामुळे शब्द यतींवांचून तसाच पुढे म्हणावा लागणें' अशा तऱ्हेची व्याख्या अधिक तर्कशुद्ध होईल. ['साधना' नोव्हें. १९४२.]

याप्रमाणे श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांनी मार्मिक शंका घेतल्या, त्यांचा यथामति विचार केला. त्यांच्या लेखनांत वृथा दर्प नसून निःपक्षपाती विचार आहेत. महाराष्ट्रांतील इतर विद्वानांनीहि अशीच अधिक चर्चा करावी असें (गुजराती अभ्यासकांच्या तुलनेने) वाटतें.

---

# वानरी तेलाचा प्रकार



(लेखक— प्रा. दत्तो वामन पोतदार)

'भाऊसाहेबांची बखर' या नांवाने प्रसिद्ध असलेल्या अैतिहासिक बखरींत अगदी प्रारंभी-प्रारंभींच्या भागांत पुढील विधानें आहेत :—

"राजश्री बाळाजी पंडित प्रधान (यांस) ××× शिकेकटार दिली, सत्पुरुषाचे आशीर्वादें-करून दिवसेंदिवस विजेच्या चंद्रमाप्रमाणें चढते कलें राज्य करीत असतां पुढें विनाशकाळें येणार भविष्य आलें तेव्हां वानरी तेलाचा जैसा प्रकार तैसा प्रकार घडला गृह-कलह लागण्यास कारण जाहाले की राजश्री रघुनाथराव दादासाहेब प्रथम स्वारी हिंदुस्थानाचे मोहिमेस पाठविले" अि०

वरील वाक्यांत वानरी तेलाच्या प्रकाराचा अुल्लेख दृष्टान्तासाठी केला आहे. त्याचा अर्थ वास्तविक काय ? सदर बखरीचे विद्वान संपादक कै. रावब. साने यांनी टीपेंत (आवृत्ति १९२२ पृ. २) 'वानरी तेल = सत्यानाश, फडशा या अर्थी असा खुलासा केला आहे. तो अर्थातच मोघम आहे. संदर्भावरून दिलेला दिसतो. मोल्सवर्थ कोशांत वानरतेलाचा अर्थ विशद करतांना म्हटलें आहे की 'धनी पाठपुरावा करील या भरवंशावर क्रूरपणानें वाग-णाऱ्या कोणिका तोंडपुज्याचें नशीब अुलट खातें अशी प्रसिद्ध लोककथा आहे तीस अनुसरून या शब्दाचा प्रयोग करतात.'

या खुलाशावरूनहि भाअूसाहेब बखरींतील वर दिलेल्या वाक्यांचा चांगला खुलासा होत नाही. कित्येक वर्षांपूर्वी ही बखर व मराठी पंचतंत्र हे ग्रंथ अेम्.अे.च्या विद्यार्थ्यांस शिकवीत असतां वि. ल. भावेसंपादित मराठी पंचतंत्राच्या पृ. ६८ वर चंद्रकान्त राजा व वानर यांची गोष्ट आढळली आणि त्यांत 'वानरांतें मारुनि तेल' काढावयाचा प्रसंग वर्णि-लेला वाचून भाअूसाहेबांचे बखरींतील वाक्याचा अुलगडा कांहीसा समाधानकारक झालासें वाटलें, परंतु चांगलें व पूर्ण समाधान कांही झालें नव्हतें. जें झालें तेवढें विद्यार्थ्यांस पढविलें. त्यावर कित्येक वर्षांनी म. सा. प.च्या परीक्ष्यांच्या निमित्ताने पुनः पढाअीचें निमित्त प्राप्त झालें, तेव्हा मूळ संस्कृत पंचतंत्र पाहिलें व अितर संदर्भहि पाहिले. आनंदाची गोष्ट की पंच-तंत्रांतील संदर्भ महाराष्ट्रशब्दकोशांत नोंदून भाअूसाहेब बखरींतील संदर्भाचें वाक्यहि संपादकांनी नोंदलें आहे. पण अर्थ देतांना मात्र मोल्सवर्थचाच प्रायशः अनुवाद केला आहे. मोल्सवर्थचा किंवा शब्दकोशांतील अर्थ वरील बखरींतील विधानांचा अुलगडा पूर्णपणें आणि समाधानकारक रीतीने करूं शकत नाही. कोणा तोंडपुज्याचा येथे संबंध येत नाही, अविचारी, क्रूर कृत्यांचाहि संबंध लागत नाही. शब्दकोशकारांनी तंत्र पांच कथा नववी हा संदर्भहि दिला आहे. त्यांनी तोंडपुजा किंवा क्रूरपणाचा संबंध घेतलेला नाही. आपत्ति किंवा सत्या-नाश अेवढ्या फलिताकडेच दृष्टि ठेविली आहे. परंतु बखरींतील वाक्यांचा खुलासेवार अुल-गडा तेवढ्याने होत नाही. त्याला मूळ पंचतंत्रांतील कथाच लक्ष्यांत घ्यावी लागते.

ती कथा अशी— चंद्र(किंवा चंद्रकान्त) राजाने मुलाच्या हौसेसाठी अेक वानरांचा कळप आणि मेंढ्यांची जोडी पाळली होती. वानरकळपाचा मुख्य (मुद्गल) चाणक्यादि नीतींत निष्णात होता. मेंढ्यांपैकी अेक रोज स्वयंपाकघरांत जाअून अनेक पदार्थ खाअी तेव्हा स्वयंपाकी हातीं सांपडेल तें त्यांस फेकून मारीत. हा कलह पाहून मुद्गलने विचार केला की, येथे ज्या पक्षीं गृहकलह लागला आहे त्या पक्षीं आपली मंडळी घेअून आपण येथून निघून जावें कारण अेखादे वेळीं स्वयंपाकी रागाच्या सपाट्यांत त्या मेंढ्यांवर जळतें कोलीत टाकतील; मग त्याने त्या मेंढ्यांचें केसाळ शरीर पेट घेअील; घाबरलेला मेंढा शेजारच्या गवताळ अश्वशाळेंत शिरेल; मग ती घोडसाळ जळून जाअील; त्यामुळे आंतल्या घोड्यांचीं अंगें भाजून निघतील; मग राजाला चिंता लागेल व तो शालिहोत्रनिपुण वैद्यांस विचारील; ते वैद्य म्हणतील की वानरांची वसा (चरबी = चरबीचें तेल) लावल्याने घोडे बरे होतील. तेव्हा राजा आपल्या सर्वांचें तेल काढील असा आपला सर्वनाश होअील. त्या शहाण्या व म्हाताऱ्या वानराचा अितरांनी अुपहास केला; ते राहिले पण तो गेला. पुढे म्हाताऱ्या वानरांचें भविष्य खरें झालें आणि ते सारे वानर राजाज्ञेवरून मारले जाअून त्यांच्या तेलाचा अुपयोग घोड्यांचेसाठी करण्यांत आला अशी कथा आहे. या कथेंत 'वानरी तेलाचा प्रकार' जो वर्णिला आहे तोच 'माअूसाहेब बखरकरा'ला अभिप्रेत आहे. वानरांचा सत्यानाश झाला तसा मराठ्यांचा पानिपतावर नाश झाला अेवढा मोघम अर्थ बरोबरच आहे. पण तेवढा लक्ष्यांत घेण्यासाठी वानरी तेलापर्यंत दृष्टि पोचविण्याची कांहींच आवश्यकता नव्हती. वास्तविक बखरकारास केवळ सर्वनाशाचीच तेवढी सूचना द्यावयाची नसून त्याच्या कारणाचीहि सूचना करावयाची आहे. तें कारण अविचार, तोंडपुजेपणा किंवा क्रूरता यांपैकी कांही नसून गृहकलह हेंच आहे. आणि बखरकाराने लगेच तेथेच वानरी तेलाचा अुल्लेख केल्याबरोबर तें स्पष्टपणें नमूद केलें आहे. संस्कृत पंचतंत्रांत वानरमुख्याच्या तोंडी पुढील श्लोक स्पष्टपणें घातला आहे—

तस्मात्स्यात्कलहो यत्र गृहे नित्यमकारणः ।
तद्गृहं जीवितं वाञ्छन्दूरतः परिवर्जयेत् ॥

गृहकलहाचें हें सूत्र ध्यानांत घ्यावें तेव्हाच बखरींतील वानरी तेल आणि गृहकलह यांची सांगड पक्की बसते आणि लेखकाच्या मनांतील अभिप्रायाविषयी कांहीहि संशय राहत नाही.

'गृहकलह' आणि 'विनाशकाल' यांबद्दलचा जोड अुल्लेख बखरकाराने पुढेहि अेकदा केलेला आहे तो वरील विवेचनास अुपोद्बलकच आहे. बखरकार (परिच्छेद २६ साने १९२२ आवृत्ति), म्हणतो — तों गृहकलह होअून विनाशकाळीं विपरीत बुद्धि जाहाली. गृहकलह लागला म्हणजे विनाशकाळ जाणावा.

येणेंप्रमाणे बखरींतील 'वानरी तेलाच्या प्रकारा'चा खुलासा केला आहे.

———

# मराठी ग्रंथांच्या कालवार याद्यांची आवश्यकता



(लेखक—श्री. दि. वि. काळे)

साहित्यपत्रिकेंत अंक ५८ अेप्रिल १९४१ मध्ये १९४० सालीं प्रसिद्ध झालेल्या मराठी वाङ्मयाचें परीक्षण घेअून गेल्यानंतर आक्टोबर १९४२ च्या अंकांत १९४१ सालीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचें संकलित परीक्षण देण्याचा योग आला. परंतु मध्यंतरींच्या दीड वर्षाच्या काळांत अशा तऱ्हेच्या परीक्षणांना पहिल्या परीक्षणाच्या वेळेपेक्षा अधिक अनुकूल अशी परिस्थिति निर्माण झाली असें म्हणतां येत नाही. अशा परीक्षणांचें यश हें परीक्षकाच्या स्वतःच्या योग्यतेवर अवलंबून असावें यांत आश्चर्यकारक असें कांही नाही. पण त्याबरोबरच परीक्षणलेखकापुढे नियत मुदतींत प्रसिद्ध झालेलें अेखाद्या विशिष्ट विषयावरील वाङ्मय अगदी सुलभतेने अुपलब्ध असावें याबद्दलहि दुमत होण्याचें कारण नाही. प्रत्येक पुस्तकाचें स्वतंत्रपणें निरनिराळ्या वेळीं परीक्षण अेकेकदा होअून तें छापून गेल्यानंतर फिरून तेंच मत किंवा त्याचा त्रोटक सारांश छापून टाकण्यांत औचित्य मुळीच नसतें. अर्थात् संकलित परीक्षण म्हणजे पूर्वप्रसिद्ध मजकुराचा सुटसुटित पुनरुच्चार असें कोणीच मानणार नाही; त्यांत त्याहून अधिक कांही पाहावयास मिळावें अशी अपेक्षा असते. मुख्य विषय, त्याचे पोटभेद, त्या प्रत्येक पोटभेदावरील प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें, त्यांची संख्या, दर्जा आणि त्यांच्या अेकंदर अभ्यासापासून दिसून येणारी वाङ्मयक्षेत्रांतील प्रगति-परागति, अशांबद्दलचीं अनुमानें संकलित परीक्षणांत अपेक्षित असतात.

देशांतील मराठी भाषिकांच्या मतप्रवाहाची योग्य कल्पना यावी अशी अिच्छा असल्यास केवळ प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचें निरीक्षण करून क्वचित्च भागेल. त्यासाठी प्रकाशित ग्रंथसंपत्तीचें सामान्य वाचकवर्गाकडून (व विशेष तऱ्हेच्या अभ्यासकांकडून) किती प्रमाणांत स्वागत झालें याविषयी, म्हणजे महत्त्वाचे ग्रंथ किती काळांत आणि किती संख्येने खपले याबद्दलहि, आंकडे नजरेसमोर ठेवावे लागतील. अशी माहिती मिळूं शकली तरच देशांतील वाङ्मय हें लोकमताचें कितपत योग्य दिग्दर्शन करतें, आणि देशांतील लोकमत आणि वाङ्मय यांची परस्परांवर कितपत छाप पडूं शकते, याचा योग्य अंदाज करतां येतो व साक्षर समाजाबद्दल कांही अुपयुक्त कयास करतां येतात. परंतु जेथे पहिली म्हणजे ग्रंथसंख्येबद्दलची पुरेपूर माहितीच मिळूं शकत नाही, आणि कांही खटपटीने फक्त यादी हस्तगत झाली तरी सर्व ग्रंथ अेके ठिकाणीं पाहावयास मिळण्याची देखील सोय होअूं शकत नाही, तेथे दुसऱ्या तऱ्हेची म्हणजे ग्रंथविक्रीची माहिती कशी मिळणार ?

प्रसिद्ध झालेले अेकूण अेक मराठी ग्रंथ अुपलब्ध होण्याचे कामीं फक्त सधन ग्रंथालयें, आणि तीं देखील प्रत्येक छोटी पुस्तिका आदरून संगृहीत करणारीं ग्रंथालयेंच, कार्यक्षम ठरतील. हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा संग्रह करणें व तो सुस्थितींत राखणें ही गोष्ट कोणाहि खाजगी संस्थेला शक्य होअील असें वाटत नाही. फक्त सरकारच तसें करूं शकेल. कांही दिवसांपूर्वी प्रत्येक प्रांतांत भाषावार सर्वसंग्राहक अशीं संग्रहालयें स्थापन

अनुक्रमणिका

करण्याची अेक सरकारी योजना होत होती. परंतु ती युद्धजन्य परिस्थितीमुळे मागे पडली असें दिसतें.

अशा अेखाद्या सर्वसंग्राहक सोअीच्या अभावीं, सरकारने प्रांतवार प्रसिद्ध केलेल्या याद्या आणि निरनिराळ्या नियतकालिकांकडे लेखक-प्रकाशकांनी अभिप्रायार्थ पाठविलेल्या पुस्तकांच्या त्या त्या नियतकालिकांत येणाऱ्या याद्या यांवरच विसंबून राहावें लागतें. पैकी सरकारची यादी फक्त मुंबअी प्रांतापुरती सुरळीतपणें मिळते; मध्यप्रांतादि निकटच्या प्रांतांत प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची तितकी समाधानकारक मिळत नाही. नियतकालिकें आपल्या सोअीप्रमाणेच आलेल्या पुस्तकांतून कांही निवडक पुस्तकांवरच अभिप्राय किंवा पोंच देतात. यामुळे त्यांवरून संपूर्ण यादी तयार करणें शक्य होत नाहीच; पण जीं थोडीं नांवें त्यांवरून ध्यानांत येतात त्यांच्या प्रकाशनकालाची अचूक कल्पनाच करतां येत नाही. 'महा-राष्ट्र'सारखें मासिक साक्षेपाने यादी देतें. परंतु 'सह्याद्री'प्रमाणे तें प्रकाशनदिन देत नाही. सह्याद्रिसुद्धा बारीक पुस्तकांची पोंच देतांना प्रकाशनाचा दिनांक देत नाही. आणि याहूनहि खेदाची गोष्ट म्हणजे कित्येक लेखक-प्रकाशकहि आपल्या पुस्तकावर प्रकाशनाचा काल देत नाहीत. आपला ग्रंथराज सार्वकालिक महत्त्वाचा आहे असें त्यांना ध्वनित करावयाचें असलें तरी देखील, त्यांत प्रकाशिलेलें विशिष्ट ज्ञान आपल्याला केव्हा स्फुरलें याची कांही कल्पना सामान्य अभ्यासकाला देण्यास त्यांना प्रत्यवाय वाटूं नये.

आपल्या वाङ्मयाचा कालखंडानुसार अभ्यास करावयाचा तर प्रकाशनदिनाच्या क्रमाने प्रकाशित ग्रंथ, निदान प्रकाशित ग्रंथांच्या संपूर्ण याद्या, विषयवार, परीक्षकाच्या हाताशीं पाहिजे-तच. आता केवळ यादी आणि यादींतील नांव पाहून भागणार नाही हें अुघड आहे. फार कशाला, यादींत अेखाद्या विवक्षित पुस्तकाचें नांव घालण्यासाठी देखील प्रथम त्या पुस्तकांतील प्रतिपादनविषयाची योग्य कल्पना आलेली असली पाहिजे. यामुळे पुस्तकाचें दर्शन झाल्या-शिवाय संपूर्ण यादी नाही आणि यादींत नांव गेल्याशिवाय अभ्यासकाला हवें त्या प्रकारचें मार्गदर्शन नाही असा ब्रह्मघोटाळा निर्माण होतो. तो कसें तरी करून दूर झाला पाहिजे. आणि तो दूर झाल्याशिवाय साहित्यपत्रिकेने गेलें वर्ष दीड वर्ष नव्याने हातीं घेतलेला अुपक्रम संपूर्ण-तया यशस्वी होण्याची आशा बाळगावयास नको. म्हणून यासाठी—

१ अशा याद्या तयार करणें हें अभ्यासकांच्या दृष्टीने महत्त्वाचें कार्य साहित्यपरिषदेने स्वतः हातीं घेणें अवश्य आहे. साहित्यपरिषदेच्या नोकरांपैकी कोणी तरी नियत काम म्हणून नियमितपणें व पद्धतशीरपणें क्रमशः तें करीत राहणें अत्यंत अिष्ट आहे.

२ या कामीं सर्व लेखक व प्रकाशक यांनी आपल्याच, निदान स्वभाषेच्या, दृष्टीने सहकार्य करण्यास पुढे आलें पाहिजे.

३ सर्व, निदान कांही तरी प्रमुख, नियतकालिकांनी पोंचअभिप्राय देतांना प्रकाशनाचा कालनिर्देश न चुकतां करणें म्हणजे स्वभाषेच्या कालक्रमानुसार अभ्यासाला व पर्यायाने भाषा-वृद्धीच्या अितिहासलेखनाच्या कार्याला अवश्य अशा प्रकारचेंच साहाय्य देणें आहे, हें लक्षांत वागवून तसा कालनिर्देश करण्याचें व्रत पाळलें पाहिजे.

४ केवळ पोंच देतांना सव्रगोलंकार करून टाकमाळ्याप्रमाणे यादी देअून अेकदाचें कर्तव्य केल्याचें समाधान मानणें असाच प्रघात अगदी शिष्टसंमत म्हणून हल्ली अमलांत आहे. त्यांतहि थोड्या आयासाने दुरुस्ती करणें शक्य आहे. सर्वमान्य असें कांही ढोबळ वर्गीकरण करून देणें सुज्ञ वाचकांच्या हिताचें ठरणार आहे. विशेषतः किती तरी बारीकसारीक पुस्तकें

स्थलामार्वी काढून टांकावीं लागतात. तेव्हा वर्तमानपत्रांच्या रकान्यांतून त्यांची पहावयास मिळणारी ढोबळ वर्गवारी हेंच काय तें अभ्यासकांना (पुस्तकें पहावयास मिळण्याच्या अशक्यते-मुळे) अेकमेव गमक राहूं शकेल.

५ शक्य त्या प्रकारें गोळा केलेली माहिती व निरनिराळे लेखक-प्रकाशक (पुस्तकें पाठ-विणारे) व नियतकालिकांचे संपादक (आपल्याकडे आलेल्या पुस्तकांची यादी छापणारे) यांच्या सहकार्यानें मिळविलेली यादी संकलित करून साहित्यपत्रिकेनें आपल्या वर्षअखेरच्या किंवा अन्य सोयीच्या अशा अेखाद्या अंकांत छापावी.

६ वाङ्मयेतिहासाच्या कामीं मराठीप्रेमी अभ्यासकांचें हक्काचें सहकार्य मागणाऱ्या साहित्यपरिषदेनें व साहित्यपत्रिकेनें या तऱ्हेचा साधा संकल्प करून तो अमलांत आणणें अितकें आवश्यक आणि अपरिहार्य आहे की त्याच्या अिष्टतेबद्दल अधिक प्रमाणें देण्याचें कारणच पडूं नये.

७ आणि अेकदा असें कार्य पत्रिकेनें अंगावर घेतलें म्हणजे परीक्षणांचें कार्य अंगावर घेतांच जसे अनेक अभ्यासक वऱ्यापैकी असें साहाय्य देण्यास तत्परतेने पुढे आले तसेच या यादीच्या कामासाठीहि निःसंशय पुढे येतील याबद्दल शंका वाटूं नये.

---

## डे. व्ह. ट्रा. सोसायटी, पुणें, या संस्थेनें सन १९४२-४३ सालच्या पहिल्या सहामाहींत बक्षिसें व प्रशंसापत्रें दिलेल्या पुस्तकांच्या माहितीचा तक्ता

| पुस्तकाचें नांव | कर्त्याचें नांव | बक्षिसाची रक्कम अगर शिफारसपत्र |
|---|---|---|
| | | रु. |
| १ नवा हिंदुधर्म | पं. महादेवशास्त्री दिवेकर | ७५ |
| २ हिमालयांत | रा. ना. गो. चापेकर | ३० |
| ३ संस्कृतिसंगम | प्रा. द. के. केळकर | ७५ |
| ४ बालविद्यार्थ्यांची मराठी शब्द-संपत्ति | रा. स. रा. भट | ४० |
| ५ पाकिस्तानचें संकट | रा. शि. ल. करंदीकर | ४० |
| ६ य. म. गद्रे यांची कविता भाग १ | रा. य. म. गद्रे | ३० |
| ७ वेदसिद्ध मायावाद प्रकरण ४ थें | अु. तीर्थ द. वा. जोग | ३० |
| ८ संमोहनशास्त्र | डॉ. मा. पु. जोशी | ७५ |
| ९ हिंदी अंदाजपत्रकें भाग १ | रा. न. वि. गाडगीळ | ७५ |
| १० निवाडे | रा. ना. धों. ताम्हनकर | ३० |
| ११ केळकरचरित्र आणि वाङ्मय | प्रो. मा. का. देशपांडे | ३५ |
| १२ पराग | रा. ना. ना. हुड | प्रशंसापत्र |
| १३ पद्यमीमांसा | रा. वि. ज. सहस्रबुद्धे | ,, |
| १४ जीवनदर्शन, 'The Prophet' चें भाषांतर | रा. रघुनाथ गणेश जोशी | ,, |

अनुक्रमणिका

# जुन्या कागदपत्रांतील ७४॥ या आंकड्याचा खुलासा

(लेखक— श्री. यशवन्त रामकृष्ण दाते)

साहित्यपत्रिकेच्या ६२ व्या अंकांत जुन्या कागदपत्रांतील ७४॥ या आंकड्यासंबंधाने श्री. ना. गो. चापेकर यांनी अेक टिपण लिहिलें आहे व त्यासंबंधाने स्पष्टीकरणाबद्दल भिन्न भिन्न मतें प्रदर्शित केलीं आहेत.

यासंबंधाने प्रथम अेक गोष्ट लक्षांत येते ती ही की ७४ किंवा ७४॥ किंवा ७४॥= असे निरनिराळ्या ठिकाणीं भिन्न भिन्न आंकडे नमूद असून कांही ठिकाणीं ४२, ७२ असेहि आंकडे आढळतात असें त्यांनी नमूद केलें आहे. यामध्ये या आंकड्यांत अेकवाक्यता नाही ही गोष्ट प्रथमतःच लक्षांत येते, व ज्या अर्थी आंकड्यांतच अेकवाक्यता नाही त्या अर्थी हे आंकडे कशाबद्दल घालण्यांत येतात यांबद्दल भिन्न भिन्न मतें प्रचलित असणें हें साहजिकच आहे, व तशीं कांही मतें रा. चापेकर यांनी तेथे नमूद केलीं आहेत; परंतु त्यांतील अेकहि मत समाधानकारक वाटत नाही.

आपल्या लेखनामध्ये लेखनारंभीं कांही तरी स्वस्तिवाचक, मंगलकारक किंवा गुप्ततावाचक अथवा अशाच तऱ्हेची कांही तरी भावना व्यक्त करण्याकरिता अेखादें अक्षर घालण्याचा प्रघात पूर्वापार आहे. विशेषतः श्री व ॐ हीं अक्षरें अशा वेळीं मथळ्याच्या ठिकाणीं घालण्याची प्रथा अनेक ठिकाणीं आढळून येते. मनुष्य जेव्हा संस्कृत किंवा देशी भाषेंत अेखादा मजकूर लिहीत असे त्या वेळीं श्री किंवा ॐ हें लिहिणें सयुक्तिक व साहजिकहि दिसतें. परंतु पत्र किंवा जमाखर्च जर फारसीमध्ये लिहावयाचा असेल तर तेथे श्रीकार किंवा ॐकार लिहिणें विसंगत दिसेल. अशा वेळीं आरबी भाषेंतील अशाच प्रकारचा व परमेश्वर या अर्थाचा 'हु' हा शब्द लिहिण्याचा प्रघात आहे. 'हु' या शब्दाचा आरबी व फारसी भाषेंत परमेश्वर असा अर्थ आहे. अेखाद्या गुप्त मजकुराच्या पत्राच्या आरंभींहि शपथदर्शक 'हु' शब्द लिहिण्याचा प्रघात आहे. जमाखर्चाच्या आरंभीं लिहिलेल्या 'हु' या शब्दाचा संकेत सत्यवाचक आहे. याचा अर्थ खालील लिहिलेला जमाखर्च किंवा खातें परमेश्वरास स्मरून सत्य लिहिलेलें आहे असा होतो. वरील श्रीकार किंवा ॐकार याप्रमाणे शुभसूचक हाहि अर्थ 'हु' शब्दास प्राप्त झाला आहे. आरबी किंवा फारसीमध्ये 'हु' हा शब्द लिहावयास व तो अुजवीकडून डावीकडे लिहावयास प्रथम 'ह्' (हे अथवा हमजा) व 'उ' (वाव) अशीं अक्षरें योजावीं लागतात. त्यांतील 'ह' अक्षर बालबोधींतील ४ या आंकड्याप्रमाणे किंवा अिंग्रजींतील 8 या अक्षराच्या जवळ जवळ येतें व 'वाव' हें अक्षर सात या आंकड्याच्या आकाराजवळ येतें. ज्या वेळीं 'हु' हा शब्द आरबी किंवा फारसीमध्ये त्याचा योग्य अर्थ समजून व अुजवीकडून डावीकडे लिहिला जात असेल त्या वेळीं तो त्याच्या मूळच्या स्वरूपांत लिहिला जात असेल. परंतु पुढे त्यास केवळ गूढाक्षराचें स्वरूप येअून तो फारसी किंवा आरबी न जाणणाऱ्या व डावीकडून अुजवीकडे लिहिणाऱ्या मनुष्याने लिहिल्यास त्याचें रूपान्तर त्यास अज्ञात असलेल्या 'वाव' आणि 'ह' या अक्षरांपासून त्यास ज्ञात असलेल्या ७ व ४ या आंकड्यांत

अनुक्रमणिका

होणें अगदी साहजिक आहे व त्याप्रमाणे ७४ हा आंकडा प्रचारांत आला असणें अगदी संभवनीय आहे.

श्री. चापेकर यांनी दिलेल्या सर्व प्रकारांमध्ये ७ व ४ हेच आंकडे विशेषत्वानें दिसतात. शेवटच्या दोन रेघा अर्थातच श्रीकाराप्रमाणे पुढे दिलेल्या आहेत व कांही ठिकाणीं तशा अुभ्या दोन रेघा दोन्ही बाजूंस दिल्या असण्याचा संभव आहे.

मूळ संकेत कशाबद्दल आहे या गोष्टीचें ज्ञान लुप्त झाल्यानंतर ७४ किंवा ७४॥ या आंकड्यांबद्दल निरनिराळीं स्पष्टीकरणें तयार होणें स्वाभाविकच आहे व त्या संकेताचा संबंध अेखाद्या मोठ्या प्रसंगाशीं अथवा महत्त्वाच्या घटनेशीं किंवा व्यक्तीशीं जोडला जाणें ही गोष्ट आख्यायिकांच्या जन्म पावणाऱ्या तंत्रास अनुसरूनच झालेली दिसून येत आहे.

अशा अेखाद्या गोष्टीच्या मुळाचें संशोधन करावयाचें झाल्यास अशा गोष्टीचा जुन्यांत जुना अुल्लेख कोठे आहे हें पाहिलें पाहिजे व अशा रीतीने शब्दांचा किंवा संकेतांचा अभ्यास अैतिहासिक दृष्टीने म्हणजे वर्तमानकालापासून मागे मागे जात जात जुन्यांत जुने अुल्लेख पाहत गेल्याने अैतिहासिक पद्धतीने होत गेल्यास त्यांच्या अर्थाचा अुलगडा होणें अधिक सुलभ होअील व अशा तऱ्हेनेच मराठी भाषेंतील शब्दांचा व संकेतांचा अितिहास तयार होत गेल्यास भाषेच्या अभ्यासासहि तो अुपकारक झाल्याशिवाय राहणार नाही.

---

## स्त्रियांच्या म्हणी

(६४ अंकावरून पुढे)

(६३७) काम नाही घरीं, सांडून भरी. येग कळी, बस ग नळीं (नरड्यावर) (अन्या-परिपु व्यापार).
(६३८) चोरून पोळी, ओरडून तूप.
(६३९) राक्षसाच्या घरांत पिठाचे देव्हारे.
(६४०) गांवांत भय गांवकऱ्याचें, रानांत भय वाघाचें.
(६४१) गांव सांगतां येतें, पण नांव सांगतां येत नाही.
(६४२) आधीं सारख भिती (भिंती), मग कर चपाती.
(६४३) मागे न पुढे, दटविलें घोडें.
(६४४) गांवांत मढें, पाटलाला कोडें.
(६४५) वतनदाराचा आला गाडा, अुपऱ्याचें झोपडें मोडा.
(६४६) शेरभर वरया द्या अन् गांवकरीण म्हणून घ्या.

नीलकंठ शंकर नवरे

# कै. राजारामशास्त्री भागवत यांची वाङ्मयसेवा

(ले.— दुर्गा भागवत)*

लेखक ह्या दृष्टीने शास्त्रीबोवांची भूमिका कोणत्या प्रकारची होती ह्याबद्दलचें विवेचन 'पत्रिके'त महाराष्ट्रांतील कर्त्या सुधारकांचे अग्रणी राजारामशास्त्री भागवत ह्या लेखांत आलेंच आहे. परंतु सतत पस्तीस वर्षे शास्त्रीबोवांनीं जो विद्याव्यासंग केला त्याचें अधिक खुलासेवार परीक्षण होणें जरूर आहे. कारण अेक तर समकालीनांकडून त्यांच्या अुत्कृष्ट गणल्या जाणाऱ्या वाङ्मयाचीहि फार अुपेक्षा झाली, व दुसरें म्हणजे बऱ्याच वर्षांत त्यांच्या वाङ्मयाकडे कुणीं अभ्यासू दृष्टीने न पाहिल्यामुळे त्यांचें लिखाण किती आहे व कुठे कुठे प्रसिद्ध झालें आहे हें समजण्यात देखील मुष्कील पडते. शास्त्रीबोवांच्या लिखाणाची प्रचंड जंत्रीच ह्याची साक्ष आहे. त्यांच्या कांही लेखांवर (विविधज्ञानविस्तारांतील— मराठेशाही— विचार माधुकरी— अित्यादि) अजिबात नांव नाही, तर कांहींवर 'अेक भगवद्भक्त' ('पंचजनविचार'—'ज्ञानेश्वरी महासागरांतील बुडया' अित्यादि 'विविधज्ञानविस्तारांतील' लेख) किंवा 'ब्राह्मण आहे, पण हिंदु नव्हे' ('अैतिहासिक गंजिफा'— दीनबंधु) अशीं विविध व तऱ्हेवाअीक टोपणनांवें आढळतात. लिहिण्याचे विषय तर अनंतच. भाषा, धर्म, अितिहास व संशोधनपर असे त्यांच्या लिखाणाचे चार ठोकळ भाग पाडतां येतील. सामाजिक चालीरीतींवर त्यांनी लिहिलेल्या टीका 'धर्म' ह्या सदराखालीच घालावयास कांही हरकत नाही. कारण शास्त्रीबोवांची समाजसुधारणा धर्मसुधारणेवर मुख्यत्वें अवलंबून होती. ह्या चारी सदरांवरील शास्त्रीबोवांचें लिखाण फार मोठें असल्यामुळे ह्या लेखांत त्यांच्या भाषाविषयक कामगिरीबद्दलच काय तो विचार केला आहे. शेवटीं शास्त्रीबोवांच्या समग्र लिखाणांची जंत्री दिली आहे.

शास्त्रीबोवा बहुभाषी होते. कोणतीहि भाषा असो, अेकदा तिच्यांत कांहीतरी विशेष आहे असें वाटलें म्हणजे पुरे; लागलेच शास्त्रीबोवा ती शिकण्याच्या नादीं. ह्या नादाच्या भरांत त्यांनी पुश्तु भाषाहि पठाणांशीं बोलण्याचा सराव ठेवून थोडीफार हस्तगत केली होती. मराठी ही त्यांची मायभाषाच पडली व तिच्याबद्दल शास्त्रीबोवांना जिव्हाळाहि फार वाटे. त्याशिवाय गुजराती व हिंदीहि ते जाणत. देशी किंवा प्रांतीय भाषांना त्या वेळीं विश्वविद्यालयांत मुळींच शिरकाव नव्हता. त्याबद्दल शास्त्रीबोवांनी वेळोवेळीं प्रांतीय भाषांचें सांस्कृतिक महत्व विद्यालयीन शिक्षणक्रमांत किती आहे हें लेखांच्या व व्याख्यानांच्या द्वारें लोकांच्या पुढे मांडलें. जातिभेदावर तर त्यांना तो मोठा तोडगा वाटे. संस्कृत व तदनुषंगिक प्राकृत भाषा (पाली सोडून) त्यांना अवगत होत्या. प्राकृत वाङ्मयाची महती गाणारा भरतवर्षांतील हाच पहिला विद्वान अेवढेंच नव्हे तर प्राकृत भाषा संस्कृत भाषेपूर्वीच्या लोकभाषा आहेत हें प्रतिपादन करणारे शास्त्रीबोवा पहिलेच भाषापंडित. वैदिक वाङ्मय व धर्म यांचें सारासारग्रहण करतां यावें म्हणून त्यांनी अवेस्ता भाषेचेंहि अध्ययन केलें होतें. हें त्यांचें अेक अपूर्व वैशिष्ट्यच

* जव्हेरी व्हिला, गिल्डर लेन, मुंबअी ८.

अनुक्रमणिका

होतें. त्याशिवाय कुराणाचा अुत्तम अभ्यास व्हावा म्हणून त्यांनी अरबी भाषा हस्तगत केली. फारसीदेखील ते चांगलें जाणत. शाळेंत विद्यार्थ्यांना ते फारसी शिकवीत. व्याकरण व ख्रिस्ती धर्माची भूमिका नीट पारखतां यावी ह्या दृष्टीने त्यांनी लॅटिन व ग्रीक भाषांचाहि तात्पुरता अभ्यास केला होता. फ्रेंचहि त्यांना अवगत होतें. अिंग्रजी तर शिकल्यावांचून गतीच नव्हती. ह्याप्रमाणे केवळ स्वतःची ज्ञानाची हौस भागविण्याकरिता निरनिराळ्या भाषांतील वाङ्मयाच्या अवगाहनांत गढून जाणारे व्यासंगी विद्वान किती असतील ?

**भाषाशैली**— शास्त्रीबोवा स्वतःविषयी वैयक्तिक असें कधीच लिहीत नसत. तरी पण त्यांचें लेखन विवेचक आणि प्रचारकी थाटाचें असल्यामुळे, आणि स्वतःचीं मतें ठासून प्रसंग पडेल तिथे मांडण्याची त्यांना फार हौस असल्यामुळे, त्यांचे पुष्कळ लेख आत्मनिष्ठ वाटतात. जें पाहिलें, जें वाचलें व जें अनुभवलें त्याचा ठसा स्वतःच्या मनावर जसा अुमटला असेल तशाचा तसा ते वाचकांसमोर ठेवीत. अंतर्गत विचार शब्दरूपाने मांडतांना ते शक्य तितक्या नैसर्गिक स्थितींत-- नागव्या स्थितींत म्हटलें तरी चालेल- मांडीत. भाषेला मुद्दाम नटवून सजवून ती अधिक परिणामकारक करण्याचा त्यांनी चुकूनसुद्धा प्रयत्न केला नाही. परंतु नटण्याच्या किंवा नटविण्याच्या त्यांच्या तिटकाऱ्यामुळे त्यांच्या भाषेंत सुबकपणा किंवा कोमलता आली नाही. हे गुण नसले तरी ती तेजस्वी आहे, स्पष्ट आहे आणि तिखट आहे. शिवाय मनाला पटलें तेंच लिहिलें ह्या त्यांच्या वृत्तीमुळे त्यांच्या लिखाणांत अेक प्रकारचा खोल जिव्हाळा आढळून येतो. हा गुण लेखनकलेच्या अमोलिक लेण्यांपैकी अेक नाही असें कोण म्हणेल ?

त्यांच्या लेखनांत 'बोली'ची झांक मारते. 'म्हावरें', 'मोहतूर', 'सागोती' यासारखे शब्द त्यांच्या गंभीर लिखाणांत अितस्ततः विखुरलेले दिसतात. संस्कृत शब्दांच्या अैवजी नित्याचे मराठी शब्द वापरायचे ह्या बाण्याने वरील शब्द ते अुपयोगांत आणीत. भाषा सामान्य जनांसाठी सुबोध करण्याचे त्यांनी प्रयत्न केले त्यांपैकी वरील प्रयत्न होय.

शास्त्रीबोवांचीं मतें प्रतिपादन करण्याची रीत आणि तडफ पहिल्यापासून शेवटपर्यंत अेकाच ठशाची राहिल्यामुळे नांव पाहिल्याशिवाय हा लेख कुणाचा तें नक्की ओळखतां येतें. पण त्यांची भाषा मात्र शेवटपर्यंत रूपें बदलीत होती. पहिल्याने शास्त्रीबोवांनी विविधज्ञान-विस्तारांत लिहावयास सुरुवात केली तेव्हा (१८८१ सालापासून) त्यांची भाषा सुंदर नसली तरी डौलदार होती. बाळशास्त्री जांभेकरांचें चरित्र, त्याचप्रमाणे अेकनाथाचें चरित्र, सुबोध मराठीचे चांगले नमुने आहेत. पण पुढे पुढे मराठी शब्दच वापरण्याचा त्यांचा नाद अतिरेकाला जाअून पोचला. १९०१-१९०२ सालीं त्यांनी सुबोधपत्रिकेंत जे लेख लिहिले आहेत त्यांत, विशेषतः 'रँग्लर परांजपे' व 'अेक विधवाग्रह हवें आहे' हे विशेष अुल्लेखनीय आहेत. पहिला लेख रँग्लर परांजपे विलायतेंत यश मिळवून हिंदुस्तानांत परत आले त्या वेळीं त्यांचें अभिनंदन करण्याकरितां लिहिला आहे त्यांत गुरूला चांगल्या शिष्याविषयी जो अभिमान वाटतो तो पूर्णपणें प्रत्ययाला येत असला तरी 'सुरेख झालें' ह्या शब्दांच्या पुनरावृत्तीमुळे तो लेख पोरकट वाटतो. त्याचप्रमाणे दुसऱ्या लेखांत 'मांडवशोभा' हा शब्द वापरल्याने हा लेख अुपरोधिक आहे कीं विधवांबद्दलच्या अनुकंपेने लिहिला आहे तें कळत नाही. त्याचप्रमाणे "कैसरकडून सुलतानाकडे" ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत भाषेची सुधारणा करण्याकरिता पदें तोडून लिहिणें अधिक सोयीचें आहे असें त्यांनी प्रतिपादन केलें आहे. हें सर्व पुस्तक त्या

तत्त्वाप्रमाणेच लिहिलें आहे; अुदाहरणार्थ — "या अगदीं अ-योग्य प्रति-स्पर्ध्यास घडघडव-ण्यांत आल्या-नंतर, त्याच्या पींठा-वर अथानासियूनें स्वतःस बसवून घेतलें. याच्या नांवा-मुळें व सांनिध्या-मुळे बड्या परि-पदेचा जोम आणलेल्या अेका छोट्या परि-पदेंत, ज्या बिशपांनीं निर-अुपायानें रिमिनी मुक्कामीं कबुलायतीवर सह्या केल्या होत्या, त्या सर्वां-वरची वाळू नैसच्या कबुलायती-वर नुसत्या सह्या घेऊन काढून टाकण्यांत आली." (पृ. १२१) ह्या अशा पद्धतीने शास्त्रीबोवांची भाषा अुलट दुर्बोध मात्र बनली आहे.

अगदी शेवटच्या चार वर्षांत मात्र शास्त्रीबोवांनीं जें लिखाण केलें आहे त्यांत भाषेच्या दृष्टीने फार मोठा पालट आढळून येतो. मधल्या काळांत त्यांची भाषा जी मासलेवाअीक, तुटक व बोजड झाली होती तिचा नूर आता पालटला. आता ती अस्खलित, साधी आणि डौलदार अशी झाली. शास्त्रीबोवांचे विचारहि अधिक मुद्देसूदपणाने मांडलेले दिसतात. जणू काय अितकी परिणामकारक भाषाशैली कमावण्यासाठीच शास्त्रीबोवांना वरीलप्रमाणे गिरक्या खाव्या लागल्या. ह्या शैलीचें अुत्कृष्ट अुदाहरण म्हणजे त्यांचे 'दीनबंधु' या ब्राह्मणेतर पत्रांत आलेले 'अैतिहासिक गंजिफा' ह्या सदराखालचे लेख. ह्या भाषेचा नमुना थोडक्यांत पुढे दिला आहे.

"हिंदु धर्मास 'धर्म' हें भरीव नांव शोभत नाहीं. असें कां ? तर 'धर्म' शब्द घेतला कीं त्यांत भावंडाचें नातें जाहीर ध्वनित होतें. खिस्ती म्हटला कीं प्रत्येक खिस्ती त्यास आपला बंधु समजतो, त्याच्याशीं जाहीर बंधुत्व लावतो. हातचें पाणी घेण्यास व त्यानें केलेल्या स्वैंपाकाच्या आहुती आपल्या आंतल्या अग्निहोत्रांत होमण्यास संकोच बिलकूल बाळगीत नाहीं. खिस्त्याहूनहि हें बंधुत्वाचें नातें मुसलमान जास्त पटवूं शकतात. हे दोन्ही धर्म जिवंत आहेत. जो धर्म विधर्म्यास जाहीर आंत ओढून त्याच्याशीं बंधुत्वाचें नातें जाहीर लावतो, तो धर्म जिवंत होय, तो धर्म भगवती भागीरथीचा प्रवाह होय. पारशी व यहुदी हें दोन्ही धर्म आज जिवंत नाहींत. ते आज मुर्दाड होवून पडले आहेत. तरीही जसा पारशांचा तसा यहुद्यांचा समाज अेकजात आहे. जसें पारश्यांचें पारशांशीं तसें यहुद्यांचें यहुद्याशीं नातें बंधुत्वाचें असतें. रोटीच्या दळणवळणास बिलकुल आडकाठी नसते." अित्यादि.

ज्याप्रमाणे रूढ बोलभाषेंतले शब्द शास्त्रीबोवांनी आपल्या लेखनांत न कचरतां वापरले त्याचप्रमाणे त्यांनी कांहीं अतिशय सुंदर शब्दांची देखील मराठी भाषेंत भर टाकली आहे. अिंग्रजीवरून त्यांनी न्यायमूर्ति, विद्यापीठ व विश्वविद्यालय हे शब्द प्रथम रूढ केले. सारस्वत (साहित्य या अर्थी) व ब्राह्मणेतर हे दुसरे दोन शब्द.

शास्त्रीबोवांच्या भाषाविषयक व्यासंगाची छाननी थोडक्यांत पुढीलप्रमाणे देतां येअील.

## संस्कृत भाषा—

संस्कृत भाषेच्या व्युत्पत्तीसंबंधी शास्त्रीबोवांची कामगिरी अुल्लेखनीय असली तरी संस्कृत साहित्यासंबंधाने त्यांचें मत कलुषित होतें. ज्या संस्कृत वाङ्मयाचा शास्त्रीबोवांस अभिमान वाटे तें सर्व वैदिक वाङ्मय होतें. वेद, विशेषतः ऋग्वेद, अुपनिषदें, कांहीं सूत्रवाङ्मय, महाभारत, रामायण, भगवद्गीता हें त्यांच्या मतें संस्कृत भाषेचें खरें भांडार होतें. काव्य-नाटकाबद्दल— अेक भवभूति सोडल्यास— त्यांना कमालीचें वैषम्य वाटे. 'संस्कृत व देशी भाषा' ह्या अेका लहानशा लेखांत संस्कृत भाषा नको, व देशी भाषा विद्यापीठाच्या

कार्यक्रमांत कां हवी, ह्याचें स्पष्टीकरण शास्त्रीबोवांनी केलें आहे. मराठीसहित अेकंदर प्रांतीय भाषांबद्दल शास्त्रीबोवांची भूमिका काय होती हें ह्या लेखावरून चांगलेंच कळून येतें; आणि म्हणून तो फार महत्त्वाचा आहे. त्यांतले मुख्य मुद्दे पुढे दिले आहेत—

संस्कृत भाषा नको असल्याचीं नअू कारणें शास्त्रीबोवांनी दिलीं आहेत. त्यांचा आशय असा की संस्कृत साहित्याचें अध्ययन आमच्या राष्ट्रीय बाण्यास व संस्कृतीस विघातक आहे. कारण (१) रामायण, महाभारत अित्यादि अुत्कृष्ट ग्रंथांत जीं पारंपारिक सुंदर तत्त्वें व चरित्रें संगृहीत केलीं आहेत त्यांचा अेकनाथ, मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत अित्यादि कवींनी मराठींत अुत्कृष्ट पुरस्कार केला आहे. म्हणून संस्कृत भाषेची गरज अुरली नाही. (२) संस्कृत भाषेमुळे 'धर्मवासना शिथिल होते' कारण दंडी, कालिदास, बाण वगैरे लेखकांनी वंद्य मानलेल्या देवांची शिमग्यांतहि आपले लोक अुच्चारावयास लाजतील अशा प्रकारची स्थलोस्थलीं चावट व बीभत्स टर अुडवलेली असते. (३) 'ऋतुसंहार', 'मेघदूत' अित्यादि कामुकतेने भरलेलीं काव्यें विद्याक्रमांत असल्याने विद्यार्थ्यांचीं कोवळीं मनें बिघडण्याचा संभव असतो. (४) संस्कृतांत 'वर्णसंकराचा बाअू केलेला असून, ब्राह्मणेतरांचा ठिकठिकाणीं अपमान केलेला असतो व त्यांच्याविषयी तुच्छ बुद्धि प्रदर्शित केलेली असते; अुदाहरणार्थ, शंबूकाख्यान व शूद्र वेद अेकेल तर त्याच्या कानांत तापलेलें तेल ओतावें ही मनूची आज्ञा. (५) संस्कृत भाषेंत अैतिहासिक गद्य ग्रंथ 'हर्षचरिता'खेरीज दुसरा नाही. (६) ही मृत भाषा असल्याने 'तिच्या प्रसाराने लोकसमूहाची स्थिति सुधारण्याचा' बिलकूल संभव नाही. (७) स्वराज्य नसल्यामुळे ती निरवश झाली आहे. (८) राष्ट्रीय बुद्धीचा रोपा हृदयांत लावण्याचें काम तिच्या हातून होणें नाही. कारण ही केवळ धर्मभाषा होती; बोलभाषा व राष्ट्रभाषा नव्हती. (९) तींतील हवा कर्मठपणाने अुग्र झालेली असल्यामुळे व अितिहासाचा तींत गंधहि नसल्यामुळे, कोणींहि चांगलें अुदाहरण घालून देअून आपलें नांव वंद्य करून व आपलें आचरण अुदाहार्य करून ठेवलेलें तींत वाचण्यांत येत नाही.

शास्त्रीबोवांचे हे सर्वच मुद्दे तर्कशुद्ध आहेत असें नव्हे; अुदाहरणार्थ, संस्कृत भाषेंतल्या अश्लीलतेबद्दल शास्त्रीबोवांचें मत पूर्वग्रहदूषित असल्यामुळे त्यांनी त्या मुद्यावर फाजील भर दिलेला आहे. त्याचप्रमाणे शेवटल्या मुद्यांत शास्त्रीबोवांनी म्हटल्याप्रमाणे अैतिहासिक वाङ्मयाची वाण असली तरी देखील त्या भाषेंत दंतकथावाङ्मय विपुल आहे, आणि त्याची अैतिहासिक अुपयुक्तता मोठी आहे हें आज कोणीहि कबूल करील.

परंतु ह्याबरोबरच त्यांनी जे दुसरे अनेक मुद्दे अुपस्थित केले आहेत ते खरोखरच विचार करण्याजोगे आहेत. ज्या काळीं संस्कृतास भलतेंच महत्त्व येअून विद्यापीठांत देशी भाषांना वाळींत टाकण्यांत आलें होतें, त्या काळीं देशी भाषांची कड घेअून संस्कृत भाषे-संबंधाने असे अुद्गार काढणारे शास्त्रीबोवा अेकच होते. आज देशी भाषांचें वैभव वाढतें दिसत आहे, त्याचें मूळ निःसंशय वरील अुद्गार काढणाऱ्या मनोवृत्तींत आहे.

## संस्कृत भाषेच्या व्युत्पत्तीसंबंधाने व्याख्यानें (अिंग्रजी)

शास्त्रीबोवांच्या भाषाविषयक लेखनांत वरील व्याख्यानांना अग्रस्थान द्यावें लागेल. ह्यांत मुख्यत्वें वैदिक वाङ्मयाचा समावेश होतो. वैदिक वाङ्मयाचे कांही भाग पाडून त्यांतील भाषेचे व व्याकरणाचे नमुने शास्त्रीबोवांनी चर्चेसाठी घेतले असून त्यांत ठिकठिकाणीं ग्रीक, लॅटिन, अवेस्ता अित्यादि भाषांची तुलना देखील केली आहे.

हीं व्याख्यानें अेकंदर आठ आहेत. आणि त्यांत अनेक वादग्रस्त प्रश्न शास्त्रीबोवांनी अुपस्थित केले आहेत. कित्येक वेळां त्यांनी भाषाशास्त्राच्या मर्यादेबाहेर पाअूल टाकून अनेक जातिविषयक प्रश्नांचा अूहापोह केला आहे. डॉ. भांडारकरांचीं ह्या विषयावरील व्याख्यानें अधिक मुद्देसूद असून संस्कृत, प्राकृत आणि आधुनिक प्रांतीय भाषा ह्यांचें विवेचन त्यांनी अधिक स्पष्टपणें केलेलें आढळतें. शास्त्रीबोवांनी वर सांगितलेल्या भाषांचा तुलनात्मक अुपयोग केला असला तरी त्यांच्या अभ्यासाचें केंद्र वैदिक वाङ्मय आणि त्यांतल्या त्यांत ऋग्वेदच आहे.

**व्याख्यानांचा आशय**— पहिल्या व्याख्यानाचा अुद्देश संस्कृत भाषा ही मूळ कुठे अुगम पावली व तिचा प्रसार पहिल्याने कोणत्या लोकांनी केला हें दाखविण्याचा आहे. शास्त्रीबोवांचें म्हणणें असें की ग्रीक, लॅटिन ह्या जशा प्रदेशांच्या किंवा विशिष्ट लोकसमूहाच्या भाषा म्हणून नांवाला आल्या तशी संस्कृत भाषा प्रांतवाचक किंवा लोकवाचक भाषा नाही. हिचा अुगम ऋग्वेदापासून झाला व तिला 'आर्यांची' भाषा म्हणतात. ज्या संस्कृत भाषेचें व्याकरण पाणिनीने लिहिलें ती मूळची वैदिक भाषा नसून तिच्यांतून निघालेली लौकिक संस्कृत भाषा होय. वैदिक भाषेंत कांही विशिष्ट शब्दप्रयोग आढळतात. त्यांचें स्पष्टीकरण पाणिनीस करतां आलें नाही. ते शब्द 'म्लेच्छ' म्हणजे 'अडाणी' अुर्फ गांवढळ बोलींतून आले आहेत. त्याचप्रमाणे कांही शब्द 'असुरां'पासून म्हणजे परप्रांतीय भाषेंतून आलेले असून दुर्बोध आहेत. म्लेच्छ व आसुरी संस्कारांपैकी आसुरी भाषेचे संस्कार अधिक जुने म्हणजे आर्य लोकांची वसाहत हिंदुस्थानांत होण्याच्या पूर्वीचे आहेत.

वैदिक भाषा ही आर्य लोकांची भाषा खरी पण हे 'आर्य' लोक कोण? संहितांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशा चार वर्णांच्या लोकांचा अुल्लेख आला आहे. त्यांपैकी अगदी प्रारंभींच शूद्रांना बाहेर ढकलण्यांत आलें. दुसऱ्या कालखंडांत वैश्यवर्गाला पण सोमयागांतून बाहेर काढण्यांत आलें. राहतां राहिले ब्राह्मण आणि क्षत्रिय.

ह्या दोहोंत क्षत्रियांची संख्या अधिक असून लोकांत त्यांचें वर्चस्व होतें. क्षत्रियांत 'राज्', 'मनुष्य' आणि 'क्षत्र' असे तीन मुख्य वर्ग होते. 'राज्' वर्गांत 'राजन्' म्हणजे वरुणाचे अुपासक व 'राजन्य' हे अिंद्राचे अुपासक असून, वरुणाचे अुपासक हे राज्यकर्ते आणि अिंद्राचे अुपासक प्रजा असा भेद होता. 'मनुष्यां'त मनुराजा व मनुस् ह्या दोघांच्या वीरवृत्तीच्या वंशजांचा अंतर्भाव होतो. 'क्षत्र'वर्गाला विशेष प्राधान्य नसून तो पुढे वीरवृत्तीचा वाचक बनला. अेकंदर क्षत्रियवर्गांत कांही धंदेवाअीक कारागिरांचा देखील पुढे समावेश झाला.

ब्राह्मण हे ब्रह्मावर्ताचे मूळचे राहणारे. ब्रह्मावर्त हा 'ब्रह्म' लोकांचा देश असून त्याची व्याप्ति सरस्वती व दृषद्वती ह्या दोन नद्यांमध्ये होती. ब्रह्मर्षि देश ह्या शब्दावरून 'ऋषि' हा नवा शब्द दृष्टोत्पत्तीस येतो. 'ब्रह्मर्षि' हा शब्द 'ब्राह्मण ऋषि' असा नेहमीप्रमाणे न घेतां ब्रह्म ही अेक जात व ऋषि ही दुसरी पोटजात असाच घेतलेला अधिक बरा दिसतो. संहितांत अगस्ति, अत्रि, अंगिरस, कश्यप, भृगु, वसिष्ठ व विश्वामित्र हीं सात ऋषिवर्गांतील नावें आहेत. विश्वामित्राच्या अितिहासावरून ऋषिवर्ग हा क्षत्रिय वर्गाशीं रक्ताचा संबंध असलेला, अर्थात् संमिश्र, असा वर्ग होता हें निर्विवाद सिद्ध होतें. ब्राह्मणांनी आपलें वर्चस्व वैदिककालाच्या तिसऱ्या खंडापासून पुढे प्रस्थापित केलें. अर्थात् संस्कृत भाषा ही मूळ क्षत्रियांपैकी 'मनु'

वर्गाची (लोकसंख्येने सर्वांत मोठ्या असलेल्या वर्गाची) भाषा असून ती पुढे क्षत्र, राज्, ऋषि आणि ब्राह्मण ह्या वर्गांनी उचलली. हीच पुढे आर्यावर्ताची भाषा बनली.

ह्या व्याख्यानांत शास्त्रीबोवांनी केलेला कालखंडाचा उल्लेख संदिग्ध आहे. त्याचप्रमाणे लोकांचें वर्गीकरण देखील अनुमानावरच बरेंचसें आधारल्यामुळे आक्षेपार्ह आहे. पुढील पांच व्याख्यानांत अनुक्रमें वेदपूर्व भाषेच्या नामाचें विभक्तीकरण, वैदिक नामांची विभक्तिप्रत्ययांपासून झालेलीं रूपें आणि वेदोत्तर ऐतिहासिक कालखंडांतील संस्कृत नाम व धातु ह्यांचीं रूपें आणि विभक्तिप्रत्यय ह्यांबद्दल चर्चा केली आहे.

सहाव्या व्याख्यानांत अवेस्ता आणि वैदिक संस्कृत ह्या दोन भाषांतील साम्यनिदर्शक शब्दांबद्दल चर्चा आहे, आणि सातव्या व आठव्या व्याख्यानांत ग्रीक, लॅटिन, अवेस्ता आणि संस्कृत ह्यांतील साम्यनिदर्शक शब्द, प्रत्यय, स्वर अित्यादींचीं कोष्टकें आहेत. हीं सर्व कोष्टकें फार कसोशीने केलेलीं असून भाषाशास्त्राचा अभ्यास करणारांना फार उपयोगी आहेत. परंतु त्यावरून शास्त्रीबोवांनी बांधलेले ऐतिहासिक आराखडे मात्र कुणाला आजकाल पटतीलसे वाटत नाही.

## खुर्दा अवेस्तासंबंधी (अिंग्रजी)

अवेस्ता ही आर्यांच्या वैदिक भाषेशीं बरीच संलग्न असून तिच्यापेक्षा जुनी आहे. वेदभाषेची अवेस्ता ही वडील बहीण आहे. कारण, वेदभाषेप्रमाणे अवेस्ता ही धर्मभाषा आहे. ह्या भाषेंतील वाङ्मयांत ज्या देवता वर्णिल्या आहेत त्यांचीं नांवें व अितर वर्णनें देखील वैदिक देवतांशीं मिळतीं जुळतीं आहेत. शब्दांचें साम्य तर ह्या दोन भाषांत कमालीचें आहे. ह्या सर्व साम्यस्थलांचा विचार शास्त्रीबोवांनी ह्या लेखांत केला आहे. अेवढेंच नव्हे तर अवेस्ता देवतांमधून वैदिक देवतांची व यज्ञसंस्थेची कल्पना कशी निघाली व नंतर आर्यांच्या विशिष्ट समाजरचनेमुळे वैदिक देवतांच्या कार्यांत व रूपांत कसे फेरफार घडले हें त्यांनी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. वैदिक देवतांचें शास्त्रीबोवांनी जें वर्णन केलें आहे तें फक्त ऋग्वेदावरच आधारलेलें आहे, व त्या त्या देवतेचीं सर्व अंगें, अुपांगें लक्ष्यांत घेअून केलेलें नाही. त्यामुळे त्यांचीं विधानें अपुरीं वाटतात.

त्यांनी दाखविलेलीं साम्यस्थळें विचारणीय आहेत. तरी पण भाषेखेरीज अितर बाबतींत त्यांनी केलेलीं विधानें अवेस्ताच्या अधिक खोल अभ्यासानंतरच पारखतां येतील.

## प्राकृत भाषा—

### प्राकृत भाषेची विचिकित्सा

शास्त्रीबोवांनी संस्कृत व मराठी भाषेच्या व्याकरणावर लहान लहान निबंधवजा पुस्तकें लिहिलीं आहेत. त्या दोनहि निबंधांपैकी 'प्राकृत भाषेची विचिकित्सा' हा निबंध फार सरस आहे. विवेचनपद्धति सुलभ असून प्राकृत भाषांचा अुगम व विकास यांविषयी दिलेली माहिती नावीन्यपूर्ण असून प्राकृत भाषांवरचें त्यांचें प्रेम व दांडगा व्यासंग दाखविते.

ह्या निबंधाचे ठोकळ मानाने तीन भाग पाडतां येतील. पहिल्या प्रस्तावनारूपी भागांत 'प्राकृत' शब्दाच्या व्युत्पत्तीची चर्चा, दुसऱ्या भागांत व्याकरण, व तिसऱ्या भागांत प्राकृत भाषांतील वाङ्मयाची चर्चा केली आहे. निबंधांतील सर्वांत महत्त्वाचा भाग हाच होय.

अनुक्रमणिका

'प्राकृत' ह्या शब्दाचा अर्थ 'प्रकृतीपासून आलेलें' असा नसून 'पाअड' म्हणजे 'प्रकट' किंवा 'उघड' असा आहे. अर्थात् प्राकृत भाषा ही सामान्य जनांची म्हणजे सर्वांस सहज समजणारी, व्यवहाराची, भाषा. शास्त्रीबोवांचें हें विधान सयुक्तिक वाटतें.

प्राकृत भाषा पुष्कळ जुनाट असून ती लौकिक संस्कृत भाषेंतून निघाली असें समजण्याची जरूर नाही. कारण संस्कृत धर्माची, तर प्राकृत व्यवहाराची भाषा पडली. त्यांचीं कार्यक्षेत्रें त्यामुळे भिन्न स्वरूपाचीं होतीं. आजकाल आपण मराठी, गुजराती, बंगाली वगैरे ज्या भाषा बोलतों त्या सर्व जुन्या प्राकृतापासूनच निघालेल्या आहेत.

महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी, पैशाची अित्यादि प्राकृत भाषा पूर्वी अुपलब्ध होत्या त्यांपैकी महाराष्ट्री सर्वांत जुनी व अुत्कृष्ट प्राकृत भाषा. ही भाषा संस्कृताच्या पूर्वरूपापासून व कांही देशी भाषांतून निघाली असावी. हिच्यापासून शौरसेनी, मागधी व पैशाची भाषा निघाल्या. शौरसेनी भाषेंत स्वतंत्र ग्रंथ आढळत नाही. पैशाची भाषेंत बृहत्कथारूपी अमूल्य कथाभांडार लिहिलें होतें. मूळची बृहत्कथा आजमितीस अुपलब्ध नाही. पण तिचें संस्कृत रूपान्तर प्रसिद्ध आहे.

मागधी भाषेंत जैन व बौद्ध सारस्वत अुपलब्ध आहे. महाराष्ट्री भाषेंत अनेक ग्रंथ आहेत. त्यांपैकी 'गाथासप्तशती' नांवाच्या गीतसंग्रहाची शास्त्रीबोवांनी सांगोपांग चर्चा केली आहे. अितर भाषांतल्या वाङ्मयाचा ओझरता अुल्लेख करून 'सप्तशती'वर मात्र शास्त्रीबोवांनी अघळपघळ लिहिलें आहे. तें त्यांच्या मराठी भाषेवरच्या प्रेमाचें व महाराष्ट्रीविषयींच्या पक्षपाताचें द्योतक आहे. कांही असलें तरी 'सप्तशती'सारख्या अुत्कृष्ट परंतु केवळ प्राकृतांत लिहिल्यामुळे संस्कृत पंडितांच्या अुपेक्षेस पात्र झालेल्या ग्रंथाचा अुघडपणें गौरव हिंदुस्थानांत शास्त्रीबोवांनीच पहिल्याने केला. मात्र 'कालिदासा'च्या 'शाकुंतला'स पांचट व अश्लील म्हणणाऱ्या शास्त्रीबोवांस 'सप्तशतीं'तला शृंगार कसा मानवला असावा हें गूढ वाटतें. हें त्यांच्या पूर्वग्रहाचें अेक अुत्तम अुदाहरण आहे. निबंधाच्या शेवटीं त्यांनी प्राकृत भाषांतील व्याकरणग्रंथांविषयी थोडी चर्चा केली आहे.

**मराठी भाषा—** साहित्यसेवा तीन प्रकारची असूं शकते. पहिला प्रकार म्हणजे ललितवाङ्मयाची निर्मिति, दुसरा म्हणजे टीकात्मक लिखाण आणि तिसरा म्हणजे पाहिजे त्या विषयांवर प्रत्यक्ष अवलोकनाने, अनुभवाने किंवा प्रयोगाच्या साहाय्याने ग्रंथनिष्पत्ति करणें. हा तिसरा भाग अधिक व्यापक असला तरी त्याची मर्यादा बहुतेक वेळां साहित्यशास्त्राच्या टप्प्यापलीकडे पोंचते. आणि म्हणूनच भौतिक किंवा सामाजिक शास्त्रावर जें लिखाण होतें, त्याची चर्चा सहसा साहित्यांत केली जात नाही. शास्त्रीबोवांचें बरेंचसें लिखाण ह्याच सदराखाली जातें. कथा-काव्य-नाटक अित्यादि प्रकार त्यांच्या प्रवृत्तीस मानवणारे नव्हते. अेवढें मात्र खरें की त्यांनी आपल्या साहित्यसेवेची सुरवात 'देशाच्या सद्यःस्थितीवरील विचार' म्हणून अेक काव्य आणि वॉल्टर स्कॉटच्या 'टॅलिसमन्' ह्या कादंबरीच्या रूपांतर यांनी केली. परंतु तें तेवढयापुरतेंच. पुढे विवेचक वाङ्मयानेच त्याची जागा घेतली.

टीकावाङ्मयांत त्यांनी थोडीबहुत भर घातली नाही असें नाही; ह्या टीकात्मक लिखाणांत 'अलंकारमीमांसा' ह्या निबंधाचें स्थान वरचें आहे. शास्त्रीबोवांनी संतकवींच्या काव्याचा परामर्श घेतला. मराठी भाषेच्या व्युत्पत्तीबद्दल व व्याकरणाबद्दलहि लहानमोठ्यांस

अुपयोगी पडेल अशा रीतीने लिहिलें. मराठी भाषेच्या अुत्क्रांतीबद्दल शास्त्रीबोवांचें लिखाण मौल्यवान आहे यांत शंका नाही. परंतु ह्या त्यांच्या अभ्यासांतहि अेक मोठी अुणीव दिसून येते. ती ही की त्यांनी अैतिहासिक गद्यवाङ्मयाची अुपेक्षा केली आहे. शिवकालीन व पेशवाओंतील बखरी हा मराठी गद्यवाङ्मयांतील अपूर्व ठेवा आहे. ह्या अुपेक्षेचें कारण असें असूं शकेल की वरील साहित्य प्रचलित राजकीय परिस्थितीवर आधारलेलें होतें. शास्त्रीबोवा अितिहासभक्त असले तरी दैनंदिन राजकीय घडामोडींकडे त्याचें फारसें लक्ष्य नसे. तें अैतिहासिक व्यक्ति व घडामोडींच्या मागें असलेली लोकांची भावना यांवर स्थिर झालेलें असे. आत्मविकास हें शास्त्रीबोवांचें ध्येय असल्यामुळे व्यक्तिपूजेला त्यांच्या लिखाणांत महत्त्वाचें स्थान मिळालें आहे. तें त्यांनी लिहिलेल्या चरित्रावरून व अितरहि पुस्तकांवरून वेळोवेळीं प्रत्ययास येतें. संतवाङ्मयाची महती त्यांनी याच कारणामुळे गायिली आहे. अर्थात् मराठी भाषेची त्यांनी केलेली सेवा अमूल्य असली तरी त्यांची दृष्टि व्यापक नसल्याने वेळोवेळीं त्यांचीं मतें पारखून घ्यावीं लागतात. तसेंच ह्या अेकांगीपणामुळे त्यांनी आपल्या समकालीन गद्यपद्यवाङ्मयाची कुठेच वास्तपुस्त केलेली दिसत नाही. त्यामुळे त्यांच्या वेळीं अिंग्रजी वाङ्मयाच्या आधाराने बाहेर पडूं लागलेलें काव्य, कथा, कादंबरी व निबंधरूपी वाङ्मय त्यांना आकलितां आलें नाही. खरोखर प्रसाराच्या दृष्टीने ह्या वाङ्मयाला केवढें मोठें स्थान आहे. विद्यापीठांत देशी भाषेचा पुरस्कार करावयाचा तो केवळ संतवाङ्मयाच्या थोरवीकरिता, धर्माच्या प्रचाराकरिता, असा शास्त्रीबोवांचा आग्रह दिसतो. परंतु ललितवाङ्मयाची अुपेक्षा त्या काळच्या बहुतेक विद्वानांनी केल्यामुळे शास्त्रीबोवांनाच त्याबद्दल दोषी ठरवतां येत नाही. कारण अुघडच आहे. आताअितकें त्या वेळीं मराठी ललितवाङ्मय समृद्ध नसल्यामुळे सांसारिक दृष्टान्त संतवाङ्मयांतूनच विद्वानांना घ्यावे लागत.

मराठी भाषेवरील शास्त्रीबोवांचें बहुतेक लिखाण अुद्बोधक आहे. त्यांतल्या त्यांत विविधज्ञानविस्तारांतील 'मराठीचा अेक कॅथोलिक भक्त' हा फादर स्टीफन्सवरील लेख अुल्लेखनीय आहे. मराठी ही केवळ परपुष्ट किंवा परधार्जिणी भाषा नसून संस्कृतपूर्व काळांतहि ती अस्तित्वांत होती हें शास्त्रीबोवांनी अनेक अस्सल मराठी शब्दांची पूर्वपीठिका विशद करून दाखवलें आहे. अितकेंच नव्हे, तर गोमंतकीय कोंकणीचा अभिमान धरणाऱ्यांनी मराठीचें ऋण विसरूं नये असा अिशारा दिला आहे. महाराष्ट्राचें सांस्कृतिक अेकीकरण होण्यास 'मराठी-खिस्ती' व कोंकणी आणि दक्षिणी मुसलमानांतहि मराठी भाषेचा अधिक फैलाव झाला पाहिजे असें त्यांनी प्रतिपादन केलें आहे. अुत्तरार्धांत स्टीफन्सचेंच छोटें चरित्र देअून त्यानें मराठी भाषेची कशी योग्य सेवा केली हें सांगितलें आहे.

**अलंकारमीमांसा**— शास्त्रीबोवांचीं संस्कृत व देशी काव्यावरील मतें, त्याचप्रमाणे काव्याविषयी त्यांची अभिरुचि, 'अलंकारमीमांसा' ह्या त्यांच्या चिमुकल्या पुस्तकांत अुत्तम रीतीने प्रकट झालेली आढळून येतात. संस्कृत भाषेंत अलंकारांवर पुष्कळ मोठें साहित्य आहे. आणि साधारणपणें अलंकारशास्त्राचा विचार करतांना संस्कृत आलंकारिकांच्याच पाअुलावर पाअूल टाकून चालण्याची वहिवाट आपल्याकडे पडलेली दिसते. परंतु शास्त्रीबोवांच्या स्वतंत्र आणि विवेचक बुद्धीने त्यांना ह्याहि बाबतींत परंपरेचे दास बनूं दिलें नाही; अुदाहरणार्थ, अुपमेवर व कार्यकारणभावावर अधिष्ठित झालेले अलंकार सोडले तर विषयाची मांडणी, रसचर्चा अित्यादि बाबतींत त्यांचीं मतें पूर्ण स्वतंत्र आहेत.

वर्णन करण्याचे दोन प्रकार (जसें असेल तसें सरळ वर्णन करणें किंवा प्रकारान्तराने वर्णन करणें) स्वभावोक्ति आणि वक्रोक्त आहेत असें सांगून, शास्त्रीबोवांनी हे वेगळे 'अलंकार' नसून 'काव्यांचे आत्मभूत' आहेत व म्हणून त्यांना अलंकार न म्हणतां 'अलंकार्य' म्हणणेंच जास्त अुचित आहे असें प्रतिपादन केलें आहे. त्याचप्रमाणे स्वभावोक्तीचे तीन प्रकार शास्त्रीबोवा मानितात ते असे— नीरस, सरस व कालिक. नीरस स्वभावोक्ति ही अलंकार-शास्त्रांत वर्णिलेली मामुली वर्णनात्मक स्वभावोक्ति. सरस स्वभावोक्तींत रसोत्कर्ष अुत्कटपणें आढळून येतो (संस्कृतांत त्याला रसध्वनि म्हणतात). कालिक स्वभावोक्तींत झालेल्या, प्रत्यक्ष घडत असलेल्या किंवा होणाऱ्या स्थितीचें किंवा प्रसंगाचें चित्र रेखाटलेलें असतें (ह्याला संस्कृतांत भाविक अलंकार म्हणतात). वक्रोक्तीबद्दल देखील शास्त्रीबोवांचीं मतें विचारणीय आहेत. वक्रोक्ताचे पर्यायोक्त, समासोक्ति आणि अतिशयोक्ति असे त्यांनी तीन प्रकार मानले आहेत. ह्या सर्वांचीं लक्षणें जरी जुन्या अलंकारिकांप्रमाणेच शास्त्रीबोवांनी दिलेलीं असलीं तरी त्यांची त्यांनी जी अेकत्र सांगड घातली आहे ती, किंवा अन्योक्ति व अर्थांतरन्यास हे पर्यायोक्ताचेच दोन वेगळे प्रकार आहेत हें त्यांचें विधान बरेंच वादग्रस्त आहे. विशेषत: अर्थांतरन्यास हा ठराविक विधानास पुष्टि देणारा दाखला असल्यामुळे तो पर्यायोक्तांत किंवा शास्त्रीबोवांनी म्हटल्याप्रमाणे 'अलंकार्यां'त सामील न करतां स्वतंत्र अलंकारच मानणें अधिक योग्य वाटतें.

रसासंबंधीदेखील शास्त्रीबोवांचीं मतें विचारणीय आहेत. शृंगार, वीर, बीभत्स, रौद्र, हास्य, भयानक, करुण, अद्‌भुत आणि शान्त हे ठराविक नवरस न मानतां शास्त्रीबोवा भक्ति, वीर, शृंगार, करुण, भयानक, अद्‌भुत, हास्य आणि वत्सल हे आठ रस मानतात. परंपरेने मूळचे आठ रसच खरे व सर्व भावांची स्तब्धता दाखवणारा शान्त रस हा नववा रस मागाहून जोडला गेला. त्यामुळे शान्त रस हा दुय्यम प्रकारचा रस आहे हें शास्त्रीबोवांचें म्हणणें सयुक्तिक वाटतें.

शृंगाररसाबद्दल मात्र शास्त्रीबोवांस अतिशय तिटकारा आहे. शृंगार हा काव्याची गोडी वाढवणारा रस असला तरी तो रसांचा मुकुटमणी आहे हें म्हणणें वाजवी नाही. संस्कृत कवींच्या स्त्रीलंपटपणामुळे शृंगाराचें काव्यांत अवास्तव स्तोम माजलें व त्यामुळे त्याला रसांत अग्रस्थान मिळालें असें शास्त्रीबोवांचें मत आहे. अुलटपक्षीं भक्तीसारख्या 'प्रवृत्ति कायम करून सद्‌गतीची दिशा दाखविणाऱ्या' रसाला संस्कृत काव्यांत अर्धचंद्र मिळाला आहे. शास्त्रीबोवांच्या मतें भक्ति हा सर्वांत श्रेष्ठ रस आहे. त्याच्या खालोखाल वीररस. भक्तिरस व वीररस 'ही दुकल जातिभेदाच्या पलीकडील आहे, अलीकडील नव्हे' असें शास्त्रीबोवा प्रतिपादन करितात, तें भागवत धर्मांतील बंधुभावाच्या तत्त्वास व धारातीर्थी दिसून येणाऱ्या वीरवृत्तीस अनुलक्षून आहे. भक्ति हा रस असावा कीं नसावा ह्याबद्दल अजूनहि साहित्यिकांत वाद होतात. कारण प्राकृत भाषेत, विशेषत: मराठी कवितेंत, भक्तिरसच प्रामुख्याने आढळून येतो. परंतु शास्त्रीबोवा ह्या वादाचे पुरस्कर्ते असले तरी देखील त्यांनी भक्तिरसाच्या समर्थनार्थ जीं वर दिलेलीं कारणें आहेत तीं शास्त्रीय स्वरूपाचीं (म्हणजे भक्तिरस मानला तर त्याचा स्थायीभाव वगैरे कोणता अित्यादि) नसून वैयक्तिक मतांवर व आवडीवर बरींचशीं अुभारलीं आहेत.

अनुक्रमणिका

## राजारामशास्त्री भागवतांची साहित्यसेवा

राजारामशास्त्री भागवतांनी पस्तीस वर्षें जें कांही लिखाण केलें त्याची जंत्री पुढील-प्रमाणे देतां येईलः—

### ऐतिहासिक

(१) मराठ्यांसंबंधाने चार अुद्गार (१८८७), (२) कैसरकडून सुलतानाकडे (१९०६), (३) महाराष्ट्रधर्म (१८९५), (४) पार्स व पारसी धर्म (१८९१), (५) मोगल व मोगली धर्म (१८९०), (६) शककालविचार (१८८९), (७) हिंदुस्तानचा छोटा अितिहास (भाग १-४) (१८८९).

### चरित्रें

(१) शिवाजीमहाराजांचें चरित्र (१९०५), (२) शिवछत्रपतींच्या चरित्रांतील कित्येक मुद्दे (१८९३), (३) संभाजीचें चरित्र (१८९२), (४) राजारामाचें चरित्र (१८९२), (५) रत्नाकरपंत आपा, अहिल्याबाअी होळकरीण, सिधोजी निंबाळकर (१८८९), (६) अेकनाथ (१८९०), (७) तुकाराम, (८) रामदास [अिंग्रजी], (९) बाळशास्त्री जांभेकर.

### धार्मिक

(१) अुपनिषदांची मीमांसा— अैतरेयोपनिषद् (१८९८), (२) श्वेताश्वतरोपनिषद् (१९०४), (३) ब्राह्मण व ब्राह्मणी धर्म किंवा वेद व वैदिक धर्म (१८८९), (४) वेदांतला कोणता भाग कलियुगांतला, कोणता कलियुगापूर्वींचा (१८९९), (५) व्रात्यस्तोम (१८९६).

### सामाजिक

(१) विधवाविवाह सशास्त्र कीं अशास्त्र (१८८६), (२) ब्राह्मणी धर्म व भटी धर्म (१८९९), (३) ब्राह्मण म्हणविणारांस सवाल (१८९९), (४) आमची देशी भाषा विद्यापिठीं शोभणारी आहे कीं नाहीं (१८९२), (५) वपन व क्षात्रियवैश्य, (६) ब्राह्मण व क्षात्रिय, (७) अुमेदवारांची साडेसाती (१९०६), (८) प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु [धर्माची फोड], (९) जशास तसें (१८८४), (१०) ब्राह्मणांचा धर्मासंबंधी जुलूम, (११) विवाह व अुपनयन— सार्थ प्रयोग, (१२) भगवद्‌गीता.

### भाषाशास्त्र, व्याकरण, अलंकार अित्यादि

(१) अलंकारमीमांसा (१८९०), (२) संस्कृत भाषेची विचिकित्सा, (३) प्राकृत भाषेची विचिकित्सा, (४) मराठी भाषेचें लहानसें व्याकरण, (५) पहिलें संस्कृत पुस्तक (१८९६), (६) मराठी लेखनशुद्धि, (७) सोपें संस्कृत व्याकरण.

### मराठी कवींच्या काव्यांतील अुतारे

(१) वामनी वेंचे— हरिविलासांतील, टीपांसह (१८९३), (२) रामदासी वेंचे (१८९३), (३) मोरोपंती कर्णपर्वांतील वेंचे (१८९२), (४) मोरोपंती गदापर्वांतील वेंचे (१८९३), (५) मोरोपंती त्रिपर्वी वेंचे (१८९६), (६) भीष्मभक्तिभाग्य (१८९३).

### संस्कृत संक्षिप्त कृति

(१) स्वल्पकौमुदी, (२) पंचतंत्रसारम्— प्रथमतंत्रसारम्, (३) भगवद्गीतासार— भगवद्योग.

### अिंग्रजी लिखाण

(1) A Course of Eight Lectures in Sansksit (The Wilson Philological Lectures, 1903), (2) Eleven Upanishads (1905), (3) Khordeh Avesta Searched (from a vedic point of view), (4) An Attempt to Analyse Mahabharata (1903), (5) The Deccani Brahman, (6) A key to interpret Veda (1907), (7) Divings into Bhagavadgita— Original Bhagavadgita unearthed, (3) Is Hunduism a Religion ? (1906), (9) To All Vegetarian Brahmins in India, (10) The Origin of Vedangas (unpublished).

### मासिकें व वृत्तपत्रें ह्यांतील अुपलब्ध असलेलें महत्त्वाचें लिखाण

(१) विविधज्ञानविस्तार—

विचारमाधुकरी (सुरुवात १८८३).

ह्यांत शककालविचार, पंचजनविचार अित्यादि लेखमालांचा समावेश होतो.

(१) आमचा देश, आमचे देशी लोक, आमच्या देशी भाषा (सुरुवात १८९०), (२) ज्ञानेश्वरींतील बुज्या, (३) मराठेशाही (सुरुवात १८९०), (४) मराठीचा अेक कॅथॉलिक भक्त (१९०६), (५) महाभारतांतील कांही भाग अुकलण्याचा यत्न (१९०६), (६) लक्ष्मीबाअी झांशीकरीण (१८९५), (७) खाफीखॉनाचा अितिहास (१८९५-९६), (८) वेदार्थयत्नकारांचें स्मारक (१८९४-९६), (९) चातुर्वर्ण्य (१८९६), (१०) स्त्रियांचा पुनरुद्धार (१८९६), (११) फिरंग्यांची अिकडील हकिगत (१८९६).

### सुबोधपत्रिका

(१) अमेरिकेंतील राजाध्यक्ष व सिद्दी (१९०१), (२) कोणत्या कर्मकांडाशीं ब्राह्मणांचा अुभा दावा (१९०१), (३) क्षत्रियांची मूळची पायरी (१९०१), (४) रँगलर् परांजपे (१९०१), (५) राजसत्ता आणि धर्म (१९०१), (६) राष्ट्रीय—सामाजिक विषय (१९०२), (७) अुमरावतीचे मुधोळकर आणि निकृष्ट जाति (१९०२), (८) अेक विधवागृह हवें आहे (१९०२), (९) सहा शत्रु व मित्र (१९०२), (१०) सातान्यांतील ब्राह्मण म्हणविणारीं माणसें (१९०२), (११) आर्यसमाज आणि जातिभेद (१९०२), (१२) क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे (१९०२), (१३) अेक आनंदाची गोष्ट (ब्राह्मणी यात्रा) (१९०२), (१४) प्रो. जिनसीवाले व प्रार्थनासमाज (१९०२), (१५) न्यायमूर्ति चंदावरकर (१९०२), (१६) अितिहासाचीं साधनें कोठे राहिलेलीं वरीं— विलायतेंत कीं आमच्या देशांत (१९०२), (१७) ब्राह्मणी व भिक्षुकी अुर्फ चित्पावनी पद्धत (१९०२).

### सुधारक

(१) शंकराचार्यांचा अद्वैत-सिद्धान्त (१९०२), (२) शंकराचार्यांचा वेदान्त (१९०२), (३) चातुर्वर्ण्यं मया सृष्टम् (१९०३), (४) विवाह व लग्न (१९०३), (५) विधवाविवाह

(१९०३), (६) राजा कालस्य कारणम् (१९०३), (७) शाळांतून धर्मशिक्षण (१९०३), (८) बौद्धधर्म काळोखच (१९०३), (९) मानवगृह्यसूत्र (१९०३), (१०) समुदाय व व्यक्ति (१९०४), (११) जुनें हवें कीं नको, नवें हवें कीं नको (१९०४), (१२) अितिहास व नीति.

**ज्ञानप्रकाश**

(१) शिवाजीमहाराजांचें चरित्र (१९०५), (२) विधवाविवाह (१९०५),

**दीनबंधु**

**अैतिहासिक गंजिफा**

(१) ब्राह्मण म्हणविणारा पिंड, (२) परशुराम, (३) श्रावणी, (४) लग्न व विवाह, (५) महाभारत व व्यास, (६) वैश्यवर्ण, (७) पुराणें.

**पुणें वैभव**

(१) मोरोपंताच्या नलोपाख्यानाचें विवेचन (१८९३).

---

## स्त्रियांच्या म्हणी

(पृष्ठ ३६ वरून पुढे)

(६४७) पोल्या फणसाला डीक अधिक, खुळ्या माणसाला राग अधिक.
(६४८) अंगांत असत, तर कोपरांत फाटत.
(६४९) कुंभ्याला फळें, दरिद्र्याला बाळें.
(६५०) वघितला मट, अन् घातलें दंडवत.
(६५१) जोंवरी पैसा, तोंवरी अैसा.
(६५२) सदाचा पाजी, लग्नांत गाजी.
(६५३) शिकलेली बुद्धि, सांठवलेलें पाणी.
(६५४) चुडीने वाघ घरांत आणणें.
(६५५) खाज डुकराची, मेजवानी कुकडाची.
(६५६) लाडकं कुत्रं व्हट (ओठ) चावलं.
(६५७) लेकीचें काम लावणीचें, अन् सुनेचें काम ठेवणीचें.

– नीळकंठ शंकर नवरे

# परीक्षणें



## धर्म व तत्त्वज्ञान

**History of Dharmashastra**— म.म. पां. वा. काणे, अेम्.अे., अेल्अेल्. अेम्.

वैदिक धर्म किंवा आजच्या मार्षेत हिंदु धर्म हा अितर पंथांप्रमाणे केवळ पारमार्थिक पंथ नसून मानवी जीवनाच्या सर्वांगीण विकासाचें विधिनिषेध दाखविणारें तें अेक व्यापक समाजशास्त्र आहे. परंतु अशा व्यापक दृष्टीने हिंदु धर्माचा अभ्यास न केला गेल्यामुळे आधुनिक सुशिक्षितांस या धर्माचें वास्तविक स्वरूप फारसें अवगत झालेलें दिसत नाही असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. जुन्या धर्मग्रंथांचा परंपरेने अभ्यास करणारे शास्त्रीपंडित अैतिहासिक दृष्टि सोडून देअून विचार करणारे असल्यामुळे प्रचलित सामाजिक प्रश्नांचा धर्मशास्त्रीय दृष्टीने विचार करण्यास त्यांचेंहि ज्ञान अुपयुक्त होत नाही. प्रा. काणे यांच्या History of Dharmashastra या ग्रंथामुळे ह्या दोन्ही अडचणी नष्ट होअून हिंदु धर्माची व्यापकता आणि धार्मिक विधिनिषेधांची अैतिहासिक परंपरा अेकत्र पाहतां येण्याची सोय झालेली आहे. कारण या ग्रंथांत धर्मशास्त्रांतील भोजनास बसतांना कोणत्या दिशेस तोंड करून बसावें ह्यासारख्या तांत्रिक महत्त्वाच्या विषयापासून तों जातिभेद कसा अस्तित्वांत आला ह्यासारख्या गंभीर आणि महत्त्वपूर्ण विषयापर्यंत सर्व लहानमोठ्या विषयांची विचिकित्सा केलेली दिसून येअील.

कोणत्याहि समाजांत अेखादी नवी प्रथा सुरू करावयाची तर त्या समाजाची पूर्वपीठिका आणि नवी आकांक्षा यांचा मेळ घालावा लागतो. या दृष्टीने सुधारणेच्छूस आवश्यक तेवढी सर्व माहिती ग्रंथकर्त्याने दिलेली असल्यामुळे या ग्रंथाची अुपयुक्तता वाढलेली आहे ह्यांत शंकाच नाही. अैतिहासिक माहिती देतांना धर्मशास्त्रग्रंथांबरोबरच नीतिशास्त्र, काव्य, व्याकरण अित्यादि विषयांवरील ग्रंथांचा तर अुपयोग केलेला आहेच, पण ताम्रलेख, शिलालेख, फार काय परदेशी प्रवाशांनी दिलेलीं वर्णनें हींहि विचारांत घेतलेलीं आहेत. ह्यामुळे ग्रंथकर्त्यांच्या पौरस्त्य दृष्टीबरोबरच माहितीची विविधताहि दृग्गोचर झाल्यावांचून राहत नाही.

त्या त्या विषयावरील माहिती अद्यावत् ठेवण्याचाहि ग्रंथकर्त्यांचा प्रयत्न जागोजाग दिसून येतो. जातिभेदावर लिहितांना पृ. १९–२० वर ह्या विषयावरील पाश्चात्य-पौरस्त्य लेखकांच्या ग्रंथांची जी यादी ग्रंथकर्त्याने दिलेली आहे ती पाहिल्यास आणि ठिकठिकाणीं त्या त्या ग्रंथकाराच्या मताबद्दल जें विवेचन केलेलें आहे तें पाहिल्यास ह्याचें प्रत्यंतर चांगलें येअील. ग्रंथकार हिंदु कायदेशास्त्राचा व्यासंगी आहे. ह्यामुळे स्मृतिकालीन नियमांबरोबर प्रचलित हायकोर्टाचे निकालहि या ग्रंथांत पाहावयास मिळतात. तसेंच पाश्चात्य देशांतील प्रचलित कायद्यांशीं तुलना करून स्मृतिकारांच्या मनाची अुदारताहि ठिकठिकाणीं चांगलीच दाखवून दिलेली आहे; अुदा०– 164, 165, 372 पृष्ठांवर शूद्र, अस्पृश्य आणि स्त्रिया ह्यांविषयींच्या स्मृत्युक्त नियमांची पाश्चात्य चालीरीतींशीं केलेली तुलना पाहावी.

आधुनिक सुशिक्षितांच्या प्रतिपादनपद्धतीचें अंधानुकरण न करितां निर्भीड मतप्रतिपादन करणें हा या ग्रंथाचा आणखी अेक विशेष म्हणून सांगतां येअील. हें वैशिष्ट्य ग्रंथकर्त्यांच्या प्रास्ताविक निवेदनांत It is the fashion among many writers...to

hold the caste system responsible for most of the evils from which India suffers at present. To a very large extent I do not subscribe to that view. ह्या शब्दांनी व्यक्त केलेलें आहे. प्रत्यक्ष ग्रंथ वाचीत असतां ह्या विधानाची यथार्थता पदोपदीं प्रत्ययास येते.

धर्मशास्त्रीय विषयांचा शास्त्रार्थ आणि त्याबरोबरच प्रत्यक्ष प्रयोग असे सर्व अेकाच ठिकाणीं देणें हें या ग्रंथाचें आणखी अेक वैशिष्ट्य होय. संस्कृतांतसुद्धा शास्त्रार्थग्रंथांहून प्रयोगग्रंथ वेगळे असतात. हे दोन्ही अेकत्र देण्यामुळे ग्रंथास कांहीसा बोजडपणा आला असला तरी ग्रंथाचें स्वयंपूर्णत्व ह्या दृष्टीने त्याचें महत्त्व फार आहे.

ह्या ग्रंथांतील विविध विषयांचें वैशिष्ट्य दाखवावयाचें झाल्यास त्याकरिता अेक स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल. धर्मशास्त्रीय बारीकसारीक तपशिलापासून महत्त्वाच्या विवाद्य विषयांपर्यंत अनेक विषय या ग्रंथांत आले आहेत. त्यांची यथार्थ कल्पना प्रत्यक्ष ग्रंथ पाहिल्यावांचून येणार नाही. म्हणून तसा प्रयत्न न करितां या ग्रंथांतील कित्येक महत्त्वाच्या विषयांचा नामनिर्देश करूनच या परिचयात्मक निवेदनाचा समारोप करूं.

Lists of crafts from Vedic Litarature 1. 49; Professional castes and guilds p. 66-104; Special privileges claimed by ब्राह्मणs p. 138-147; Disabilities of Sudras p. 154-164; Slavery chap. V, ; शूद्रs p. 320-321; Education of क्षत्रियs, वैश्यs, and शूद्रs, p. 363-367; Admittance to caste p. 389; सपिंड relationship p. 452-460; गोत्र and प्रवर p. 479-496; त्याचप्रमाणे पडदापद्धति,! नियोग, सती, विवाहविच्छेद अित्यादि विषयांवरील प्रकरणें अत्यंत माहितीने आणि परिश्रमपूर्वक लिहिलेलीं आहेत. वेश्यांच्या अधिकारांविषयी १६ व्या प्रकरणांत जें विवेचन आहे, त्यावरून नाजुक विषयांतहि किती हळुवारपणें लेखक लिहूं शकतो याचें प्रत्यंतर येतें. शंकराचार्योंनी विद्वत्परिषदेकडील धर्मनिर्णयाचा अधिकार कसा आणि केव्हा बळकावला याचें पृ. ९७०-९७४ वर जें वर्णन केलें आहे तें आजच्या प्रत्येक सुधारणेच्छूने ध्यानांत घेतलें पाहिजे.

श्रौत यज्ञयाग बंद पडल्यामुळे अलीकडे त्याचें ज्ञान लुप्तप्राय होत चाललें आहे. या ग्रंथांतील २९ ते ३५ पर्यंतच्या प्रकरणांत या विभागावर विस्तृत चर्चा केलेली आहे. हा विषय अत्यंत क्लिष्ट असूनहि श्रौतसूत्रें व प्रयोग यांच्या आधाराने त्याचें सुबोध विवेचन केलेलें आहे. अिंग्रजी भाषेंत श्रौत यज्ञकांडाविषयाअितकें सुबोध, विस्तृत आणि संशोधनप्रधान लिखाण दुसऱ्या कोणींहि केलेलें नाही असें मला वाटतें.

प्रा. महामहोपाध्याय काणे यांच्या दुसऱ्या भागाअितकाच तिसरा भागहि उद्बोधक होअील, व तो पूर्ण करण्याचें सामर्थ्य त्यांस लाभो अेवढीच माझी अीश्वराजवळ प्रार्थना.

सर्व विद्वानांनी प्रा. काणे यांच्या ह्या कृतीचें परिशीलन करणें अत्यवश्यक आहे. आमच्या दुर्दैवी परिस्थितीमुळे ग्रंथ अिंग्रजी भाषेंत लिहावा लागला. हाच मराठींत असता तर शब्दप्रामाण्यवाद्यांना निरुत्तर करतां आलें असतें. कारण धर्मशास्त्राचा अेकहि विषय असा नाही की ज्याच्यावर विरोधी मतें आढळत नाहीत. तेव्हा कोणतें वचन मानावयाचें ? आपल्या बुद्धीला पटेल तेंच ना ? अखेरीस अेवढेंच सांगावयाचें की, काणे जन्मास आले नसते तर असा ग्रंथ आपणांस लाभला नसता. काणेच असलीं प्रचंड व किचकट कामें आस्थेने करूं जाणोत !

ना. गो. चापेकर

## भाषाशास्त्र

**यादवकालीन मराठी भाषा (भाषाशास्त्रीय अभ्यास)—** ले० डॉ. शं. गो. तुळपुळे, अेम्.अे., पीअेच्.डी.; प्रका० के. भि. ढवळे, श्रीसमर्थसदन, गिरगांव, मुंबअी; मूल्य रुपये चार.

सोलापूरच्या डी. अे. व्ही. कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी मुंबअी विद्यापीठाच्या पीअेच. डी. या पदवीपरीक्षेसाठी लिहिलेला हा प्रबंध आहे. भाषाशास्त्राच्या आधुनिक दंडकांस अनुसरून केलेला मराठीच्या अेका कालखंडाचा भाषिक अभ्यास या दृष्टीने हा अेक अभिनव अुपक्रम आहे.

यादवकालीन मराठी म्हणजे सामान्यतः अि. स. ११०० ते १३०० मधील महाराष्ट्रांत बोलली जाणारी भाषा. या विषयावर आजपर्यंत भांडारकर, गुणे, राजवाडे, ब्लोक, डॉडेरेट्, मोडक, कुलकर्णी, नेने अि० अभ्यासकांनी थोडेंबहुत लिहिलें आहे. पण तें केवळ आनुषंगिकच; अुदा० राजवाडे व डॉडेरेट ज्ञानेश्वरीपुरता विचार करतात. ब्लोक व कुलकर्णी अेकंदर मराठीच्या विकासांत या कालखण्डाचा जातां जातां विचार करतात, तर नेने महानुभाव वाङ्मयाकडे जास्त लक्ष देतात. पण यादवकालीन मराठीचा साकल्याने अभ्यास करून या कालखंडांतील भाषिक विकासाची सांगोपांग चर्चा अद्याप कोणीं केली नव्हती. आणि हा या ग्रंथाचा विशेष आहे.

दुसरी गोष्ट. भाषाशास्त्रीय वाङ्मय अिंग्रजींत बरेंच कमी असल्यामुळे व मुंबअी विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत पाणिनीयेतर संस्कृत व्याकरणपरंपरा, प्राकृत भाषा व अर्वाचीन युरोपियन भाषा यांना दुय्यम स्थान असल्याने (कांहींना तर नाममात्रच स्थान होतें) व कांही स्वभावदोषामुळे अुपर्युक्त लेखकांपैकी कांहींच्या लेखनांत शास्त्रीय विचारपद्धतीचा अभाव वा ढिलेपणा दिसून येतो. प्रा. तुळपुळ्यांनी आपल्या परीने आधुनिक भाषाशास्त्रांत आढळणारी व्यापक दृष्टि, तौलनिक अभ्यासपद्धति, अभिनिवेशाचा अभाव व चिकित्सक बुद्धि व्यक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. अुपर्युक्त पूर्वसूरींना प्राचीन महानुभाववाङ्मय व अपभ्रंश वाङ्मय अुपलब्ध नसल्याने त्यांची कुचंबणा झाली हें मान्य करूनसुद्धा त्यांपैकी कांहींना निरभिनिवेश शास्त्रीय दृष्टि ठेवतां आली नाही. यावरून डॉ. तुळपुळ्यांच्या शुद्ध शास्त्रीय भूमिकेचें महत्त्व लक्षांत येतें.

तिसरी गोष्ट. मराठीवरील भाषिक लिखाणांत मराठीचा दुवा अेका किंवा अनेक प्राकृत भाषांशीं किंवा अपभ्रंशांशीं अंदाजाने जोडण्यांत येत असे. पण प्रस्तुत प्रबंधांतील यादवमराठीचा अपभ्रंशाशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न अधिक निश्चित स्वरूपाचा व साधार आहे. "यादव मराठी ही संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश या प्रत्ययी आणि वर्तमान मराठी या सामासिक (Analytic) भाषांच्या मधली स्थिति आहे. तींत भाषेच्या प्रत्ययी स्वरूपाचे अवशेष आणि सामासिक स्वरूपाचीं बीजें दोन्ही आढळतात. अतअेव अिण्डो-आर्यन् भाषांच्या अितिहासांत तिचें स्थान प्रत्ययी प्राचीन आणि सामासिक अर्वाचीन भाषांमधील अेक दुवा असें आहे. तात्पर्य, यादवमराठी ही **'प्रत्ययी-सामासिक'** अशा द्विविध स्वरूपाची भाषा होय (पृ. ६९)." हें प्रमेय अुचारप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया, शब्दसिद्धि, प्रयोग, वाक्यरचना अि० प्रमाणांनी सिद्ध करून पुस्तकाच्या ४ थ्या भागांत यादवमराठीवरील परभाषांचे, विशेषतः कानडीचे, परिणाम त्यांनी अजमावले आहेत.

प्राचीन मराठीचा अभ्यास करतांना मुख्य दोन अडचणी येतात, व त्या स्वाभाविकच या ग्रंथाच्या मर्यादा ठरतात. पहिली आणि अत्यंत महत्त्वाची अडचण म्हणजे चिकित्सित संहितांचा अभाव. ज्ञानेश्वरपंचायतनाचे अभंग किंवा मुकुंदराजांचे ग्रंथ वगळून लेखकाने हा दोष टाळण्याचा प्रयत्न केला तरी राजवाडेसंपादित ज्ञानेश्वरीची मौलिकता विवाद्य आहे. तिच्या प्राचीनपणाबद्दल किंवा शुद्धतेबद्दल आग्रहीपणा न दाखवतां पुण्यास सध्या तयार होत असलेली अेकनाथपूर्वकालीन ज्ञानेश्वरीची चिकित्सित आवृत्ति लेखकाने नजरेखालून घालावी व महानुभाववाङ्मय सांकेतिक लिप्यांत ग्रथित होअीपर्यंत अर्वाचिलें गेलें नाही ना याचा शोध घ्यावा. चिकित्सित संहितांच्या अभावामुळे निर्माण झालेल्या दोषास लेखक जबाबदार नाही.

दुसरी महत्त्वाची अडचण म्हणजे अपभ्रंशावरील (वस्तुतः मध्ययुगीन भारतीय आर्य-भाषांवरील) भाषिक विवेचनाचा अभाव. अपभ्रंशांतील कांही ग्रंथांच्या चांगल्या आवृत्त्या युरोपियन भाषांतून असून त्यांच्या प्रास्ताविक विभागांत कांही लेखकांनी त्यांतील भाषेचे व्याकरणविशेष स्पष्ट केले आहेत. पण अपभ्रंशांचें वाङ्मयीन पुराव्यावर आधारलेलें अैतिहासिक व्याकरण वा तत्सम ग्रंथ अिंग्रजी, फ्रेंच किंवा जर्मनमध्ये नसल्यामुळे आणि अितर क्षेत्रांत मोठ्या असलेल्या पंडितांनी अपभ्रंशांबद्दल अंदाजाने किंवा ज्यांच्या ग्रंथांच्या भाषाशास्त्रीय विश्वसनीयतेबद्दल शंका आहे अशा कांही प्राकृत व्याकरणकारांचे आधारावर जीं मतमतांतरें निर्माण केलीं आहेत, त्यांमुळे अर्वाचीन आर्यभाषांच्या प्राचीन स्वरूपावर लिहिणारांची फार मोठी कुचंबणा होते. डॉ. कत्र्यांनी प्रस्तुत पुस्तकाच्या अिंग्रजी प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणे पाली, अर्धमागधी, महाराष्ट्री, शौरसेनी अि० धार्मिक व वाङ्मयीन प्राकृत-भाषा, बौद्ध व जैन संस्कृत शिलालेखांतील प्राकृत, धर्मपद, हिंदुस्थानाबाहेर अुपलब्ध झालेल्या प्राकृत, किंवा निया येथे सांपडलेल्या जुन्या प्राकृत पोथ्या व अपभ्रंश यांचा तौलनिक अभ्यास झाल्याखेरीज मध्ययुगीन भारतीय आर्यभाषांच्या 'अर्वाचीन' अवस्थेंतील संक्रमणावर योग्य प्रकाश पडणार नाही, आणि याचें प्रत्यंतर डॉ. तुळपुळयांच्या प्रास्ताविक विभागांत दृष्टीस पडतें. अुदाहरणार्थ, प्रस्तावनेंतील पृ. २६-४२ (§§ ९-१२) मध्ये ते यादवमराठीचा तत्पूर्व अपभ्रंशाशीं दुवा जोडतात. पण हा अपभ्रंश कोठला? त्यांनी दिलेल्या संदर्भग्रंथाच्या यादींतील (पृ. ७) 'भविसयत्त कहा' गुजराथमध्ये अि. स. च्या १० व्या शतकांत (?) रचली गेली. 'सावयधम्मदोहा'चा लेखक प्रा. जैनांच्या म्हणण्याप्रमाणे देवसेन (अि. स. १०००) किंवा डॉ. अुपाध्यांच्या मताप्रमाणे योगिंदु (अि. स. ६००) आहे म्हटलें, तरी दोघेहि प्राचीन महाराष्ट्राबाहेरील लेखक आहेत. किंबहुना स्थलकालसंबद्ध भाषिक अभ्यासपद्धति 'अपभ्रंश' नामक आर्यभाषेच्या अवस्थेला लागूं पडते ही जाणीव प्रस्तुत लेखकास नसावी असें दिसतें (पृ. १८-४२ मधील अपभ्रंशावरील विस्तृत चर्चा पाहा). त्यामुळे 'मराठी ही अनेक भाषांपासून निघाली असा सिद्धान्त कित्येक प्रतिपादतात, तसें नसून ती अपभ्रंशांपासून निघाली हें माझें मुख्य म्हणणें आहे' (पृ. १९) असें लिहिणारे लेखक भिन्नप्रांतीय अपभ्रंशांशीं मराठीचा संबंध जोडतांना पाहून नवल वाटतें.

वस्तुतः मराठीचा विकास दक्षिणापथांतील प्राकृत शिलालेख, महाराष्ट्रांत रचलें गेलेलें प्राकृत व अपभ्रंशवाङ्मय, व जैन संस्कृतींतील 'अशुद्ध' रूपें यांतून दृग्गोचर होतो. डॉ. वैद्य व प्रा. जैन यांच्या परिश्रमांनी 'दाक्षिणात्य' अपभ्रंश ग्रंथ अुपलब्ध झाले असून यादवमराठीचा संबंध या ग्रंथांतील भाषेशीं अधिक चांगला व स्वाभाविक तऱ्हेने जमूं शकतो या गोष्टीकडे

अनुक्रमणिका

मी लेखकाचें लक्ष वेधूं अिच्छितों. प्राचीन महाराष्ट्राच्या सीमा भिन्न असल्या तरी आर्यभाषा बोलणारे लोक गोदावरीच्या दक्षिणेला बरेच दूर कर्नाटक व आंध्र प्रांतांत-पसरलेले होते. याचा शिलालेखांतील पुरावा नजरेआड करूं नये (अुदा० Jagayyapath Stupa I A Vol. II, Epigraphica Carnatica VII p. 6.)

अपभ्रंशाबद्दल अशी भूमिका स्वीकारल्यामुळे पुढील सर्व विवेचन निरनिराळ्या ग्रंथाधारें केलें तरी परप्रांतीय अपभ्रंशांतील अुदाहरणांचे त्यांना आधार द्यावे लागले. सुदैवाने भारतीय आर्यभाषांचा विकास सर्व प्रांतांतून कांही विशिष्ट दिशांनी झाल्यामुळे त्यांच्या लेखनांत फारसा चमत्कारिकपणा आला नाही. पण पुढील आवृत्तीचे वेळीं त्यांनी ही सुधारणा केली तर बरें होअील.

तसेंच 'परभाषांचा संसर्ग' या विभागास त्यांनी जरा चमत्कारिक सुरुवात केली आहे. "दोन भिन्न भिन्न भाषिकांच्या निकट सहवासाने त्यांच्या भाषांचा अेकमेकींवर परिणाम होअूं शकतो. ही अवस्था यादवकालीन मराठीची झाली. द्राविडी भाषिकांशीं तिचा निकटचा संबंध आल्याने कांही बाबतींत या आर्यभाषेला द्राविडी वळण लाभल्याचें दिसेल" (पृ.३१९). यांपैकी पहिलें विधान ठीक आहे. पण 'यादवकालीन मराठी' या भारतीय आर्यभाषेच्या दाक्षिणात्य बोलींवर अि. स. ११००-१३०० मधील कालांत हा 'निकटचा संबंध' आला असें का डॉ. तुळपुळ्यांना म्हणावयाचें आहे? आर्यांनी भारतवर्षांत पाअूल टाकल्यापासून किंबहुना (बलुचिस्तानांतील ब्राहुअी भाषा लक्षांत घेतां) त्याचे आधींपासून द्राविडीआर्यभाषांचा निकट संबंध नाही का? वर्णप्रक्रियेवरील परिणाम (पृ. ३३१-३३५) वर्णन करतांना दिलेल्या य—व श्रुति, मूर्धन्य व्यंजनें व दंततालव्य वर्ण केवळ यादवमराठींतच का आहेत? आर्य भाषा द्राविडी भाषांच्या (तसेंच मुण्डा भाषासमूहांच्या) फार मोठ्या प्रमाणावर ऋणी आहेत. पण हें ऋण फार प्राचीन कालापासून त्यांनी घेतलें आहे. मराठीच्या भोवती द्राविडी भाषा पसरल्यामुळे तिने त्याचे विशेष अुचलले असें गृहीत धरतांना भारतीय आर्यभाषांचा चिवटपणा व सामर्थ्य आपण विसरतों. गोमांतक सोडून कानडा ते कोचीनपर्यंत विखुरलेल्या कोंकणी भाषकांची बोली, साहित्यिक स्थैर्य नसतांना, द्राविडी भाषांच्या माहेरघरांत किती तरी शुद्ध स्वरूपांत राहिली आहे. (डॉ. कत्रे– The Formation of Konkaṇi पाहा). मराठीने कानडीचें किंवा तेलगूचें ऋण घेतलें हें मान्य, पण मराठीने विशिष्ट विशेष द्राविडी भाषेपासून घेतला हें म्हणतांना तो आर्यभाषांचा अंतर्गत विकास नाही आणि आर्यभाषांकडून तो विशेष द्राविडी भाषांनी अुसना घेअून त्याला द्राविडी वळण मिळालें नसून तो शुद्ध द्राविडीच आहे हें सिद्ध केलें पाहिजे. कानडी-मराठीसंबंधापुरतें आपल्यास पाहावयाचें असल्याने कानडी भाषा मराठीपेक्षा जुनी असली तरी कानडीचा व तिच्या मातृस्थानीं असणाऱ्या द्राविडीचा विकास करण्याचें बरेंच श्रेय चंद्रगुप्त मौर्याच्या काळापासून मगधांतून दक्षिणेंत येअून वसाहत व मतप्रसार करणाऱ्या जैन श्रमणांना व अर्धमागधी व जैन शौरसेनी अभ्यासणाऱ्या त्यांच्या शिष्यप्रशिष्यांना आहे. वैदिक संस्कृति आत्मसात् करणाऱ्या द्राविडांनीं संस्कृतवर द्राविडी भाषांची छाप ठेविली. तसेंच आर्यभाषांचें वळण त्यांच्या भाषेला मिळणें अपरिहार्य होतें. अशा परिस्थितींत आपल्याला ज्याची व्युत्पत्ति लागत नाही व ज्याला सदृशशब्द शब्द द्राविडी भाषांत सांपडतो तो द्राविडी ठरवणें अशास्त्रीय ठरतें; अुदाहरणार्थ, मराठी 'तूप' हा कानडी 'तुप्प'पासून व्युत्पादतांना तो हेमचंद्रानेहि देशी म्हणून देशी नाममालेंत दिला आहे अेवढा आधार पुष्कळांना पुरतो. पण देशी नाममालेंत पुष्कळ शब्द तद्भव असल्यामुळे

व कानडीनेहि आर्यभाषांचें ऋण घेतल्यामुळे कानडी तुप्प < सं. तृप्र <। तृप् अशा तऱ्हेने संस्कृतशीं संबद्ध आहे हें आपल्या लक्षांत येत नाही.

आपल्या आधारग्रंथांचे आधारें 'साक्षात् मराठींत' आलेल्या त्यांच्या द्राविडी शब्दांच्या यादींत (§) पृ. ३२४ नंतर दाक्षिणात्य अपभ्रंशांतील कित्येक शब्द आहेत; अुदा० चोक्खं (शुद्ध), ओलग्ग (सेवा करणें), तलार (तराळ), विट्टु (विष्णु), अेला (वेलदोडा), बहल (पुष्कळ) अि. यांची व्युत्पत्ति सं. चोक्ष, अव + लग्न, तलवर, विष्णु, अेला, बहु यांपासून लागते.

अेकंदरींत विचार करतां डॉ. तुळपुळ्यांनी हा भाग परिश्रमपूर्वक लिहिला असला तरी 'मराठी व द्राविडी' हा विषय काळजीपूर्वक संशोधन करण्यासारखा आहे.

प्रस्तुत अुपक्रम नवीन असल्यामुळे व्युत्पत्तिविषयक कांही दोष व मतभेद राहणारच. तथापि प्रस्तुत पुस्तकाची द्वितीयावृत्ति काढतांना त्याकडे लक्ष दिल्यास बरें होअील; अुदा० पृ. ८४ कीळी < कीटकी नव्हे. < कृमि; सुहाव < सुशोभित नसून < सुभव्य; पृ. ९५ वेल < वल्लि नसून सं. वेल्लि आढळतो; पृ. ९६ चोंच < अप. चुंच, < सं. चंचु; मोळा < अप. मोलअ (महाप्राणत्व अपभ्रंशावस्थेंतच); पृ. ११५ आण < आज्ञा, < वचन नव्हे; पृ. ११६ वहिला < अप. पहिलअ; पृ. १२१ दिहा < अप. दिअह, पृ. १२२ नीनिली < अप. णिंद = निद्रा द्र > ज्ज > न चमत्कारिक दिसतें; पृ. १२४ मोळलिक < अप. मोक्कलिय < सं. मुक्त; पृ. ३२२ विट्टु (विष्णु), अंधगविट्ठि (अंधकवृष्णि) अि० रूपें महापुराणांत दाक्षिणात्य अपभ्रंशांत येतात.

पृ. ७१ मधील अुदाहरणावरून ऋ ची प्रक्रिया नुसती अ, अि, अु, नसून दाक्षिणात्य अपभ्रंशाप्रमाणे अ, आ, अि, अी, अु, अू, र, रि, रु अशी होते. पृ. ९१ (३) वरील टीपेंत रयुक्त जोडव्यंजनांच्या किंवा महाप्राणतालव्ययुक्त जोडव्यंजनांच्या मागील दीर्घ स्वरास अनुनासिकत्व येणें हा अिण्डो-आर्यन भाषांचा स्वभाव नसून मराठीने तो स्वतंत्र निर्मिलेला दिसतो असें म्हटलें आहे. पण पुष्पदंतकृत महापुराणांत वंकी (वक्रा), विंचुओ (वृश्चिक), अंसू (अश्रु) वगैरे रूपें यादवमराठीचें पूर्वरूप दाखवतात. तिसऱ्या भागांतील तद्धित प्रक्रियेंतील (पृ. १७४-२७६) प्रत्ययांची यादी व दाक्षिणात्य अपभ्रंशांतील यादी जवळ जवळ अेक आहे; अुदा० अप. आल / अल्ल } > आल्हः; आळी, आळु, ल; अप. ड > डा, डी, डें, लें; अप. (अि-, अु-) क, अिक, अुक अि०, पण यांचा संबंध तसा जोडला गेल्याचें दिसत नाही. सता तृतीया अपभ्रंशांत आढळते, पण पृ. ३०२-३०३ मध्ये तिचें अुदाहरण दिसत नाही. पृ. ३०३ मधील सावयधम्मदोहा २०६ "वयहं गयहं धम्मु गड" हें सतिसप्तमीचें अुदाहरण कसें ? पृ. ३०३-३०५ मधील वाक्यरचनेचा प्रपंच अधिक केला असता तर बरें झालें असतें. ब्लोकचें L'indo aryen मधील अुद्बोधक विवेचन लक्षांत घेतां ही अुणीव पुढील आवृत्तींत भरून निघेल अशी आशा आहे. किरकोळ दोषांची वा मतभेदांची यादी वाढवण्यांत स्वारस्य नाही.

वरील विवेचनांत जागोजाग विधायक सूचना केल्यामुळे त्यांची पुनरुक्ति न करतां पुढील आवृत्तींत (महानुभाववाङ्मय व ज्ञानेश्वरी यांना आधारभूत असलेल्या) यादवकालीन बोलभाषा, अेक तौलनिक शब्दकोश, विषय व लेखक यांची सूचि दिली तर प्रस्तुत ग्रंथाची संदर्भाच्या दृष्टीने अुपयुक्तता अधिक होअील अेवढेंच सुचवितों. मीं वरील परीक्षणांत जागोजाग

दाक्षिणात्य अपभ्रंशांतील अुदाहरणें घेतलीं आहेत, त्यांवरून पुष्पदंतवाङ्मयाचें यादवकालीन मराठीच्या दृष्टीने महत्त्व स्पष्ट होअील.

शेवटीं, यादवमराठीवर तत्कालीन वाङ्मय, अिंग्रजी, मराठी, फ्रेंच व जर्मनमधील भाषाशास्त्रीय वाङ्मय, अपभ्रंश ग्रंथ, शब्दकोश, व्याकरणें व नियतकालिकें यांतील विवेचनाच्या, अुदाहरणांच्या व व्युत्पत्तींच्या आधाराने यादवकालीन मराठीची सविस्तर व सोपपत्तिक चर्चा करून मराठींतील भाषाशास्त्रीय वाङ्मयांत जी अुत्कृष्ट भर घातली त्याबद्दल मी डॉ. तुळपुळे यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

ग. वा. त.

## साहित्यशास्त्र

**रसविमर्श**— ले० डॉ. के. ना. वाटवे, अेम्. अे., पीअेच्. डी.; प्रका० नवीन किताबखाना, पुणें, १९४२; मूल्य रुपये पांच.

देशी विद्यापीठांनी पीअेच्.डी.ची पदवी देण्याचा केलेला अुपक्रम वैयक्तिकदृष्ट्या कांही अुपकारक झाला असो वा नसो, मराठी साहित्याच्या दृष्टीने तो निःसंशय अुपकारक झाला आहे हें नागपूर व मुंबअी विद्यापीठांच्या डॉक्टोरेटकरिता लिहिल्या गेलेल्या प्रबंधांकडे दृष्टि फेकिली असतां अुत्तरोत्तर अधिक पटत चाललें आहे. या प्रबंधांपैकीं अगदी अलीकडील म्हणजे प्रो. वाटवे (आता डॉक्टरहि) यांचा 'रसविमर्श' हा होय. याला वस्तुतः 'रसकोश' हें नांवच अधिक सार्थ होअील असें वाटतें. अितका सांगोपांग रसविचार यामधील अुण्यापुऱ्या पांचशे पानांमध्ये भरला आहे. संस्कृत व मराठीमधील आजतागायतची रसचर्चा, नवीन मानसशास्त्रीय रसोपयोगी सामग्री, त्या सामग्रीचा जुन्या रसव्यवस्थेशीं पडताळा, त्या रसव्यवस्थेतील ग्राह्याग्राह्याचा विचार, काव्याच्या रसेतर अुपांगांचा रसाशीं असलेला संबंध, अितर ललितकलांमधून व्यक्त होणारें रसाचें स्वरूप, पाश्चात्य साहित्यचर्चेमधील रसाचें स्थान व शेवटीं आपल्या मताने आवश्यक असणारें रसव्यवस्थेचें संस्करण अितका सारा भरघोस विचार प्रस्तुत प्रबंधांत आल्याने आम्हीं वर सुचविलेलें नांव तात्काल मान्य होण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

तथापि या रसमंदिराचा खरा गाभारा म्हणजे पाश्चात्य, अर्थात् आज मान्य असलेल्या, मानसशास्त्राच्या कसोटीवर जुनी रसव्यवस्था घासून पाहणें व ती त्या कसोटीस अुतरण्यास आवश्यक असणारें संस्करण सुचविणें हाच होय. डॉ. वाटवे यांनी अेवढेंच केलें असतें तरी ग्रंथ स्वयंपूर्ण झाला असता. या दृष्टीने ग्रंथाचे निकष अेक ते सात हे भागच विशेष पाहण्यासारखे होत, व त्यांतहि रसांचें मानसशास्त्रीय अधिष्ठान व रससंख्यानिर्णयाचीं तत्त्वें हीं दोन प्रकरणें मूलगामी विचार करणारीं अशीं मानावयास हवींत. या विचारावरच भक्तिरसास रसमालिकेंत स्थान देणें किंवा रौद्र-बीभत्सांचें स्थान हिरावून घेणें अित्यादि संस्करण अवलंबून आहे. या दोन्ही बाबतींत डॉ. वाटवे यांनी खोल व सांगोपांग विचार केला आहे यांत शंका नाहीं. आजच्या मानसशास्त्रांतील विचारहि अपरिवर्तनीय किंवा निर्विवाद अशा स्वरूपाप्रत पावलेला नाहीं, तेव्हा त्यावर आधारलेला रसविचारसुद्धा अगदी अखेरचा झाला असा आग्रह तात्त्विक दृष्ट्या धरतां येणार नाहीं. तथापि आज अुपलब्ध असलेला मानसशास्त्रीय विचार समजाअून घेअून त्यावर आपली रसव्यवस्था बसवून दाखविण्याचा अेक जवळ जवळ संपूर्ण

व शक्य तों निःपक्षपाती प्रयत्न या नात्याने प्रस्तुत प्रबंधाचें महत्त्व कोणाहि साहित्यचर्चा करणाऱ्या व्यक्तीस पटल्यावांचून राहणार नाही.

रसविमर्शकारांपुढे खरे प्रश्न पुढीलप्रमाणे होते : रस म्हणजे काय ? म्हणजे काव्यवाचनाच्या वेळीं रसिकाच्या मनाची अवस्था कशा प्रकारची असते ? या अवस्थेस मानसशास्त्रीय कोणती घटना तंतोतंत जुळणारी आहे ? म्हणजे आपण ज्याला रस म्हणतों त्याला आधुनिक मानसशास्त्रांत काय म्हणतां येईल ? मानवाच्या कोणत्या भावना या अवस्थेप्रत पोचूं शकतात ? म्हणजेच रसपदवी कोणत्या भावनांना देतां येईल ? अर्थात् रसाची कसोटी अथवा कसोट्या कोणत्या ? या भावनांची संख्या निश्चित करणें शक्य असल्यास ती किती होईल ? अर्थातच जुने रस जसेच्या तसे राहतील कीं त्यांतील कांही काढून टाकून नवीनांची त्यांत भर घालावी लागेल ? असें केल्यावर रसव्यवस्थेचें स्वरूप कोणत्या प्रकारचें राहील ?

या साऱ्या प्रश्नांचा विचार करीत असतां लेखकास पूर्वी झालेल्या चर्चेचा परामर्श घ्यावा लागला आहे. त्यामुळे संकलनाचें बरेंच काम करावें लागलें आहे. वर वर पाहणारास हेंच कार्य अधिक झालें असल्याचा भास होतो. पण हें करीत असतां पूर्वीच्या चर्चेमधील अपुरा भाग दाखवून 'न्यून तें पुरतें' लेखकाला करावें लागलेंच आहे. तें पुरतें करण्यासंबंधी कित्येकांचे कदाचित् मतभेद असतील, तथापि लेखकाने तें केलें नाही असें नाही. नवीन निर्णायक कांही सांगण्याचा प्रयत्न क्वचित् सफल झाला नसला तरी अधिक विचारास चोदना मिळण्याच्या दृष्टीने तो महत्त्वाचा ठरेल. उपरिनिर्दिष्ट मूलभूत विचारांच्या बाबतींत डॉ. वाटवे यांना काय म्हणावयाचें आहे त्याची चिकित्सा करणें म्हणजेच त्यांच्या प्रबंधाचें स्वरूप स्पष्ट करणें होय.

पैकी रसास्वाद अथवा काव्यानंदमीमांसाच प्रथमतः पाहूं. रस व आस्वाद हे शब्द विश्वनाथाने समानार्थकच मानले आहेत. आस्वाद म्हणजे आनंद. याबाबत डॉ. वाटवे यांना दोन नवीन गोष्टी सांगावयाच्या आहेत असें दिसतें. पहिली, आहार्यज्ञान व दुसरी क्रीडारूप आत्माविष्कार. काव्य अथवा ललितवाङ्मय आपण वाचावयास बसतों, तेव्हा प्रथम ज्या गोष्टी लेखक सांगतो आहे त्या घडलेल्या गोष्टी या अर्थाने खऱ्या आहेत असें आपण तेवढ्यापुरतें मान्य करतों. त्या घटनांचें हें ज्ञान आहार्यज्ञान होय. काव्यास्वादाला हें ज्ञान आवश्यक आहे हें खरें, परंतु अेवढ्याने वाटवे म्हणतात (पृ. १८८) तशी सबंध काव्यानंदाची अुपपत्ति लागत नाही. आनंद होण्यास आवश्यक असणारें तें ज्ञान आहे, पण तो आनंद नव्हे. नुसत्या आहार्यज्ञानाने आनंद होता तर भूमितीमध्ये कांही वेळां खऱ्या नसणाऱ्या गोष्टी खऱ्या, तात्पुरत्या तरी, धरण्यांत येतात त्या वेळीं आनंद प्राप्त होता. आनंदाच्या मीमांसेंत कार्यरूप आनंदाबरोबर साधनाचाहि विचार कित्येक वेळां येतो; अुदा० प्रत्यभिज्ञा अथवा तादात्म्य हें आनंदाचें स्वरूप नसून त्याचीं साधनें आहेत. आहार्यज्ञानांत मी निराळा व वस्तुस्थिति निराळी असें भेदज्ञान असतें तें काव्यानंदाचें कारण असेंहि तेथेच रसविमर्शकार म्हणतात तेंहि सर्वस्वीं खरें नव्हे. सुखाच्या वेळीं काव्यगत व्यक्तींशीं आपला भेद असतो अशा ज्ञानाची जरूरी नाही. अुलट त्यामुळे झाला तर आनंद कमीच व्हावयाचा. भेदज्ञानाचा अुपयोग शोकरसास्वादाच्या वेळीं होईल. काव्यगत व्यक्तींशीं अतितादात्म्य झाल्याने जें दुःख होईल तें या भेदज्ञानाने निरस्त होण्याचा संभव. आहार्यज्ञान ही काव्यानंदाची, निदान तिच्या स्वरूपाची, अुपपत्ति असती तर स्वतः विमर्शकारांना आपली पुढील क्रीडारूप आत्माविष्काराची अुपपत्ति पुढे मांडावी लागली नसती.

क्रीडारूप आत्माविष्काराच्या अुपपत्तींत दोन जुन्या अुपपत्ति अेकत्र आणल्या आहेत: अेक म्हणजे सर्व ललितकला व त्याबरोबर ललितवाङ्मयहि क्रीडेच्या स्वरूपाच्या असतात ही होय; दुसरी म्हणजे सर्व कला म्हणजे आत्माविष्कार होय. या दोन्ही अुपपत्ति खऱ्या आहेत असें गृहीत धरूनहि काव्यानंदमीमांसा, विशेषतः रसिकगत आनंदाची मीमांसा, या दुहेरी अुपपत्तीने लागणार नाही. काव्यानंदाचा विचार म्हणजे रसिकाच्या मनःस्थितीचा विचार होय. आत्माविष्कार कलावंताचा, निर्मिति करणाराचा, होतो; कलाकृतीचा आस्वाद घेणाराचा काय होतो? आस्वाद म्हणजे क्रीडा हें जरी मान्य केलें तरी तो आत्माविष्कार असें म्हणतां येणार नाही. वाचक स्वतःशींच काव्यास्वाद घेत असला तर त्या मनःस्थितीला आविष्काराचें रूप येण्याचें कारण नाही. आविष्कारापासून सुख व्हावयाचें असेल तर तो कोणीं पाहिला व त्याचें त्यामुळे आपल्याविषयींचें मत चांगलें झालें-अशी भावना व्हावयास हवी. कलावंताच्या बाबतींत हें शक्य आहे. अेखाद्या गोष्टीविषयीचें आपलें मत म्हणजे आत्माविष्कार असें म्हटलें तरीहि तें कलावंतास व्यक्त करावयाचें असतें; रसिकास फक्त त्या कलावंतास काय म्हणावयाचें आहे तें जाणावयाचें असतें. आता रसिकाला आनंद होअून तो त्याच्या मुखावर दिसणें किंवा प्रत्यभिज्ञेनंतर 'जग हें असेंच असतें' अशा अर्थाची मुद्रा त्याच्या मुखावर व्यक्त होणें म्हणजे रसिकाचा आत्माविष्कार असें म्हणावयाचें झाल्यास आत्माविष्काराचा अर्थ फार ताणला जातो असें म्हणावें लागेल. हा आत्माविष्कार होतो आहे याची जाणीवहि वाचकास बहुतेक वेळां नसेल; मग त्या जाणीवेने आनंद होण्याचें दूरच राहिलें. या आत्माविष्काराचें स्वरूप अितकें गौण आहे की अुपपत्ति म्हणून त्याचा स्वीकार होणें फार कठिण दिसतें.

काव्यानंद म्हणजे रसिकाच्या ठिकाणीं होणारी रसोत्पत्ति. या रसोत्पत्तीस मूलाधार म्हणून जे स्थायिभाव जुन्या रसव्यवस्थेंत सांगितले गेले आहेत त्याला आधुनिक मानसशास्त्रांत सर्वांशीं जुळणारी कल्पना कोणती हें ठरविणें हें दुसरें महत्त्वाचें काम होतें. आधुनिक मानसशास्त्रांतील या स्थायिभावांशीं जुळणारा भाग म्हणजे Sentiments होत असें प्रथम दबकत व पुढे ठामपणें (पृ. ११५) 'विमर्श'कारांनी सांगितलें आहे. 'स्थायिभाव म्हणजे Sentiments च याबद्दल शंका अुरत नाही' असें ते म्हणतात. हा त्यांचा निष्कर्ष चिंत्य आहे असें वाटतें. Sentiments हे त्यांनीच प्रामुख्याने अुल्लेखिलेल्या काव्यगत व्यक्तींत असतात. ते पुष्कळच काल मनांत राहणारे व अेकंदर स्वभावास वळण देणारे असतात. त्यांना स्थिरवृत्ति हें लेखकाने दिलेलें नांव ठीकच आहे. परंतु रसिकाच्या हृदयांत ते अितके स्थिर नसतात. अेक शाकुंतल वाचतांनाच अेकाच बैठकीला प्रथम शृंगार, नंतर वत्सल व नंतर शोकाचा अनुभव रसिकाला येतो. Sentiments प्रमाणे वाचकाच्या मनास वळण देणाऱ्या स्थिरवृत्ति म्हणजे रस अथवा स्थायिभाव नव्हत. शिवाय Sentiments म्हणजे जर स्थायिभाव असतील तर नवीन मानसशास्त्राने मान्य केलेले मैत्री, अभिमान, द्वेष, आदर अित्यादि जे Sentiments त्यांनाहि स्थायिभाव म्हणणें प्राप्त होअील. वस्तुतः काव्यगत व्यक्तींच्या भावनांचें प्रतिबिंब जसेंच्या तसें रसिकाच्या मनांत अुतरतें, किंवा 'रसिकाच्या हृदयांत तेंच कंपन सुरू होतें', ही भूमिका सर्वांशाने खरी नव्हे. ज्या स्थिरवृत्तींमुळे काव्यगत व्यक्ति अेकमेकांशीं अटीतटीने किंवा विशेष जिव्हाळ्याने वागतात त्या रसिकाच्या हृदयांत स्थिर होतात असें नाही. डार्सी अथवा अेलिझाबेथ, हॅम्लेट् किंवा मॅक्बेथ् यांचे सेंटिमेंट् रसिकाचे सेंटिमेंट् नसतात. या वाङ्मयकृति वाचून रसिकाच्या मनांत रसनिष्पत्ति झाली ही गोष्ट तर मान्य करावयास हवी. परंतु अुपरिनिर्दिष्ट काव्यगत व्यक्तींमधील Sentiments वाचकाचेहि

आहेत हें म्हणणें बरोबर ठरणार नाही. जुन्या स्थायिभावांचें खरोखर साहश्य सेंटिमेंटपेक्षा Primary emotions शीं अधिक आहे. त्यांना साहाय्यक गोष्टी मिळाल्या कीं त्यांतून रसोत्पत्ति होते. ही रसोत्पत्ति त्या त्या कालापुरती प्रबळ व अुत्कट झाली तरी ती स्थिरवृत्ति नसते. जुन्या रसव्यवस्थेत तत्कालीन व अुत्कट आणि प्रबल अशा भावनोत्पत्तीचाच विचार झाला आहे. Sentiments सारख्या मनुष्यस्वभाव कमी अधिक प्रमाणांत स्थिर बनविणाऱ्या मनोवृत्तींचा विचार झाला नाही असें वाटतें.

यापुढील तिसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे भावनांना स्थायिभावांची, म्हणजे पुढे रस होअूं शकणाऱ्या भावनांची, पदवी देतांना कोणती कसोटी लावावयाची हा होय. डॉ. वाटवे यांनी जुन्या नव्या विचारांचें मंथन करून ज्या कसोटी पुढे मांडल्या आहेत त्या अितक्या भिन्न-स्वरूप आहेत की त्यांवरून रसांची संख्या आधी निश्चित करून त्या कसोटी पुढे मांडल्या गेल्या आहेत असें अेखाद्या टीकाकारास सहज म्हणतां यावें. आस्वाद्यता म्हणजेच अुत्कट-त्वाने आस्वाद्यता ही रसाची पहिली कसोटी म्हणून त्यांनी सांगितली आहे. रस म्हणजेच आस्वाद ही विश्वनाथाची कल्पना बरोबर धरली व जेथे जेथे असा आस्वाद मिळणें शक्य आहे तेथे तेथे रस आहे असें म्हटलें, फार झाल्यास अुत्कटत्वाची अट घातली म्हणजे झालें ही सरळ भूमिका आहे. पण या भूमिकेवरून रससंख्या मर्यादित अथवा निश्चित करणें शक्य नाही व आवश्यकहि नाही. प्रा. केळकर यांनी तसा फारसा प्रयत्नहि केला नाही. परंतु वाटवे यांना तो करावयाचा होता. क्वचित् ओझरतें 'या संख्येचा आग्रह नाही' अशासारखें अुद्गार ते काढीत असले तरी, विवेचनाचा ओघ मात्र ही संख्या निश्चित करण्याकडेच आहे. कांही रस कमी करून व कांही अधिक घालून त्यांनी ही संख्या निश्चित केली आहे व नवरसस्वरूप-दर्शन म्हणून अेक सबंध प्रकरणहि त्या अनुरोधाने लिहिलें आहे. रसांची संख्या मर्यादित करण्याकरिता रसयोग्य भावनांची संख्या मर्यादित केली व त्याकरिता त्या भावना प्राथमिक असल्या पाहिजेत अशी दुसरी अट घातली. या प्राथमिक भावनांची संख्या आज कमीत कमी चौदा आहे, पण रसांची संख्या अेवढी नाही असें वाटत असल्याने त्यांतील कांही भावना आस्वाद्य अथवा अुत्कटत्वाने आस्वाद्य असणें या कसोटीस अुतरत नाहीत म्हणून गाळल्या. त्यांत जुन्या बीभत्सरसाला रजा द्यावी लागली. अुत्कट आस्वाद्यता या पहिल्याच कसोटीस अुतरूं शकणाऱ्या, पण प्राथमिक नसणाऱ्या, द्वेष, असूया, गर्व, पूर्वग्रह अित्यादि साधित भावना रसमूल अशा स्थायिभावाच्या पदवीस कां पात्र नाहीत याचें विवेचन मात्र केलें नाही. साधित भावना अेकाच मुद्यावर गाळतां येणें शक्य आहे, व तो म्हणजे त्या प्राथमिक नसल्याने स्वभावतःच अुत्कट आस्वाद देण्यास असमर्थ आहेत. परंतु असें म्हणणें खरें ठरणार नाही. वेणीसंहारांत द्वेष, मास्तरांदकींत असूया, Pride and Prejudice मध्ये गर्व आणि पूर्वग्रह या भावना अुत्कटतेने आस्वाद्य झाल्या आहेत हें नाकबूल करणें कठिण आहे. यांतील प्रत्येक भावना स्थिरवृत्ति होअूं शकते हें आजच्या मानसशास्त्रास मान्य आहे. Sentiment म्हणजे जर स्थायिभाव तर या sentimentsनाहि रस पदवी देणें योग्य होअील.

या दोन कसोट्यांबरोबर अुदात्तीकरणाची व अुचितविषयनिष्ठत्वाची अशा आणखी दोन कसोट्या डॉ. वाटवे यांनी सांगितल्या आहेत. याही कसोट्यांचें समर्थन अुत्कटत्वाने आस्वाद्यतेच्या मुद्यावर करतां आलें पाहिजे. भावनेचें स्वरूप अुदात्त झाल्याखेरीज ती अगदी प्राथमिक स्वरूपांत सहृदयाला आकर्षक वाटत नाही असा विचार पुढे मांडून तो रतिभावनेला

लेखकानें लावून दाखविला आहे. अितर भावनांच्या बाबतींत मात्र दाखविला नाही. पेशवाअी-मधील लावणीवाङ्मयामधील रतिभावनेचें स्वरूप कितीसें अुदात्त आहे असा प्रश्न येथे मनांत येतो व गाथा-सप्तशतीमधील अनेक गाथांच्या बाबतींत व्यंजना अधिक आली तरी त्यामधील रतिभावना अुदात्त आहेच असें म्हणतां येत नाही. पण हा प्रश्न बाजूला ठेवला तरी भयासारख्या भावनेंत व ती भावना ज्या वाङ्मयांत प्रधान आहे अशा वाङ्मयांत अुदात्तता कितपत असते? अुचित विषयनिष्ठत्व या कसोटीस वैयक्तिक स्वरूप फार आहे. अुचितानुचितत्व ठरवणें पुष्कळ वेळां कठिण जातें. डॉ. वाटवे यांनी अनुचित प्रेमाचें अुदाहरण म्हणून परस्त्रीवरील प्रेमाचा अुल्लेख केला, परंतु विवाहित प्रौढाच्या तरुण कुमारिकेवरील प्रेमाचें काय? तेंहि अक्षम्य असें म्हटलें तर अग्निमित्र व दुष्यंत यांच्या मालविका व शकुंतला यांच्यावरील प्रेमाचें काय? तें आजच्या कालांत अनुचितच म्हटलें पाहिजे; व तसें म्हटल्यास शाकुंतलांत शृंगाररसोत्पत्ति होत नाही असें म्हणावें लागेल. साहित्यचर्चेमधील विचार कमीअधिक वैयक्तिक स्वरूपाचा असला तरी अुचितानुचितत्व किंवा क्षुद्रत्वमहत्त्व या गोष्टी ठरविण्यांत वैयक्तिक मताला फार वाव मिळतो. मग व्यक्तिनिरपेक्ष अशा मानसशास्त्राकडे धाव घेण्याची काय आवश्यकता?

रसांमध्ये गौणप्रधानभाव ठरविणें म्हणजे अुत्कृष्ट आस्वादाची कसोटी सैल करणें होय. कारण तो ठरविण्याची मुख्य कसोटी अुत्कट आस्वादाची होय. दुसरी व गौण कसोटी सार्वत्रिकता किंवा सर्वजनाभिमतता होय. डॉ. वाटवे यांनी भक्तीला अद्‌भुत आणि भयानकाच्या वर स्थान दिलें आहे. त्याचें कारण ती अधिक अुत्कट आस्वाद देअूं शकते हें होय. अद्‌भुत व भयानकासहि रसांत स्थान मिळालें तें कृपेनेच होय. कारण त्यांचे स्थायिभाव अुत्कटतेने व स्वतंत्र तऱ्हेने आस्वाद्य झालेले नाहीत असेंच वाटवे यांना वाटतें. जुगुप्सा व क्रोध यांसंबंधी त्यांना तेंच म्हणावयाचें आहे (पृ. २५०). "तथापि तारतम्याने बोलावयाचें झाल्यास भय व विस्मय या भावना जास्त आस्वाद्य आहेत." तेव्हा त्यांना रस पदवी द्यावी व जुगुप्सेला मात्र देअूं नये असें त्याचें म्हणणें. केवळ तारतम्यानेच जे आस्वाद्य ठरतात त्यांना रस पदवी देण्याची अितकी भीड ठेवण्याचें कारण नव्हतें; जुगुप्सेबरोबर त्यांनाहि रजा द्यावयाची होती. शिवाय अुत्कट आस्वाद हीच जर अगदी प्राथमिक कसोटी रसत्व ठरवितांना लावावयाची आहे तर त्यांचा गौणप्रधानभाव ठरवितांनाहि तीच गोष्ट लक्षांत घ्यावी; निदान वर ज्या चार कसोट्या अभिकृत म्हणून अुल्लेखिल्या तेवढ्याच लक्षांत घ्यावयाच्या. परंतु गौणप्रधानभाव ठरवितांना संमिश्रता (शृंगार), विस्तृतता व सार्वत्रिकता (करुण), पदोपदीं अनुभवाला येणें (पृ. २५३ हास्य) या गोष्टी विचारांत घेतलेल्या दिसतात. भक्तिभावना अत्यंत अुत्कट आस्वाद देअूं शकत असूनहि हास्य व वत्सलाच्या खाली जाते; कारण ती भावना धर्मप्रवण लोकांपुरती मर्यादित आहे. शांताची भावना तर तितकीच अुत्कट आस्वाद देण्यास समर्थ असूनहि फार थोड्या लोकांस अनुभवास येते म्हणून भय व विस्मय या कृपेने रस पदवी प्राप्त झालेल्या भावनांच्या पेक्षाहि खाली म्हणजे शेवटींच जाते. हास्याला वत्सल व भक्ति यांच्याहि वर ठेवण्यास तिचा पदोपदीं अनुभव येतो हें कारण असावें. कारण तीमध्ये भावनांश कमी असल्याने अुत्कटता नाही असें लेखकच सांगतात. यावरून असें दिसतें की आस्वादाच्या अुत्कटतेबरोबर त्या भावनेचा आविष्कार होण्याची वाङ्मयांतील प्रसंग संख्याहि लक्षांत घ्यावयाचे आहेत. शांत, अद्‌भुत आणि भयानक यांचे वाङ्मयांत आढळण्याचे प्रसंग कमी कमी असल्याने त्यांचीं स्थानें रसमालिकेंत खाली खाली गेलेलीं आहेत. या साऱ्याचा निष्कर्ष असा की रस पदवीचा विचार करतांना अुत्कटत्व, प्राथमिकत्व म्हणजे मूल-

भूतत्व, अुचितविषयनिष्ठत्व, अुदात्तत्व, संमिश्रत्व, सार्वत्रिकत्व व शेवटीं अनेक वेळां प्रत्ययास येणें अितक्या गोष्टींचा विचार करावा लागतो. यांत आणखीहि अेक दोन गोष्टी येणें शक्य आहेसें दिसतें. या गोष्टी बऱ्याच भिन्नस्वभाव असल्याने वर म्हटल्याप्रमाणे 'विमर्श'कारांना कांहीं भावना रसयोग्य वाटतात, म्हणून त्यांची सोय करण्याकरिता त्यांनी अितकीं लक्षणें सांगितलीं आहेत. स्वतंत्रपणें अेक कसोटी ठरवून तीस अुतरतील त्यांना रस पदवी दिली असें वाटत नाही.

पण सर्वांत अडचण आली ती करुणरसाच्या बाबतींत. त्याचा स्थायिभाव जो शोक तो प्राथमिक भावनारूप नाही. शोक ही साधित भावना आहे, व साधित भावना म्हणजे व्यभिचारीभाव आहे असें 'विमर्श'कारांनीच ठरविलें आहे. परंतु तिचा अुत्कट आस्वाद अनुभवास येतो ही गोष्ट तर सर्वजनमान्य आहे. तेव्हा तिला अेका प्राथमिक भावनेचें अधिष्ठान द्यावयास हवें अेवढ्याकरिता सहानुभूति (sympathy) या अगदी सर्वसामान्य मानसशारीर अवस्थेचा आश्रय केला आहे. तिचें वर्णन मानसशास्त्रांत highly generalised psycho-physiological property असें केलेलें आहे. ती कांहीं अेकाच स्वतंत्र प्रवृत्तीची सहचर भावना नव्हे. दुसऱ्यांच्या भावनांचा प्रतिध्वनि आपल्यांत अुमटणें हें तिचें स्वरूप. असें जर आहे, तर शोकरसाकरिताच तिचा आश्रय करण्याचें कारण नाही. ज्याप्रमाणें शोक त्याप्रमाणें अितर भावनांमध्येहि तिचा अुपयोग करितां येअील; शृंगारांत किंवा वीरांत किंवा भयानकांत तिचा अुपयोग तितकाच करितां येअील. किंबहुना सारा काव्यानंद जर काव्यागत व्यक्तींच्या भावना आपल्यास अनुभवतां येणें यांत असेल तर साऱ्याच रसांत या सहानुभूतीचा अुपयोग करितां येअील. ताटस्थ्याने सर्व प्रतिकूल भावनांना प्रतिबंध होअून सहानुभूतीने सर्व अनुकूल भावनांचा आस्वाद घेतला म्हणजे झालें.

'रसविमर्श'मधील भक्तिरसाचें विवेचन सुंदर साधलें आहे. रस म्हणजे sentiment हें आपलें अुपरिनिर्दिष्ट मत गृहीत धरून भक्ति हा sentiment कसा होअूं शकतो हें लेखकाने सविस्तर व सोदाहरण दाखवून दिलें आहे. भक्तिरसास स्वतंत्र स्थान न देअूं अिच्छिणारांनी तें समग्र लक्षपूर्वक वाचणें आवश्यक आहे. परंतु भक्तीची भावना अितर रसयोग्य भावनांपेक्षा फार निराळी म्हणजे अत्यंत संमिश्र आहे ही गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे; अितकी की तिला प्राथमिक भावना कां म्हणावें याबद्दल शंका येणें शक्य आहे. अितर स्थायिभावांच्या बाबतींत सहजप्रवृत्ति अेकेकच दिली आहे. भक्तीच्या बाबतींत मात्र त्या पांच (पृ. ३४९) किंवा आठहि (पृ. २७२) दिल्या आहेत. यांत दैन्यासारखी साधित भावनाहि आली आहे. विमर्शकारांनीहि दैन्यास सहजप्रवृत्तीमध्ये अेके ठिकाणीं (पृ. ८८) स्थान दिलेलें आहे. तथापि बहुतेक ठिकाणीं ती साधित भावना असल्याचें ते लिहितात (पृ. ११९, १२३, १२९, ३४८ व ३४९). ती प्राथमिक भावना या दृष्टीने तिचें विवेचन भक्तिरसाच्या प्रतिपादनांतहि नाही. पान २७२ वर भक्तीच्या संमिश्र भावनेंत अुदात्तता या प्राथमिक भावनेचा अुल्लेख केला आहे; पण पृ. ८८ वरील सहचरप्रवृत्ति किंवा त्याच्या सहचरभावना यांच्या कोष्टकांत तिचा कोठेहि अुल्लेख नाही. या दोन्ही भावना भक्तिरसाच्या प्राथमिक भावनांच्या यादींत येअूं नयेत असें वाटतें. वस्तुतः भक्तिभावना अितकी संमिश्र वाटते की तिला साधित भावनेचेंच स्वरूप आलेलें आहे. साधित भावनांच्या स्थिरवृत्ति (Setiment) होतात तशी हीहि भावना झाली आहे. पण विमर्शकारांना ही स्थिति नको आहे; कारण तसें झाल्यास द्वेष, असूया, अभिमान अित्यादि स्थिरवृत्तींना रस पदवी देण्याचा प्रसंग यावयाचा. भक्तिभावनेस रस म्हणावयाचें असेल तर

शरणागतीसारखी अेकच सहजप्रवृत्ति तिचें मूळ मानावें. असें केल्याने अितर रसांनी आपली न ठरवलेली अशी अेकच सहजप्रवृत्ति तिचें मूळ राहील व अद्भुताची जिज्ञासा, भयाची पलायनवृत्ति, शोकाची सहानुभूति यांची प्राथमिक अवस्थेंत तरी आवश्यकता अुरणार नाही. आज जें विवेचन आलें आहे त्यांत पांच प्राथमिक सहजप्रवृत्तींचें मिश्रण किंवा पृ. २७२ वरील आठ प्रवृत्तींचें मिश्रण अितर दृष्टींनी सुं[illegible] [illegible] या विवेचनास प्रतिकूल [illegible]चा संभव दिसतो.

रसविमर्शाचा खरा गाभारा अेवढाच. बाकीचा भाग म्हणजे या मंदिरापुढील सभामंडप किंवा प्रदक्षिणेचा चौफेर मार्ग होय. रसमंदिराचें समग्र दर्शन [illegible] बहिर्भाग रसिकांनी पहावयास हवा. परंतु अितकी सवड ज्यांना नसेल त्यांनी वर ज्याची चर्चा झाली आहे तेवढा तरी पहावयास हवा. विमर्शाच्या शेवटीं [illegible] मराठी साहित्यशास्त्र पौरस्त्य व पाश्चात्य साहित्यशास्त्र यांच्या समन्वयाच्या मार्गाने कसें जावयास हवें आहे हे विमर्शकारांनी सांगितलें आहे. कांही वर्षांपूर्वी तें केवळ पौरस्त्य अथवा केवळ पाश्चात्य मार्गाने जात असलें तरी आज सुदैवाने तें विमर्शकारांनी सुचविलेल्या मार्गानेच जात आहे ही समाधाची बाब आहे. या दोन्हींपेक्षा अगदी स्वतंत्र निराळ्या मार्गाने ते जाणें आज तरी शक्य दिसत नाही. विमर्शकारांच्या विवेचनाचा रोखहि तसा दिसत नाही. त्यांना समन्वयावरच भर द्यावयाचा आहे हें स्पष्ट दिसतें; व तें कोणासहि मान्य होण्यासारखें आहे.

रसविमर्श लिहून डॉ. वाटवे यांनी मराठी साहित्यशास्त्राची मोठी कामगिरी बजाविली यांत शंका नाही. 'रसाविषयी सारें कांही' असें त्याचें यथार्थ वर्णन करितां येअील. अर्थात् रसचर्चा येथे संपली असें नव्हे. तथापि रसविचार किती दृष्टींनी होअूं शकतो याची कल्पना अभ्यासकांस या ग्रंथावरून खास येअील. मानसशास्त्र आधीच फार गुंतागुंतीचें. तें काव्यास किंवा वाङ्मयास लावून दाखविण्याचा अितका पद्धतशीर प्रयत्न मराठींत तरी हाच आहे. गुंतागुंत बाजूस सारून हें सारें शक्य तों सुगम करून दाखविण्याची पराकाष्ठा विमर्शकारांनी केली आहे, व ती पुष्कळच अंशांनी यशस्वी झाली आहे. प्रचंड परिश्रम, चौफेर वाचन, चिकित्सक दृष्टीचा मोठ्या प्रमाणावर अवलंब, तपशीलाचा संभार निवडून त्याची केलेली सूक्ष्म छाननी, क्वचित् बारीकसारीक अुदाहरणें सोडल्यास विवेचनामधील व्यापक सुसंगतता अित्यादि विशेषांनी युक्त असें हें लेखन झालें आहे. मराठी साहित्यचर्चेमधील अेक महत्त्वाचा टप्पा म्हणूनच त्याचा केव्हाहि अुल्लेख होअील. त्यावर प्रहार करावयाचा झाल्यास आधी बराच विमर्श करूनच तें करणें योग्य होअील. अविचारितरमणीय लेखनाने तें करूं पाहणें सर्वस्वीं अनुचित होय.

रा. श्री. जो.

## वैद्यक शास्त्र

**सचित्र प्रथमोपचार**— ले० डॉ. वि. ना. भावे; प्रका० वि. ह. दामले, नवीन किताबखाना, पुणें २; मूल्य रु. १।.

आजच्या यंत्रयुगांत युद्धकाल हा शास्त्रीय वाङ्मयनिर्मितीस अतिशय पोषक आहे. प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष युद्धाची झळ लागल्याने युद्धाच्या मागची विचारसरणी समजावून घेण्याची प्रवृत्ति अगदी अक्षरशत्रु माणसांत सुद्धा निर्माण झाल्याशिवाय राहत नाही. मग प्रत्यक्ष आपल्या अंगावर अग्निगोल पडण्याची शक्यता दिसूं लागल्यावर तातडतोबीच्या अुपायांच्या

ज्ञानाकडे लोकांचें लक्ष लागलें तर नवल तें काय? आणि आज आपण अशाच प्रसंगांतून जात असल्यामुळे डॉ. भावे यांचें प्रथमोपचारांवरील पुस्तक विशेष स्वागतार्ह– विशेषतः मराठीचें ज्ञान नसलेल्या जनतेच्या मोहल्यांतून "Join the A. R. P."सारखे अिंग्रजी अक्षरांचे फलक लटकवणारे राष्ट्रीय युद्धप्रयत्न पाहिले म्हणजे लोकांना आपल्या संरक्षणा-संबंधीच्या मातृभाषेंतील पुस्तकांची अुणीव अधिकच बोचक होते आणि या बोचणीवर डॉ. भावे यांचें पुस्तक म्हणजेच अेक प्रथमोपचार आहे. आणि याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे. युद्धकालांतच काय पण शांततेच्या कालांतसुद्धा शरिराचें सामान्य आणि प्रथमोपचारांचें विशेष ज्ञान आधुनिक युगांतील प्रत्येक नागरिकाला असणें जरूर आहे. पुस्तकांतील माहिती आणि मांडणी शास्त्रशुद्ध असून सामान्य माणसालाहि समजेल अशा सोप्या भाषेंत लिहिल्याने त्याची अुपयुक्तताहि वाढली आहे.

सु. फ.

## अितिहास

**१ पुणें नगर संशोधन वृत्त खंड १ ला**— संपादक व प्रका० श्री. चिं. ग. कर्वे, चिटणीस, पुणें नगर संशोधन समिति, भा. अि. सं मंडळ, पुणें २, १९४२; मूल्य रु. १.

**२ शिव-चरित्र-साहित्य खंड ८ वा**— प्रका० चिटणीस, भारत अितिहास संशोधक मंडळ, पुणें २, १९४२; मूल्य रु. १॥.

भारत-अितिहास-संशोधक-मंडळाने प्रसिद्ध केलेले हे दोन साधनग्रंथ आहेत आणि दोन्हीहि त्या संशोधनसंस्थेच्या परंपरेप्रमाणेच संपादिलेले व प्रकाशिलेले आहेत. पैकी शिव-चरित्रसाहित्याचा खंड हा आठवा असल्यामुळे त्यांतील साधनसामग्रीची पूर्वीच्या सात खंडांवरून बऱ्याच जणांना कल्पना आलेली आहे. शिवाय या खंडाला व्यक्तिस्थलनामांची स्वतंत्र सूची व आरंभीं वर्गीकृत अशी विषयसूची स्वतंत्र दिलेली आहे. चिकित्सक वाचकांची तीमुळे चांगलीच सोय झाली आहे. शिवाय प्रकाशित साधनांमध्ये विशेषत्वाने आढळलेल्या किंवा त्यांवरून अुत्पन्न झालेल्या महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधी सूचक विवेचन प्रस्तावनेमध्ये श्री. वत्सजोशी यांनी साक्षेपाने दिलेलें आहे. त्यावरून शिवछत्रपतींनी आपल्या राज्याभिषेका-पासून चालू केलेला 'राजशक' हा अि. स. १८२९ पर्यंत अखंड चालू होता, कित्येक म्हणतात त्याप्रमाणे तो मध्यंतरीं बंद झालेला नव्हता, हा मुद्दा आणि अितर कांही नवीन बाबी थोडक्यांत ध्यानांत येतात. 'शिवाजी राजांनी देवालयाच्या मशिदी जेथे झाल्या होत्या तेथे त्या पाडून त्यांवर पूर्ववत् मंदिरें अुभारलीं ह्यासंबंधी मूळ अुलेख' या खंडांत प्रसिद्ध होत आहे ही कौतुकाची गोष्ट आहे. "शिवाजी राजांनी मुसलमानी परराज्य घालवून तेथे स्वसत्ता स्थापिली म्हणजे काय केलें त्यांत हीहि गोष्ट राजव्यवहारकोशाप्रमाणें येते" हें या-वरून ध्यानांत येतें—हा अगदी नवा प्रकाश म्हटला पाहिजे. असो.

नगर-संशोधनवृत्ताचा पहिला खंड हा मंडळप्रकाशनविभागांतील अभिनव प्रकार आहे. यामुळे आणि त्यांतील विषय भाषा वगैरे बाबतींत वाचण्यास अधिक सुलभ असल्यामुळे अधिक लोकांकडून वाचला जाणें शक्य वाटतें. जुन्या पेठांची व्याप्ति, वसविण्याचा अितिहास, जुने पूल, जुन्या विहिरी, जुने हौद, बागा, नळ, रस्ते, ओढे, वाडे, छत्र्या अित्यादि किती तरी कुतूहलजनक गोष्टींचा या लेखांत अुल्लेख मिळूं शकेल. आनंदीबाअीचें भातुकलीचें घर,

शिवाजीचा लाल महाल, फर्मांन बाडी कोठे होती ? अित्यादि माहिती अैतिहासिक स्थलनिश्चितीच्या तसेंच कांहीं प्रचारांच्या समजुतीच्या दृष्टीने अुपयुक्तच ठरेल. आणि या प्रकाशनाने कित्येक नवीन अभ्यासकांना स्फूर्ति मिळून अधिक लोकांचे परिश्रम अितिहासमंदिराच्या सजावटीच्या कार्याला लागतील असाहि संभव आहे.

परंतु अशा प्रकारच्या ग्रंथप्रकाशनाला अुत्साहजनक वातावरण अुपलब्ध होत नाही हीच गोष्ट फिरून अेकदा प्रस्तुत शिवचरित्रसाहित्यखंडाच्या प्रस्तावकांनी अगदी आरंभींच स्पष्ट शब्दांत मांडली आहे. आणि ही गोष्ट केवळ सर्वस्वीं प्रस्तुत युद्धजन्य परिस्थितीचाच परिणाम आहे असें प्रतिपादन करणें कठीण असल्यामुळे या बाबतींत अधिकाधिक आश्रय देण्याचा विचार जसा अितिहासाभिमानी महाराष्ट्रीयांनी केला पाहिजे तसाच आपल्या ग्रंथांना अधिकाधिक आश्रय मिळविण्यासाठी अशा प्रकारच्या ग्रंथांच्या प्रकाशकांनीहि केला पाहिजे. आणि हें कोणत्या तरी प्रसंगाने नमूद करणें अवश्य आहे. साधनग्रंथप्रकाशनाचें महत्त्व आता सर्वमान्य झालें आहे. पण त्याबरोबरच त्याच्याशीं अगदी आपुलकीने संबंध ठेवण्याला झटणाऱ्यांनाच केवळ नव्हे तर दुरूनहि परिचय करून घेणाऱ्यांना आता त्याच्याबद्दलचा दिसून येणारा अवास्तव आग्रह हा वेडाच्या थराला जाअून भिडूं लागला आहे याचीहि जाणीव होअूं लागली आहे. छापावयाचें त्यांतील अक्षरन् अक्षर छापण्यासारखें असलें पाहिजे हा दंडक आताच्या कागदाच्या महर्घतेंतच केवळ नव्हे तर तत्पूर्वीहि सदभिरुचि आणि आवश्यकता यांच्या मर्यादा ओळखणाऱ्या कोणालाहि पटण्यासारखा आहे. त्या दृष्टीने कोणाहि प्रकाशकाने काय छापावें आणि किती छापावें याबद्दल कांही अुपयुक्त नियम करण्यासाठी अेक समिति नेमण्याची गरज अुत्पन्न झाली आहे. विशेषतः लोकाश्रयावर व्हावयाच्या प्रकाशनांबाबद अधिक चोखंदळपणा आला पाहिजे; अुदाहरणार्थ, प्रस्तुतसारख्या साधनग्रंथांत 'या घराण्यांतील पुरुषांनी आपले संग्रहांतील जुने कागद आणून दिल्यास मावळांतील शिवकालीन अितिहासांत चांगलीच भर पडणार आहे' असल्या अर्थवादात्मक वाक्यांची पुनरुक्ति आता पुरे झाली ! कागदांचीं वर्णनें वगैरे गोष्टी अेका काळीं अवश्य होत्या, त्या आता पुरे झाल्या नाहीत काय ? त्यासाठीं जिज्ञासूने प्रत्यक्ष मंडळांत जाअून पाहावयाचें तें पाहावें किंवा चौकशी करावी. साधनग्रंथांत टिपणेंहि छापलीं जातात. त्यांत साधनांना आवश्यक अशा रेखीव प्रस्तावांपेक्षा आत्मनिवेदन आणि तर्कटांचीच भरती प्रमाणाबाहेर किंवा अप्रस्तुत अशी होअूं लागली तर त्याचा संक्षेप करणें अवश्यच ठरलें पाहिजे. यापेक्षा निश्चित ज्ञान अितकें वाढलें, अवांतर माहिती अितकी गोळा झाली आहे, या सर्व साधनांचा आधार अमुक अमुक क्रम देअून संग्रहांत ठेविला आहे, अितकें संकलित वृत्त देअून लोकांच्या हातीं दिलें म्हणजे तपशिलांत लक्ष घालणाऱ्यांना मार्गदर्शनहिं होअील आणि छपाअींत होणारा अपव्यय वांचेल. सूत्ररूपाने हा मुद्दा मांडला आहे. खरें म्हटलें तर याचा अधिक विस्तार व चर्चाच झाली पाहिजे.

दि. वि. का.

## कोश

**बालकोश**— भाग पहिला; संपा० ग. रं. भिडे, बी. अे.; प्रका० व्यावहारिक ज्ञानकोश मंडळ लि., कोल्हापूर, १९४२; मूल्य रुपये सहा.

श्री. ग. रं. भिडे यांनी व्यावहारिक ज्ञानकोश पुरा करून हा दुसरा कोश हातीं

घेतला आहे. तीन भागांत मुलांना शास्त्रीय स्वरूपाचें ज्ञान सुबोध रीतीने देण्याचा त्यांचा हेतु फार स्तुत्य आहे. त्याप्रमाणे या पहिल्या भागांत विश्वाच्या अुत्पत्तीपासून मनुष्याच्या अुत्पत्तीपर्यंतचा विषय आलेला आहे. याला 'बालविज्ञानकोश' म्हणणें जास्त योग्य होअील. आज शाळेंत भूगोल या नांवाने जो विषय खालपासून वरपर्यंत आलटूनपालटून कसातरी शिकविला जातो व जो पुढील आयुष्यांत भूमिति—बीजगणिताप्रमाणेच निरुपयोगी बनून विसरला जातो, त्यांतील कांही भाग या कोशांत सुसंगत व सचित्र मांडला आहे. आअीन्स्टाअीनच्या सापेक्षतासिद्धान्तासारखें थोडेंसें शास्त्रीय व गणिती विवेचन फक्त कॉलेजांतील विद्यार्थ्यांसच कळण्याजोगें असलें तरी व बाकीची माहिती मनोरंजक वाटली नाही तरी अभ्यसनीय वाटेल यांत शंका नाही. आपल्या मुलांना शास्त्रीय अभ्यासाची किंवा व्यवहाराची बैठक नसल्याने ललितेतर लिखाण कंटाळवाणें होतें. शास्त्र आणि व्यवहार यांची अुपयुक्त सांगड आपल्या अभ्यासक्रमांत घातली गेलेली नाही. अभ्यासाचीं पुस्तकें विज्ञानरंजित न करिता वाङ्मय आणि विज्ञान असे दोन पक्ष निर्माण केले जातात. त्यामुळे मुलें सहज गम्य-रम्य अशा वाङ्मयविषयाकडेसच अधिक आकर्षिलीं जातात व बहुधा त्यांच्यामध्ये विज्ञानाविषयी नावड अुत्पन्न होते. तेव्हा अशीं पुस्तकें यांत अितर धडे घालून शाळांतून ठेविलीं पाहिजेत. पालकांनी घरीं घेअून ठेवल्यास मुलें वाचीत नाहीत हा सर्वांचाच अनुभव आहे. शाळेंतील बोंडल्यांतून बहुतेक ज्ञानाचें दूध मुलांच्या पोटांत जातें. तरी शालेय नित्यवाचनासाठी अशा पुस्तकांचा अुपयोग व्हावा.

संपादकांनी याला कोश म्हणून मुलांना चिचकावून सोडूं नये अशी आग्रहाची विनंती आहे.

## चरित्र

**प्रणामाञ्जलि**— ले० गो. चि. भाटे; प्रका० मा. गो. भाटे; ८३० सदाशिव, पुणें २; मूल्य रु. १.

सुप्रसिद्ध विवेचक व प्रवासी लेखक आणि समाजसुधारक प्रि. गो. चि. भाटे यांचें हें विद्यार्थ्यांसाठी तयार केलेलें लहान चरित्रात्मक पुस्तक आहे. यांतील बारा चरित्रांपैकी तीन संस्थानिक, चार वाङ्मयसेवक, दोन राजकारणीपुरुष, दोन सुमाजसुधारक व अेक सद्गृहस्थ अशी वर्गवारी करितां येअील. सर्व चरित्रनायक महाराष्ट्रीय व अनेकांच्या परिचयांतले असेच आहेत. राजे बाळासाहेब पंत व प्रो. अण्णासाहेब कर्वे यांखेरीज बाकीचे अविद्यमान आहेत. प्रस्तावनेंत प्रिन्सिपलसाहेबांनी आगाअूच सुचविलें आहे की, हीं निव्वळ चरित्रें नसून त्या त्या व्यक्तींसंबंधी प्रासंगिक व नैमित्तिक लेख आहेत. तरुणांनी जनहित साधण्यासाठी व आपल्या आयुष्याचें सार्थक करण्यासाठी हीं स्मृतिचरित्रें पुन्हा प्रसिद्ध केलीं आहेत असेंहि ते सांगतात. तेव्हा लेखांचें पुनर्मुद्रण करतांना यावरून चांगला सफाअीदार हात फिरवयास पाहिजे होता.

पान २० वर परशुरामपंत प्रतिनिधींचा जन्म सन १८१७ दिला आहे तो १७७७ पाहिजे. १८१७ त नाना फडणीस जिवंत तरी होता का? 'गु. आगरकर हे माझे शाळा कॉलेज मिळून चार वर्षें सन १८८४ ते सन १८९० पर्यंत शिक्षक होते' यांतील चुकी सहज कळेल. टिळकचरित्रांत १९१० ते १९२० या दशकाचा आढावा घेतांना आरंभींच 'त्यांतलीं सहा वर्षे त्यांची तुरुंगांत गेलीं, असें म्हटलें आहे तेथें चार वर्षें पाहिजेत. कारण

टिळक १९०८ ते १९१४ पर्यंत सहा वर्षे तुरुंगांत होते. तसेंच या वेळीं सुटून आल्यावर टिळक लंका–ब्रह्मदेश–मलायाकडे 'बौद्धधर्मीय पौर्वात्य संस्कृतीचे देश' पाहण्यासाठी गेले नव्हते. फार मागे गेले होते. अशा प्रकारच्या सहज दुरुस्त होण्यासारख्या चुका पुस्तकांत राहून गेल्या आहेत.

सर्वांत आगरकरचरित्र चांगलें वठलें आहे. टिळकांचें बरेंच निःपक्षपाती व समतोल आहे. भांडारकरांवरील मूळ लेख अिंग्रजी होता. त्याचा मराठी जो अनुवाद केला आहे तो भाषेच्या दृष्टीने बोजड आहे. 'काव्यनाट्यवाङ्मयांत केलेला विनोद, कोटी व चितारलेली सुंदरता व भव्यता व वर्णिलेले सुखान्त व दुःखान्त प्रसंग यांचा ते स्वतः आस्वाद घेत व विद्यार्थ्यांना तसा आस्वाद घेण्यास शिकवीत' (पृ. ३०). 'त्यांच्या या आयुष्यभरच्या कार्याचा त्यांनी न कळत पाया घातला ही अेक विलक्षण गोष्ट आहे' (कित्ता). टिपणिसांचें चरित्र जिव्हाळ्याचें झालें आहे. असो.

शेवटीं अतिनम्रपणें प्रिन्सिपलसाहेबांना सूचना करावीशी वाटते की, त्यांनी यापुढे कांही तरी अिकडून-तिकडून जमा करून पुस्तकें काढण्याअैवजी आपल्या अत्यंत पक्व बुद्धीचा व सुदीर्घ अनुभवाचा ठेवा म्हणून अेखादा शैक्षणिक ग्रंथ लिहावा व तरुणांना अधिकाराने मार्गदर्शन करावें.

चिं. ग. क.

## काव्य

१ **जीवनयोग—** कवि– श्री. ना. ग. जोशी; प्रका० श्री. मा. रा. देशपांडे, संध्या-प्रकाशन, १२ टिळक रस्ता, पुणें २; मूल्य आणे दहा.

२ **मोतीबाग—** यशवन्त (राजकवि, बडोदें); प्रका० य. दि. पेंढारकर; मूल्य आणे दहा.

३ **शिलंगण—** कवि शंकर गोविंद साठे; प्रका० श्री. श्री. वि. दामले, एन्. के. पब्लिशिंग हाअुस, पुणें २; मूल्य रु. १.

४ **नाथ घाणेकर समग्र कविता–खंड १ ला.—** प्रका० श्री. शि. गो. भावे (स. स. प्रकाशमंडळीकरता) यादो गोपाळ पेठ, सातारा शहर; मूल्य रु. २.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या वाचकांना अेक साक्षेपी लेखक म्हणून परिचित असणाऱ्या श्री. ना. ग जोशी यांनी हें काव्य लिहिलें आहे अेवढें समजल्याने त्या काव्य-रचनेमध्ये किती परिश्रम खर्ची पडले असतील याची कल्पना येअील. प्रस्तुत काव्य हें महा-काव्यपद्धतीने लिहिलेलें पांच खंडांचें व अेकंदर ९१४ ओळींचें अेक मध्यमकाव्य (विस्ताराच्या दृष्टीने) आहे. खंडकाव्यास आज जो अर्थ आला आहे त्यामुळे त्याला खंडकाव्य असें मी म्हणत नाहीं. नाहीतर खंडकाव्य म्हणतां येण्याजोगें त्याचें स्वरूप आहे; म्हणजे त्यामध्ये अेक लहानशी कथा ग्रथित केली आहे व ती पांच खंडांमधून सांगितली असली तरी काव्य फारसें मोठें झालेलें नाहीं. यामधील कथाभाग अगदीच अल्प आहे. शान्ता नांवाची नायिका अुद्यानांत 'दिवा-स्वप्नां'त दंग आहे (खंड १ ला). मिठाच्या सत्याग्रहांत पडण्याचा आपला बेत तिला सांगण्याकरिता तिचा प्रियकर जयंत तेथे येतो. ती त्यास कांही चर्चेनंतर संमति देते (खंड २). चळवळींत त्याला कारावासाची शिक्षा झाल्यावर ती विधायक कार्य करीत

राहते. त्यामध्ये निरुत्साहजनक अनुभव येत असतां मुदतीच्या तापाने ती आजारी पडते. तिचा प्रियकर तिला भेटण्याकरिता तुरुंगांतून आला असतांच तिला मृत्यु येतो (खंड ३). पुढे अवसेच्या रात्रीं रानोमाळ भटकत असतां मसणवटींत जयंत जातो. कालांतराने, म्हणजे कवीच्या शब्दांत 'मग', ती शशिकोरीवर बसलेली त्याला दिसते किंवा त्याला तसा भास होतो (खंड ४). शेवटल्या खंडांत नायक कांही तात्विक विचार प्रकट करतो व शेवटीं तिची आठवण काढून काव्य संपवितो.

कथेच्या दृष्टीने काव्यांत कांहीच गुंतागुंत नाही. त्यांतील घटनाहि विशेष नावीन्यपूर्ण नाहीत. कथानकरचनेचे दोषहि अनेक आहेत. कथानकाचा फारच थोडा भाग पहिल्या व दुसऱ्या खंडांत येतो, व या गतीने कथानक चांगल्या महाकाव्यास साजेसें मोठें असावें असें वाटतें. परंतु तिसऱ्या खंडांत कथानकांत ज्या कांही थोड्या घटना आहेत त्या साऱ्या अेकदम घडून संपून जातात. चौथ्या खंडाला घटनाच नाही. पांचव्यांत तर मुळींच नाही. परंतु पहिल्या चार खंडांत नायिकेच्या भोवतीं तरी घटना किंवा विचार चालले आहेत. पांचव्या खंडांत नायक वैयक्तिक व राष्ट्रीय भावनांवरून जागतिक कलहाकडे अुड्डाण करतो. मूळ काव्याशीं या विचार-तरंगांचा संबंध कसा लागतो तें समजण्यासारखें नाही. प्रस्तुत काव्याशीं त्यांचा संबंध आणण्या-करिता या खंडाच्या अखेरीस पांचसहा श्लोक घातले आहेत अेवढेंच.या शेवटच्या खंडाचें जीवन-योग हें नांव समग्र काव्यास देण्यांत या खंडास काव्यांत सर्वांत अधिक महत्त्व देण्याचा हेतु दिसतो; पण त्याचा आधीच्या काव्याशीं संबंध मात्र स्पष्ट नाही. कथानक रंगण्यास कांही समरप्रसंग किंवा विरोध लागतो. तसा विरोध या काव्याच्या कथेंत कोठेच नाही. आपल्या वल्लभाच्या ध्येयाच्या आड नायिका येत नाही. नायिकेचा मृत्युहि सरळ अेकदम होतो. त्यापुढे कथानक असें नाहीच. तेव्हा त्यांत समरप्रसंग नाही हें साहजिकच.

परंतु कथानक हा या काव्याचा महत्वाचा भाग नाहीच. आहे तें कथानक केवळ कविकल्पनांना कांही आधार अेवढ्यापुरतेंच. अधिक महत्त्वाचा भाग म्हणजे यांतील तत्त्वज्ञान. त्यांतील कांही तिसऱ्या खंडांत आलें आहे व अुरलेलें पांचव्या खंडांत. तिसऱ्या खंडांत कवि नायकाच्या मुखाने म्हणतात, "ज्यांना मोठे समजून आम्ही त्यांची आरती केली त्यांची कारावासांतहि 'अ'वर्गीय चैन चालते, आणि ज्यांना हीनदीन लेखलें त्यांनी हृदयाची श्रीमंती दाखविली. हीन लोकांत नेकी नाही हा माझा गैरसमज दूर झाला, आम्ही अेकटेच जगांत शिष्ट अशी भावना नष्ट झाली. कारावासांतहि श्रेष्ठ मानव्य वास्तव करितें." यामुळेच जणुं कांही नायक राष्ट्रीय तत्त्वज्ञान सोडून जागतिक तत्त्वज्ञान, मानव्य किंवा प्रस्तावनाकारांच्या मताप्रमाणे 'सामाजिक ध्येयवाद' याकडे वळतो, व शेवटच्या खंडांत त्याचें सविस्तर अुपपादन करतो. परंतु काव्यापेक्षा तें 'प्रवचन'च अधिक प्रमाणांत होतें. जगांत किंवा विश्वांत मानवेतर सृष्टि– मुंग्यांसारख्या कीटकांची सृष्टिसुद्धा– स्वार्थ सोडून समाजाच्या हितार्थ झटतांना दिसते. मनुष्य मात्र याला अपवाद आहे. त्यामुळे जिकडेतिकडे कलह, असुख माजलेलें दिसतें. तें नाहीसें होण्यास स्वार्थांत अनासक्त असे, अशान्ततेचा विषदाह स्वतःच्या कंठीं धारण करणारे, असंख्य शंकर पाहिजेत. हा या प्रवचनाचा सारांश आहे.

या काव्याचें वैशिष्ट्य नायकनायिकेच्या स्वभावांत, अुदासरम्य वातावरणांत आणि महाकाव्यलेखनपद्धतींत आहे. नायक-नायिका दोघेंहि काव्यात्म आहेत, ध्येयवादी आहेत, जागत्स्वप्नांत गुंगणारीं आहेत. नायिकेबरोबर कृश अशी चंद्रकोर बोलते, गुलाबाचें फूलहि बोलतें. दोघेंहि तिला त्यागाचा– दुसऱ्याकरिता स्वतःच्या त्यागाचा– अुपदेश करितात. नायका-

लाहि मृत्यूनंतर आपली प्रिया चंद्रकोरीवर बसलेली दिसते. नायिका काव्यांत असावी तशी 'कलावंत, रसिका अन् परमतीक्ष्णधी', अर्थात् सुंदर आहेच. लहानपणापासून सुखांत वाढलेली तथापि प्रियकराकरिता विधायक कार्याच्या खटाटोपांत पडलेली अशी सांगितली आहे. पहिल्या खंडांत ती भावी संकटांच्या सूचनेने गलितधैर्य झालेली, दुसऱ्या खंडांतहि नायकाच्या निश्चयासंबंधी कांही काळजीचे अुद्गार काढणारी, परंतु विशेष विरोध न करतां आपली आठवण म्हणून गुलाबाचें फूल देणारी, नंतर पत्रद्वारें आपणहि करीत असलेल्या कार्याची कल्पना व त्यांत आलेले कटु अनुभव आपल्या तुरुंगांत असलेल्या प्रियकरास कळवणारी व शेवटीं मरतांना पुनः अेकदा नायकास गुलाबाचें फूल प्रतीक म्हणून देअून आपली जीवन-यात्रा संपवणारी अशी ही नायिका आहे. नायक मोठा विदग्ध व रसिक कवि दिसतो. त्याच्या बोलण्यांत पाण्डित्य व क्लिष्ट कल्पना येतात, जुने वाङ्मयीन अथवा पौराणिक अुल्लेख येतात. अुपमा–अुत्प्रेक्षांखेरीज तो बोलत नाही. मानवी झगड्याचा अेक भाग म्हणून तो मिठाच्या सत्याग्रहांत भाग घेत असला तरी त्याची दृष्टि अधिक व्यापक व मानव्याची आहे. ज्या मानव्याला हें काव्य लेखकाने अर्पण केलें आहे, त्याच मानव्यासंबंधी अेक सुंदर प्रवचन नायक शेवटल्या जवळजवळ स्वतंत्र अशा खंडांत करतो. त्याचें तत्त्वज्ञान राष्ट्रीयापेक्षा आंतरराष्ट्रीय आहे. या काव्यांत आलेल्या दोनच व्यक्ति याप्रमाणे अुदात्तचरित अशा दाखविल्या आहेत परंतु त्यांचा स्पष्ट ठसा वाचकाच्या मनावर अुठण्याअितकें देखील स्वभावदर्शन त्यांचें झालें नाही. तें होण्याअितकें कथानकहि ठसठशीत नाही आणि नायकनायिकांमधील संभाषणहि तें कार्य करूं शकत नाही. हें स्वप्नाळु, काव्यात्म जोडपें संदिग्ध, अस्पष्ट व म्हणून काव्यात्म स्वप्नमय अशा वातावरणांतच वावरतांना दिसतें. तें वातावरणहि अुदासरम्य राहील अशीच योजना घटनांतून आणि वर्णनांतून लेखकाने केली आहे.

या काव्याची लेखनपद्धति महाकाव्यपद्धतीची आहे; म्हणजे प्रौढ, संस्कृतप्रचुर व म्हणून प्रसादगुणांत कमी अशा भाषेत त्याचें लेखन झालें आहे. भाषा फार कृत्रिम व सावरकरी वळणाची वाटते. म्हणूनच प्रस्तावनाकार आचार्य भागवतांना तिचें समर्थन पंडित लोकहि कवि असतात असें करून पटवर्धन-अनिल या कवींकडे बोट दाखवावें लागलें आहे. कवि पंडित असले तरी काव्य पांडित्यप्रचुर झालें पाहिजे असा नियम करणें बरोबर नाही. गद्यापेक्षाहि काव्यांत प्रसाद अधिक हवा. गद्य वाचायला बसणारा परिश्रमांच्या तयारीने बसतो. काव्यवाचकाकडून ती अपेक्षा करतां येत नाही. शेवटल्या खंडांत मात्र विषय तात्त्विक असूनहि तुलनेने भाषा व रचना प्रसादपूर्ण झाली आहे. परंतु आपण अेक मराठी काव्य वाचीत नसून संस्कृत काव्य वाचीत आहों अशी भावना मनाला केव्हाच सोडीत नाही. महाकाव्यपद्धतीचें दुसरें अेक व पाश्चात्य पद्धतीचें लक्षण म्हणजे यांत आलेल्या प्रदीर्घोपमा. Homeric similes च्या धर्तीवर बऱ्याच अुपमा लेखकाने यांत घातल्या आहेत. त्या अुपमांत भारदस्तपणा अथवा गौरव (किंवा जाड्य म्हणा हवें तर) बरेंच असतें. अंबर व सागर, सहस्ररश्मि व शशिकला, मेघ आणि वर्षा, अस्तगिरी आणि वनलक्ष्मी या सृष्टीमध्येच कवि रंगलेला असतो. रखरखीत, व्यवहारी, गद्य जग त्याच्या कक्षेत येत नाहीसें वाटतें. त्यामुळे सामान्य वाचक हें काव्य घेअून समग्र शेवटपर्यंत वाचीत जाअील असें वाटत नाही. त्यांतील विषय, वातावरण आणि लेखनपद्धति हीं सामान्यांच्या करिता नाहीत. तें विदग्ध, काव्यात्म, स्वप्नाळु अशा थोड्या लोकांच्याकरिता आहे.

लेखनपद्धति महाकाव्याची असली तरी तें महाकाव्य वाटत नाही. त्यांतील कथानक व व्यक्ति महाकाव्यास अनुरूप नाहीत. काव्यास शेवटीं चिकटविल्यासारखा वाटणारा पांचवा

खंड विषयाच्या दृष्टीने महाकाव्यास योग्य असला तरी तो तेवढ्या अेका खंडाचा विषय वाटतो. कथानक किंवा व्यक्ति यांचा त्याच्याशीं संबंध जवळजवळ नसल्यासारखाच आहे. तेव्हा सबंध काव्य त्याविषयावरचें होअूं शकत नाही. काव्याला टीपा देणें म्हणजे त्याच्या क्लिष्टत्वाचा कबुलीजबाब होय. तो लेखकानेच दिला आहे. त्या लेखकाला आवश्यक वाटल्या तेवढ्या त्याने दिल्या आहेत. म्हणजे अितरांना आणखी टीपांची गरज किती वाटेल याची कल्पना येअील. वृत्तरचनेंत निरनिराळ्या जुन्या नव्या वृत्तांचा अुपयोग कवीने केला आहे. निर्यमक वैनायक वृत्ताचा अुपयोग सावरकरांच्या प्रमाणेच क्लिष्ट पद्धतीने केला आहे. संयुक्ताक्षरपूर्व लघु अक्षराविषयींचा नियम जाणून सरसहा मोडलेला दिसतो. शब्दांचे अुपयोग व रूपें कित्येक ठिकाणीं भलतीं केलेलीं दिसतात. वितरे शब्द अुतरे या अर्थी, अुत्सह-अुत्साह याअैवजी, पृच्छिसी, वहे(वाहे), सहिति-सहन करिती असे प्रयोग आढळतात. क्वचित् अिंग्रजी धर्तीची 'तव विचारभावांना समजुनि घ्याया। अेक महाप्रश्नावरि' अशी रचना आढळली. पंडित कवींनी तरी यासंबंधी अधिक खबरदारी घ्यावयास हवी. कारण त्यांच्या चुकांचेंहि पुढे अनुकरण होण्याचा फार संभव असतो.

शेवटीं कवीला कळकळीची सूचना अशी की प्रसाद हा काव्याचा अेक गुण अेवढ्याच दृष्टीने त्याकडे न पाहतां तो काव्याचा प्राण आहे या दृष्टीनेच त्यांनी त्याकडे पाहावें. आपलें म्हणणें केवढेंहि महत्त्वाचें असलें तरी लोकांस तें कळलें पाहिजे; त्याकरिता तें सुगम व सुबोध झालें पाहिजे; तरच रसोत्पत्ति होण्याचा संभव आहे. काव्य हें कांही विदग्ध रसिकांच्या करितांच नसून सबंध समाजाकरिता असेल तर तें प्रसादपूर्ण व्हावयास हवें. काव्याच्या द्वारें लोकांना कांही शिकवण देअूं अिच्छिणाऱ्यांवर तर ही जबाबदारी फार आहे. तें कांही निवडक लोकांकरिताच आहे असें म्हटल्यास मग कांही म्हणणें नाही. तथापि त्यांनाहि आयास न करितां समजलें तर हवेंच आहे.

महाकाव्यपद्धतीने लिहिलेलें परंतु खंडकाव्यांत पडूं शकेल असें हें काव्य लिहून अेका जुन्या लेखनपद्धतीचा अुद्धार केल्याबद्दल कवींचें आम्ही अभिनंदन करितों. त्यांच्या ठिकाणीं पांडित्य, वैदग्ध्य आणि रसिकता भरपूर आहेत. परंतु भव्यतेच्या आणि विशालतेच्या भलत्या कल्पनांनी व प्रतीकवादाच्या नादाने त्यांनी आपलें काव्य बरेंच दुर्बोध करून ठेवलें आहे. त्यांतून ते बाहेर पडले तर त्यांचा आणि वाचकांचाहि फायदा होअील.

**रा. श्री. जो.**

'मोतीबाग' हा 'बाळगाण्यां'चा पहिला संग्रह प्रसिद्ध करून कवि यशवंत यांनी काव्यांतल्या नवीन दालनांत प्रवेश केला आहे. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या काव्यसंग्रहांत लहान मुलांकरिता लिहिलेलें काव्य अेखादुसरेंच सांपडेल. या पुस्तकांतील गीतें अितरत्र कोठे प्रसिद्ध न करतां पुस्तकरूपाने अेकदम प्रसिद्ध करून कवि यशवंत यांनी काव्यरसिकांस अेक छोटा आश्चर्याचा धक्काच दिला असें म्हणावयास पाहिजे.

पुस्तकाची सजावट राजकर्त्रीच्या वैभवाला शोभावी आणि ज्यांच्याकरिता तें पुस्तक आहे त्या बालकांनाहि रुचावी अशीच थाटामाटाची पण औचित्यपूर्ण आहे. औचित्यपूर्ण आहे असें मुद्दाम म्हणण्याचें कारण असें की शिशुगीतांच्या संग्रहांना अितकी रंगदार आणि चित्रमय सजावट देणें हें अवश्य होय. योग्य चित्रांनी आणि सजावटीने कवितेंतला भाव बालकांच्या मनांत भरतो ही गोष्ट महत्त्वाची असली तरी रंगदार सजावटीने बालकांचीं मनें

कवितेकडे खेचून घेणें हीहि तितकीच किंवा त्याहूनहि महत्त्वाची गोष्ट होय. काव्याकडे मन ओढून घ्यावयास, कवितेबद्दल मनांत आवड रुजविण्यास, चित्रमय सजावटीचें साहाय्य अवश्य घ्यावयास हवें. अितकें रंगदार आणि सुंदर सजावटीचें हें मराठींतील पहिलेंच शिशुगीतांचें पुस्तक होय. त्याबद्दल कवि यशवंत आणि पुस्तकाची सुंदर सजावट करणारे चित्रकार दलाल यांचें हार्दिक अभिनंदन करणें अुचित होअील.

शिशुगीतांबद्दल बाळगाणीं हा शब्द वापरावा अशी कवि यशवंत यांनी सूचना केली आहे. बाळगाणीं हा शब्द सुटसुटीत, नादमधुर आणि अर्थपूर्ण असल्याने तो रूढ करण्यास हरकत येअील असें वाटत नाही. शेवटीं जोडलेल्या बाळगाण्यांवरच्या टीपेंत बाळगाण्यांची आपली कल्पना कवि यशवंत यांनी मांडली आहे. बाळगाणीं अर्थ, कल्पना आणि भावना यांच्या दृष्टीने सुबोध असावींत असें सारांशरूपाने त्यांचें म्हणणें आहे.

मुलांकरिता गाणीं करावयाचीं म्हणजे त्यांत केवळ सुबोधता आणून भागत नाही; तर मुलांचीं गाणीं लिहिणाराला मुलांचें जग व तीं त्याकडे कोणकोणत्या दृष्टीनीं पाहतात हें समजलें पाहिजे; आणि तें शक्य तों त्यांच्या कल्पनेंत आणि त्यांच्याच शब्दांत सुरसपणें सांगतां आलें पाहिजे. अितकी ही तारेवरची कसरत जमली तरच तीं गाणीं यशस्वी होतील—बालकांना मनापासून आवडतील.

या पुस्तकांतलीं 'मिठाअीवाला', 'कोण तूं ग ?', 'अुंट', 'घरकूल' आणि 'ती कोर नव्हे चंद्राची' हीं गाणीं मुलांना खास आवडतील. मिठाअीवाला यांतील मिस्कील थट्टा आणि अुंटाच्या वर्णनावर आधारलेला विनोद मुलांना हसायला लावतील. घरकुलांतील थोरांची अनुकरणवृत्ति आणि 'कोर नव्हे चन्द्राची' यांतील कल्पनारम्यता हीं मुलांना हृद्य वाटतील. 'कोण तूं ग ?' या गीतांतलें जळत्या मेणबत्तीचें वर्णन मुलांना चटकदार वाटेल.

गद्यसदृश रचना, रसात्मकतेचा अभाव आणि शिरताज, गुजराण, ढांगूळ यांसारखे कांही रसभंग करणारे शब्द हीं वैगुण्यें वगळलीं तर हीं बाळगाणीं चांगलीं अुतरलीं आहेत असें म्हणावयास हरकत नाही.

'तो आणि ती' नंतर बरोबर अेका वर्षाने 'शिलंगण' हें काव्य प्रसिद्ध करून श्री. साठे यांनी पूर्वीचाच विषय नव्या स्वरूपांत वाचकांना सादर केला आहे. 'तो आणि ती' या काव्यांत सध्याच्या विषम समाजरचनेंत अेका मध्यमवर्गीय सुशिक्षित जोडप्याची संसार मांडतांच कुचंबणेला कशी सुरवात होते हें दाखविलें आहे. काम करण्याची अिच्छा आणि पात्रता अंगीं असतांहि अर्थप्राप्ति करतां येत नाही आणि त्यामुळे विफलता आणि निराशा पदरीं येते हें लेखकाने दिग्दर्शित केलें आहे.

प्रस्तुत पुस्तकांत मध्यमवर्गीयच पण खेड्यांत राहणारें अेक अिनामदाराचें कुटुंब घेअून या प्रश्नाची निराळी बाजू दाखविण्याचा लेखकाने प्रयत्न केला आहे. भाअू अिनामदार, त्यांचा मुलगा शिवा, त्यांचें कुळ भिवा आणि शिवाचा अेक बाळपणचा मित्र, पण आता गुंड म्हणून ठरलेला सदू, हीं पात्रें निर्मून आर्थिक व्यवस्थेमुळे प्रत्येकाचें जीवन अेकमेकांला कसें मारक होअू पाहत आहे याचें चित्रण या काव्यांत केलें आहे. शिवाने शहरांत जाअून रंगाचा धंदा सुरू केला आहे व त्याकरिता जें कर्ज काढावें लागलें त्याची भरपाअी करण्याकरिता त्याला पैसे हवे आहेत. आपलें कुळ जें भिवा त्याजकडे थकलेली बाकी वसूल करावी याबद्दल तो भाअूकडे तगादा करीत आहे. भिवाची स्थिति अत्यंत हलाखीची, त्यांतच त्याने नुकताच संसार थाटलेला, जेमतेम ओलेंकोरडें खाअून त्याची गुजराण चाललेली; अशा

स्थितींत त्याने बाकी द्यावी कशी व ती मागावी कशी असा भाऊंना पेच पडतो; आणि या पेचामुळेच भाऊंची 'कोणत्याहि बाह्य उपाधींची क्षति न बाळगतां दुसऱ्याच्या अंतरंगाशीं सहृदयतेने हितगुज करणारी एका देवदूताची मंगलदृष्टि' शिवाला दिसून येते व त्याचा हृदय-पालट होऊन शिवा व सदू यांच्याशीं तो बंधुभावाने वागण्याचें कबूल करतो; असें हें थोड-क्यांत कथानक आहे.

समाजवादाचें ज्ञान भाऊंना नसलें तरी सहृदयतेने व भेदक दृष्टीने ते व्यावहारिक जगाकडे पाहत असल्यामुळे वर्गकलहाचें बीज कोठे व कसें रुजलें आहे याची जाणीव त्यांना पूर्ण आहे :

प्रश्न विचारावा स्वतःला 'तुझें असें काय ?'
हक्काला अन् स्वामित्वाला मग फुटती पाय !
घराण्यांत मोठ्या जन्मसी म्हणुनी सर्व तुझें
पिढीजात कर्जाचें वाही शेतकरी ओझें.

धंद्याच्या आणि कर्जाच्या कचाटींत सांपडलेला शिवा आपल्या कुळाकडे सहृदयतेने कां पाहूं शकत नाही याचीहि त्यांना पूर्ण कल्पना आहे :

. अलीकडे वाटे तुम्हां जरि बनलों निष्ठुर
माझ्या तोंडुन परिस्थिती ते अुमटविते सूर.

त्याचप्रमाणे मिरासदारी आणि पिळवणूक यांची परंपरा कशी घडली आहे याबद्दलहि त्यांची कल्पना स्पष्ट आहे. ते शिवाला म्हणतात :

'शल्यें, अपमान तुझ्या वांट्याला जीं येतीं
तुझ्या खालच्या गरिबांवर तूं परतविशी अुलटीं
सुनावले तुजला, हक्क जे कुणि श्रीमंतानें
तेच मिवाला अैकविशी खरमरीत शब्दानें
त्याच्याशीं थडके वरून् अपमानाचें कोण
पायानें पदिं ठोकरण्याला भिवापुढें कोण ?' ॥

आणि या सर्वांवर अुपाय म्हणजे नवी घडी बसविणें हा होय हेंहि भाऊंना अुमजतें; पण :

घडी नवी बसवायाची परि धमक कुणा हातीं ?
संपत्तीपायीं जो दिसे सर्व अनाचार
नष्ट कराया पुरुषोत्तम घेअीलहि अवतार
दुबळ्यांनीं त्याची पाहतां अेकिकडे वाट
तयार करुनी ठेवावा तत्पूर्वीचा थाट !

असा त्यांचा विश्वास आहे.

आर्थिक विषमतेची कोंडी फोडायला ओश्वराच्या अवताराची वाट पाहणाऱ्या भाऊंचें पात्र वास्तववादी नाही असा आरोप येण्याचा संभव आहे. परंतु तें पूर्ण वास्तववादी आहे हें त्यांची परिस्थिति आणि शिक्षण लक्षांत घेतां कळून येण्यासारखें आहे. मात्र भाऊंनी पुढे मांडलेल्या अुपायांनी ही विषम समाजरचनेची घडी बदलतां येअील हें म्हणणें खुळेपणाचें ठरेल. अर्थात् कवीला अेक विशेष प्रश्न मांडावयाचा आहे, त्याची सोडवणूक करणें हें त्याचें कार्य नव्हे.

या कथेकरिता योजलेली खेडेगांवाची पार्श्वभूमि कवीने फारच कौशल्याने चित्रित

केली आहे. अेक सबंध प्रकरण त्याकरिता स्वतंत्रपणें खर्चिलें आहे. फारच बारकाअीने आणि कुशलतेने या चित्रांत रंग मरून कवीने तें जिवंत केलें आहे. विशेषतः दिवेलागणीच्या वेळीं खेडेगांवचें चित्र कसें असतें याचें रेखन त्या वेळीं होणारे निरनिराळे आवाज देअून कवीने केलें आहे तें मुद्दाम पाहण्यासारखें आहे. पेचप्रसंग निर्माण होअीतों अेकंदर वातावरण फारच मोकळें आणि खेळीमेळीचें राहिलें आहे. त्यांत मधून मधून जो विनोद डोकावतो आहे तोहि मोठा खुमासदार आहे; त्यामुळे अेकंदर खेळीमेळीच्या वातावरणाला मोठी रंगत मरल्यासारखी वाटते. आणि खेळीमेळीच्या या मोकळ्या वातावरणामुळे पुढे असा कांही पेचप्रसंग अुद्‌भवणार आहे असें वाटत नाही.

कवितेची अेकंदर रचना पाहतां ती केवळ गद्यप्रायच आहे. त्यांत कोठे अलंकार किंवा कल्पनाविलास औपधालाहि नाहीं; अर्थात् अशा प्रकारच्या काव्याची रचना व शैली अशीच असावयास हवी.

सातारचे अेक पुढारी व समाजकार्यकर्ते श्री.नाथ घाणेकर अुर्फ पंढरीनाथ वामन घाणेकर यांच्या स्फुट व खंडकाव्याचा वरील प्रथम संग्रह प्रसिद्ध होत आहे. नाथ घाणेकरांचा लेखन-व्यवसाय १९०८ सालापासून अव्याहत चालू असला तरी त्यांचें लेखन आजच पुस्तकरूपाने पुढे येत आहे. प्रसिद्धिपराङ्मुखता हेंच या विलंबाचें कारण होय.

निवेदनांत लेखन हा आपला करमणुकीचा विषय आहे, असें ते नमूद करतात. प्रस्तुत स्फुट व खंडकाव्यें आणि या लेखनाच्या कितीतरी पटीने अधिक असें त्यांजजवळ असलेलें अप्रसिद्ध लेखन त्यांनी केवळ आपल्या मनोविनोदार्थ लिहिलें आहे. जें लेखन त्यांनी स्वतःची करमणूक करण्याकरिता लिहिलें त्याच्या प्रसिद्धीकरणाबाबत त्यांना अुत्साह वाटूं नये हें सहजच येतें. परंतु आपण हें दुसऱ्याकरिता करीत नाहीं, स्वतःच्याच विनोदार्थ करीत आहोंत, या जाणिवेनें जे दोष अुत्पन्न होतात ते या काव्यांतून नजरेस येतात. आपल्याला जें अुत्कटतेने वाटलें आणि मासलें तें तितक्याच अुत्कटतेने दुसऱ्याला वाटावें आणि भासावें किंवा भासवावें या अिच्छेपोटीं कलेचा जन्म होतो. पण ही अिच्छा जेथे प्रभावी नाही, तेथे कलाहीनतेचे, दुर्बोधतेचे, अनौचित्याचे दोष अुद्‌भवतात.

हे सारे दोष श्री. नाथ घाणेकरांच्या कवितेंत दिसतात. त्यांची कविता कांही ठिकाणीं दुर्बोध वाटते, ती त्यांतील अर्थ कळत नाही म्हणून नव्हे, तर त्यांतील विषय अत्यंत वैयक्तिक असल्यामुळे. कांही ठिकाणीं याच्या अुलट स्थिति दृष्टीस पडते. कांही कविता अशा सांपडतात की त्यांचा विषय अत्यंत सामान्य आहे. अर्थात् अत्यंत सामान्य आणि अत्यंत वैयक्तिक विषयांत काव्य असूं शकतें, पण तें काव्य त्या विषयांत नसून तो विषय ज्या जीवनाच्या संदर्भात आला त्या संदर्भात असतें. कवि जेव्हा स्वतःकरिता काव्य लिहितो तेव्हा हा संदर्भ अुलगडून दाखविण्याची त्याला गरज भासत नाही. परंतु वाचकाच्या दृष्टीने पाहिल्यास या संदर्भाशिवाय कविता म्हणजे काव्याशिवाय कविता असा अर्थ होतो. श्री. घाणेकरांच्या कवितेंत हें असें झालें आहे. ज्या निरनिराळ्या मनःस्थितींत त्यांना निरनिराळे विषय स्फुरले त्या मनःस्थितीचे ठसे त्यांचे त्यांजजवळ राहिले, कविताबद्ध विषयमात्र वाचकांना लाभले.

श्री. घाणेकर यांचा संचार राष्ट्रकार्य आणि समाजकार्य या दोन्ही क्षेत्रांत होत असल्यामुळे त्यांची नजर चौफेर फिरली आहे आणि तिच्या टप्प्यांत जे जे विषय आले त्यांची नोंद त्यांनी आपल्या या काव्याच्या दैनंदिनींत केली आहे. वैयक्तिक दुःखें, सामाजिक दुःखें, शेतकऱ्यांची दैना, कायदेभंगाची चळवळ, रशिया व तेथील परिस्थिति या साऱ्यांवर त्यांनी

कविता लिहिली आहे. अमुक अेक विषय तींत नाही असें नाही. जीवनांतले सुंदर क्षण रेखाटण्यापेक्षा जीवनच रेखाटण्याचा त्यांचा प्रयत्न असल्याचें दिसतें. स्फुट कवितेंतले कांही चुटके चटकदार वाटतात. या स्फुट काव्याचें स्वरूप 'कणिका' या काव्यप्रकारासारखें आहे.

ना. मा. सं.

## नाटक

**१ पांघरलेलीं कातडीं** (ले० व प्रका० श्री. शकुंतला परांजपे, १२२० शिवाजीनगर, पुणें नं. ४; किंमत दीड रुपया).

**२ पेल्यांतील वादळ** (ले० श्री. बाबुराव गोखले; प्रका० श्री. ना. त्र्यं. भिडे, मॉडर्न बुकडेपो, पुणें नं. २; किंमत अेक रुपया).

**३ ध्येयाचा ध्यास** (ले० श्री. व. शा. वरखेडकर; प्रका० श्री. पां. ना. बनहट्टी, नारायण मुद्रणालय, धनतोली, नागपूर; किंमत दीड रुपया).

'चढाओढ' आणि 'सोयरीक' या शकुंतला परांजपे यांनी लिहिलेल्या रूपान्तरित नाटिका मीं वाचलेल्या असल्यामुळे 'पांघरलेलीं कातडीं' हें त्यांचें पहिलेंच पांचअंकी संगीत स्वतंत्र नाटक मीं कांहीशा अुत्सुकतेनेच वाचलें. चार वर्षांपूर्वी बाअींनी मराठी नाटकांवर टीका केली असतां, नुसती टीका करण्यापेक्षा त्यांनी अेखादें स्वतंत्र संगीत नाटक लिहून दाखवावें असें आव्हान श्री. दाजीसाहेब तुळजापूरकरांनी दिलें होतें; आणि शकुंतलाबाअी या लढाअू वृत्तीच्या महिला असल्यामुळे तें आव्हान स्वीकारून चार वर्षांनी त्यांनी हीं 'पांघरलेलीं कातडीं' श्री. तुळजापुरकरांबरोबरच मराठी वाचकांना सादर केलीं आहेत. या नाटकाचें कथानक बाअींनी प्रथम होलीवुडला पाठवलें होतें, नि तेथून परत आल्यावर तें बॉम्बे टॉकीजकडे देण्याची खटपट केली होती. या गोष्टीवरून नाटकांचें कथानक बाअींनी मूळ सिनेमासाठी योजलें होतें हें अुघड होतें. तेव्हा खुद्द लेखिकेच्या मताप्रमाणे पाहतां हें नाटक म्हणजे नाटकांचें कातडें पांघरलेलें सिनेमाचें कथानक होय.

सिनेमाच्या गरजेला ह्या नाटकाचें कथानक कितीसें पुरें पडलें असतें याची मला शंका आहे. पांघरलेलीं कातडीं हें नाटक देखील पुरेसें रंगदार करण्याअितपत सामर्थ्य मूळ कथानकांत नाही, आणि आहे त्याचाहि अुपयोग लेखिकेने फारसा चांगल्या प्रकारें केलेला नाही. नाटकांत आकर्षकता येण्यास मुख्यतः कथानकाची गुंफण वाचकाचें औत्सुक्य (suspense) सारखें धावतें राहील अशी केली पाहिजे. 'पांघरलेलीं कातडीं' मध्ये याच गुणाचा अभाव आहे. शरचंद्राने चित्रकार म्हणून पांघरलेलें कातडें नि मंजिरीने लेखिका असल्याचें आणलेलें सोंग अनुक्रमें मेघदूत आणि सौदामिनी यांच्या प्रेमांत गैरसमजाचें विघ्न आणण्यास कारण होत नाही. नुसता संशय येतांच तीं दोघेंजण आपापल्या स्नेह्यांना दिलेलीं वचनें चटकन विसरून आपण खरेखुरे कोण आहोंत तें सांगून टाकतात त्यामुळे नाटकाचें सारें स्वारस्य नि अुत्कंठाच खलास होते !

'पांघरलेलीं कातडीं' मध्ये मेघदूत नि सौदामिनी हीं दोघें आपापल्या वचनाला चिकटून राहिलीं असतीं तर अेका सुंदर विनोदी नाटकाचा जन्म झाला असता. पण हा मूळ मुद्दा

डावलून लेखिकेने शरचंद्राला कोठलासा संस्थानिक करून त्याच्या पहिल्या बायकोचें रहस्य कथानकांत विनाकारण घुसडलें आहे. तसेंच मंजिरीहि नायकिणीची पोरगी दाखवून तिच्या पहिल्या प्रेमाचें लफडेंहि असेंच नको असतां कथानकांत आणलें आहे. या अुपकथानकांमुळे अेरवी जें चटकदार विनोदी नाटक होअूं शकलें असतें तें आता धड ना विनोदी, धड ना करुण, असें अर्धवट स्वरूपाचें झालें आहे!

कथानकांत निष्कारण केलेल्या या विचित्र व निरर्थक गुंतागुंतीमुळे भूमिकांच्या स्वभावचित्रणांतहि दोष अुत्पन्न झाले आहेत. शरचंद्र संस्थानिक आहे हें तो हवे तसे पैसे अुधळूं शकतो अेवढ्या अेकाच गोष्टीवरून आम्हीं मानावयाचें. बाकी त्याचे सारे आचार-विचार अेखाद्या मध्यमवर्गीयासारखे आहेत. मेघदूत हा त्याचा मोठा दोस्त दाखविला आहे. पण शरचंद्राचें प्रेम जिच्यावर बसलें होतें अशा मंजिरीशीं त्याचा विवाह न होतां शरचंद्राची वेडी मानलेली बायको मध्येच येअून त्याला ओढून घेअून जाते या मोठ्या घटनेचा त्याच्या मनावर काडीचाहि परिणाम होत नाही. शरचंद्राच्या पहिल्या बायकोचें– कमलिनीचें– या पांच-अंकी नाटकांत प्रथम दर्शन होतें तें चौथ्या अंकांत!

मेघदूत आणि सौदामिनी यांचे बरेचसे प्रेमप्रसंग बंडगार्डनसारख्या अुघड्या स्थळीं होतात हें या नाटकाचें अेक वैशिष्ट्य म्हणतां येअील. या दोघांमधील ज्या प्रेमचाळ्यांचें वर्णन कांही प्रवेशांत आलें आहे ते प्रसंग बंडगार्डनसारख्या सार्वजनिक विहारस्थळीं योजि-ण्यांत आल्यामुळे त्यावर परक्या संस्कृतीची दाट छाया पडल्याचा भास होतो. नाटकाच्या पहिल्या दोन अंकांत शरचंद्र हा नाटकाचा नायक असावा असें वाटतें, पण पुढील भागांत मेघदूत त्याची जागा पटकावतो आहे असा सारखा संशय येत राहतो. नाट्यरचनेंत नीटस-पणा नसल्यामुळे नाटक परिणामकारक वाटत नाही. थोडीशी गंमत यापलीकडे नाटकाला विशेष महत्त्व यावें असें त्यांत कांही नाही.

या नाटकांत मला काय आवडलें असेल तर ते त्याचे संवाद. कमालीचे साहजिक व मन-मोकळे संवाद लिहिण्याबद्दल शकुंतलाबाअींचें अभिनंदन करावयाला हवें. त्यांच्या संवादांत स्वाभाविकता अितकी आलेली आहे की कित्येक कित्येक ठिकाणीं अशिष्टपणाचा दोष त्यांत डोकावतो. संवादांत सहजता आहे याचा अर्थ त्यांत कल्पकता आहे असा मात्र नव्हे. चार मित्रमंडळी बसून मनमोकळ्या गप्पाटप्पा मारतांना त्यांच्या संवादांत खेळकर-पणा, सहजता व क्वचित् ग्राम्यताहि आढळते तोच नमुना पांघरलेलीं कातडीं नाटकाच्या संवादांचा आहे. नाटकांत पदें दिलीं आहेत, तीं वास्तविक कविताच म्हणतां येतील. त्यांत विशेष अुल्लेखनीय गुण कांही नाहीत.

केवळ संवादचातुर्याच्या जोरावर अगदी साधेंसुधें कथानक देखील किती चटकदार करतां येतें याचें अेक अुदाहरण म्हणून मी श्री. बाबूराव गोखले यांच्या 'पैल्यांतील वादळ' या नाटकाकडे बोट करीन. 'पांघरलेलीं कातडीं' नाटकाअितकीहि कथानकाची बैठक या नाटकाला लाभलेली नाही. पण मोजक्या पात्रप्रसंगांची कुशल मांडणी आणि चतुर संवाद या गुणांमुळे हें नाटक 'पांघरलेलीं कांतडीं' नाटकापेक्षा किती तरी रंगदार झालें आहे.

"प्रत्यहीं घरोघरीं होणाऱ्या साध्या मांडणांचें आणि मतभेदांचें कांहीवेळीं कसें भयंकर पर्यवसान होण्याचा संभव असतो" हें दाखविण्याचाच नाटककाराचा हेतु असल्यामुळे नाटकांत पेचप्रसंग निर्माण होअूनहि नाटकाचें खेळकर, विनोदी स्वरूप कुठेच दृष्टिआड होत नाही. तरुण, प्रेमळ आणि सुशिक्षित पतिपत्नी थट्टेथट्टेनेच अेकमेकांवरील रागाचें नाटक, हट्टाला

पेटून, जरूरीपेक्षा जास्त ताणतात त्यामुळेच त्या अुभयतांच्या पुनर्लग्नाचा विचित्र प्रसंग निर्माण होतो. या विलक्षण परिस्थितींत प्रत्यक्ष सांपडल्यावर शरद् आणि शिरीन यांना आपल्या नाटकी रागाचें व्यावहारिक कटु फळ पाहून आपली चूक कळून येते व त्याबरोबरच त्यांच्या अेकमेकांवरील अुत्कट प्रेमाचीहि प्रचीति येते; त्यामुळे अखेर हें सारें केवळ पेल्यांतील वादळ ठरतें.

शालन अेके ठिकाणीं म्हणते त्याप्रमाणे पेल्यांतील वादळ हें खरोखरीच अेक प्रेमाचें प्रहसन आहे. नाटक पाहावयास आलेल्या प्रेक्षकास प्रसन्न मनाने परत पाठवावयाचा अितकाच हें प्रहसन लिहिण्यांत लेखकाचा अुद्देश असून तो पूर्णांशाने सफल झाला आहे यांत शंका नाही. मराटींत अशा प्रकारचीं खेळकर विनोदी नाटकें फार थोडीं असल्यामुळेहि 'पेल्यांतील वादळा'ने तशा प्रकारच्या नाट्यवाङ्मयांत चांगल्यापैकी भर टाकली म्हणूनहि नाटककार श्री. गोखले यांचें अभिनंदन करावयास हवें.

नाटकाचें कथानक अगदी साधेंसुधें आहे पण योजिलेल्या भूमिकांच्या स्वभाववैशिष्ट्या-मुळे आणि मुख्यतः संवादचातुर्यामुळे नाटक मजेदार व चटकदार झालें आहे. शिरीन आणि शरद, रखमा आणि विठू, शालन आणि सखारामबापू बोकील या जोडप्यांच्या स्वभावांतील विरोधामुळेच मूळच्या साध्या कथानकाला रंगत प्राप्त होते नि बाबासाहेब आणि शाळिग्राम हे दोघे म्हातारे आपापल्यापरी त्यांत भर घालतात. 'पेल्यांतील वादळ' हें मिस्कील विनोदामुळे चटकदार झालेलें नाटक आहे. लग्नाचाच सनातन विषय त्यांत चितारलेला असला तरी विवाहित जोडप्याच्या पुनर्लग्नाच्या प्रश्नामुळे त्यांत नावीन्य आणि खुमारीहि आली आहे. शरद् आणि शिरीन पुन्हा लग्नाचें नाटक करूं पहातात तेव्हा त्यांच्या पहिल्या लग्नाचा विच्छेद करण्याची जरूरी भासते आणि त्या कामांत काय कायदेशीर कटकटी असतात याचा त्यांना अनुभव आल्यावर "अेकंदरीने लग्न मोडणें हें दगदगीचें काम असलें तरी तें जुळवणें सोपें आहे" हें शरदला कळून चुकतें. प्रेमाची कसोटी प्रसंगानेच लागते हेंहि जातां जातां या नाटकांत लेखकाने चांगल्या प्रकारें ध्वनित केलें आहे.

या नाटकाचा चटकदारपणा बहुतांशीं त्यांतील संवादांवर अवलंबून आहे. सुटसुटीतपणा आणि सहजता हे दोन गुण 'पांघरलेली कातडी' नाटकाच्या संवादांप्रमाणेच पेल्यांतील वादळ नाटकाच्या संवादांतहि आढळतात; पण त्यापेक्षा जास्त म्हणजे या नाटकाच्या संवादांत कल्प-कता आणि कोटिबाजपणा विशेष प्रत्ययास येत असल्याने हे संवाद जास्त आकर्षक वाटतात. "संसार हेंच मुळीं अेक काव्य आहे. लग्नापूर्वीचें अेकमेकांवरचें प्रेम म्हणजे अेक सुंदर भाव-गीत असतें. लग्न झाल्यावर पहिल्या दोन तीन वर्षांत त्या भावगीताचें मुक्तछंदांत रूपांतर होतें. आता पुढे दोनतीन मुलें झाल्यावर त्या मुक्तछंदाचा तराणा होतो ही गोष्ट निराळी", "वशि-ल्याने नोकऱ्या मिळतात, बायका नाही वश होत !", "अलीकडचीं तुमचीं प्रेमं म्हणजे दैनिकं, रोज नवीन आवृत्ति", "भांडणाशिवाय संसार म्हणजे पेट्रोलशिवाय मोटर आहे" अशा प्रकार-च्या चमकदार व कल्पक संवादांनी 'पेल्यांतील वादळ' अेक खेळकर वातावरणाचें मजेदार प्रकरण झालें आहे. "फार्स चालला आहे नुसता" हे शालनचे अेका ठिकाणचे अुद्गार नाटक वाचून पाहतां अगदी सार्थ वाटतात.

पेल्यांतील वादळ या खेळकर प्रहसनाच्या अगदी विरुद्ध टोकाचें नाटक श्री. व. शा. वरखेडकर यांचें 'ध्येयाचा ध्यास' हें आहे. या सबंध पांचअंकी नाटकांत विनोदावर तर संपूर्ण बहिष्कार टाकलेला आहेच, पण अव्वल अखेर त्याची रचना अितकी कृत्रिम व भावना-

तिरेकी झाली आहे की नाटक शेवटपर्यंत वाचण्यासाठी मला पुष्कळच मनस्ताप सहन करावा लागला. या नाटकांत कसलें तरी गूढ, भयानक, आभासमय वातावरण अुत्पन्न करण्याचा लेखकाचा अुद्देश असावा असें वाटतें. पण लेखकाच्या अप्रकाशित 'अहंकार' या कादंबरीचा पूरक भाग म्हणून 'ध्येयाचा ध्यास' हें नाटक लिहिलेलें असल्यामुळे ती कादंबरी वाचल्याखेरीज या नाटकांतील नायकाचें स्वभावचित्र पूर्णांशाने समजणें कठीण आहे.

आहे या स्थितींत नायक अनिरुद्ध हा वेड्याच्या अिस्पितळांतून निसटून आलेला प्राणी वाटतो. "अनिरुद्धाची राहती अिमारत, घरांतली स्थिति, त्याच्या आईचा मृत्यु व त्या शरयू-प्रकरणाचा शोककारक अंत या सर्व गोष्टींनी त्याचें अंतःकरण घायाळ केलें आहे. ... आपल्याला त्यापायीं वेड लागेल कीं काय असें वाटूं लागलें त्याला. हळूहळू त्याने कामाचे व्याप वाढविले आणि त्यांच्यांत स्वतःचें मन गुंतवलें. सारखें कामांत मग्न राहण्यांतच त्याचें हित व सुख आहे. ... कामाचे प्रचंड व्याप अुत्पन्न करून कर्तृत्वाच्या पाठीमागे लागण्यांत दुहेरी फायदा होणार आहे त्याला. अिकडे कीर्ति आणि मोठेपणा मिळेल आणि शिवाय कोणतीच मनोव्यथा जाणवणार नाही." अनिरुद्धाच्या मनःस्थितीचें हें चित्र मीं त्याचा जानी दोस्त आनंद याच्याच शब्दांत देण्याचा यत्न केला आहे. या विचित्र नि विकृत मनोवृत्तीचा अनिरुद्ध कामाचे डोंगर अुभारून त्यांत रमून जातो व "अजरामर होईल, अद्वितीय म्हणून गाजेल आणि अक्षरवाङ्मयांत जमा होईल असा तत्त्वज्ञानावरचा ग्रंथ निर्माण करावयाचा" त्याचा अुद्योग चालू असतो.

अनिरुद्धाची भूमिका लेखकाने अितकी कृत्रिम आणि विकृत रंगविली आहे की अशा दुबळ्या व पिशाचबाधित माणसाविषयी आदर वाटणें कठीण आहे. त्याच्याभोवतीं निष्कारण गूढतेचें वातावरण अुत्पन्न करण्यांत आलें असल्यामुळे मूळची विकृत भूमिका अधिकच अमानुष झाली आहे. सबंध नाटकांत त्याच्या मनःस्थितीला तळहातावरील फोडा-सारखे जपण्याचे साऱ्यांचे प्रयत्न चालू असल्यामुळे या साऱ्या भावनातिरेकी मानगडीचा ताण वाचकाच्या मनाला असह्य होतो.

कथानकापेक्षा या नाटकाचा भर मनोविश्लेषणावर फार आहे. विषयाचा विचार बाजूस ठेवून केवळ नाट्यरचनेपुरतेंच बोलायचें तर लेखकाने तंत्रदृष्ट्या नाटक कसबाने लिहिलें आहे हें मला मान्य आहे. पण नाटकांत महत्त्व तंत्रापेक्षाहि मंत्रालाच अधिक असलें पाहिजे तरच त्याचा अुपयोग. अेरव्ही प्रेताला शृंगारण्यासाठी सुवासिक फुलें वायां दवडण्यासारखाच प्रकार व्हायचा. 'ध्येयाचा ध्यास' हें नाटक या प्रकारचा अेक नमुना आहे. शिवाय केवळ अेखाद्या भूमिकेच्या मनःस्थितीचें — आणि त्यांतून पुन्हा अत्यंत विकृत मनःस्थितीचें — चित्रण कितीहि तंत्रशुद्ध रचनेने केलें तरी तें नाटक आकर्षक होअूं शकेल असें वाटत नाही. नाटक हें मुख्यतः रंगभूमीवर प्रयोग करण्यासाठी लिहावयाचें असतें. 'ध्येयाचा ध्यास' या नाटकाचा प्रयोग रंगभूमीवर करण्यांत आला तर प्रेक्षकांचे कोण हाल होतील याची कल्पनाहि करवत नाही.

र. गो. स.

## कथा कादंबरी

**१ लघुकथा चतुष्टय—** ले० प्रि. गो. चि. भाटे; प्रका० श्री. मा. गो. भाटे, ८३० सदाशिव, पुणें २; मूल्य रु. दीड.

२ विश्रांति— ले० श्री. भा. म. गोरे; प्रका० श्री. दा. ना. मोघे, स्कूल अॅन्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. दीड.

३ झांजर— ले० श्री. म. भा. मायनेकर; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, मुंबअी ४; मूल्य रु. अेक.

४ भैरवी— अनुवा० श्री. भा. वि. वरेरकर; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, मुंबअी ४; मूल्य रु. अडीच.

'विलायतयात्रा', 'युरोपयात्रा' अित्यादि प्रवासवर्णनें, 'प्रेम कीं लौकिक' ही कादंबरी आणि नुकताच "अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा अितिहास" लिहून प्रसिद्ध करणारे प्रि. गो. चि. भाटे यांनी 'लघुकथाचतुष्टय' नांवाचा अेक कथासंग्रह प्रसिद्ध केला आहे. प्रस्तुत पुस्तकांत सर वॉल्टर स्कॉट्च्या 'हार्ट ऑफ् मिडलोथियन', 'गाय मानरिंग', 'रॉब रॉय' आणि 'वेव्हरले' या चार कादंबऱ्यांच्या संक्षिप्त कथा दिलेल्या आहेत. अभिजात वाङ्मयांतील विख्यात लेखकांच्या ललितकृतींवरून सामान्य वाचकांसाठी संक्षिप्त कथा लिहिण्याची पद्धति फार जुनी आहे. शेक्सपिअरच्या नाटकांच्या चार्लस लँबने लिहिलेल्या गोष्टी प्रसिद्ध आहेतच. अुसनवारीने लिहिलेल्या या लँबच्या गोष्टींनीहि वाङ्मयीन मोठेपण मिळविलें आहे. लँबच्या धर्तीवर आपल्याकडेहि कांही प्रयत्न होत आहेत. त्यांपैकीच प्रि. भाटे यांचा 'लघुकथाचतुष्टय' हा अेक आहे. अशा कथांत मूळच्या कथानकाचे धागेदोरे आणि बारकावे वाचकांच्या पुढे मांडावे लागतात, आणि तेहि अत्यंत मनोरंजक रीतीने. मूळ ललितकृति वाचलेल्यास देखील या पुनरुक्तीपासून आनंद झाला पाहिजे. मुळांतील स्वभावपरिपोषासहि योग्य तो अुठाव मिळाला पाहिजे. प्रो. फडके यांच्या 'मनोहरच्या आकाशवाणीं'तून आलेल्या कांही संक्षेपकथा या दृष्टीने अुल्लेखनीय आहेत. प्रि. भाटे यांच्या या चार संक्षेपकथांनी संक्षेपकथांच्या अल्प असलेल्या वाङ्मयांत भर घातली आहे. मूळ स्कॉट्च्या कादंबऱ्याच सृष्टिवर्णनाने व अैतिहासिक माहितीने ओतप्रोत भरलेल्या आणि पाल्हाळिक अशा आहेत; तेव्हा मुळांतील वर्णनाचें आणि अैतिहासिक माहितीचें वैपुल्य आणि पाल्हाळ या कथांतून थोड्याफार प्रमाणांत अुतरल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. अेकंदरींत स्कॉटच्या कादंबऱ्यांचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याचें काम प्रस्तुत चतुष्टयाने होतें.

मराठींत लघुकथा रूढ करण्यासाठी 'नवी पालवी' आणि 'नवें निशाण' प्रसिद्ध करणारे प्रा. भा. म. गोरे यांनी 'विश्रांति' हा आपला कथासंग्रह प्रसिद्ध केला आहे. मराठी वाङ्मयांतील अलीकडच्या लघुकथा महाराष्ट्रीय पांढरपेशा समाजांतील संकुचित थरांतल्या सुशिक्षित स्त्रीपुरुषांच्या भोवतींच फिरणाऱ्या असतात याची जाणीव प्रा. गोरे यांना आहे असें त्यांच्या 'प्रारंभीं'च्या अुद्गारांवरून दिसतें; आणि या जाणीवेने त्यांनी या परीघाबाहेरील जगाकडे आपली दृष्टि वळविलेली आहे. 'ब्रॅडमनचा बाप', 'विजेचा पाळणा', 'प्रेमाचीं लेणीं', 'सतीचें वाण' आणि 'चंपक स्टोअर्स' या जरी सामान्यतः प्रेमकथा असल्या तरी त्यांतील प्रेमाच्या छटा आणि प्रेम करणाऱ्या व्यक्ति ठराविक ठशाच्या नाहीत. 'ब्रॅडमनचा बाप' आणि 'सतीचें वाण' यांतील वातावरण जरी कॉलेजजीवनांतील असलें तरी 'प्रेमाचीं लेणीं' ही अेका विडीवालीची प्रेमकथा आहे. 'विजेच्या पाळण्यां'त अेका गुजराती व्यापाऱ्याच्या मुलीला बसविलें आहे, तर 'चंपक स्टोअर्स'मध्ये गुजराती-दखणी विवाह रंगविला आहे.

'दूरचे डोंगर'मध्ये संपादक, संचालक आणि मालक या नात्याने मासिकाचा धंदा करणाऱ्या संपादकाची अेक बाजू रंगविली आहे. प्रस्तुत संग्रहाचें वैशिष्ट्य म्हणून 'मांजरीचीं पिलें' या लघुकथेकडे बोट दाखवितां येअील. मनुष्येतर प्राण्यांच्या जीवनावर आधारलेल्या लघुकथा मराठी वाङ्मयांत अपवादात्मक आहेत. प्रा. गोरे यांनी मांजरीच्या भावनांशीं समरस होअून प्रस्तुत कथा लिहिली आहे. प्रा. गोरे यांचा गुजराती भाषेशीं आणि लोकांशींहि वन्यांपैकी परिचय दिसतो. त्याच्या छटा संग्रहांत मधून मधून आढळतात आणि ठराविक चाकोरीबाहेर लेखकाची दृष्टि जात आहे याची साक्षहि त्यामुळे मिळते.

आधुनिक कथावाङ्मयांतील ठराविकतेची जाणीव ठेवून लिहिलेला आणखी अेक कथासंग्रह म्हणून श्री. मायनेकर यांच्या 'झांजर' ह्या कथासंग्रहाकडे बोट दाखवितां येअील. प्रस्तुत कथासंग्रहांत अेकहि प्रेमकथा नाही हेंच याचें वैशिष्ट्य आहे असें 'दिशा अुजळतांना'मध्ये श्री. मायनेकर सांगतात. परंतु वाचकांची तक्रार आहे ती प्रेमकथांबद्दल नाही तर त्यांतील त्याच त्या ठराविक वातावरणाबद्दल. पांढरपेशा सुशिक्षित समाज आणि त्यांतील तरुणतरुणींचीं ठराविक प्रेमचेष्टितें यांचा वाचकांना कंटाळा आला आहे; आणि तोहि त्यांत जीवनाचा साक्षात्कार नसतो म्हणून. जीवनाकडे कांही अेका विशिष्ट दृष्टीने पाहत असतांना होणाऱ्या साक्षात्कारांतून जर प्रेमकथेचा जन्म झाला तर ती अभिजात वाङ्मयाच्या पदवीला पोहोचण्यास कांहीच प्रत्यवाय नाही. मात्र प्रेमाखेरीज जीवनाला अनेक अंगें आहेत आणि त्याकडे कथालेखकांचें लक्ष जात नाही ही जी मुख्य तक्रार आहे तिला प्रस्तुत संग्रहांत लेखकाने जागा ठेवलेली नाही.

प्रस्तुत 'झांजर'मध्ये चित्रिलेल्या जीवनांत गरीब निरक्षर खेडूतावर 'कोर्टाच्या पायरीचा अिंगा' कसा फिरत असतो, बदलत्या काळाबरोबर आचार-विचारांत बदल झालेल्या सूनबाअीकडे पाहून प्रेमळ पण जुन्या वळणाच्या सासूबाअीला कसा मनःस्ताप होत असतो, जिवलग मैत्रिणी पण विषमपरिस्थितींत पडल्यामुळे अेकमेकींना त्या कशा अंतरतात अित्यादींची अगदी साधींसुधीं पण जिव्हाळ्याने रेखाटलेलीं चित्रें आढळतात. बदलत्या काळाबरोबर समाजांतील आचार-विचार बदलत जातात आणि त्यामुळे नव्या-जुन्याचा झगडा कसा चालत असतो याचा प्रत्यय लेखकाला असलेला 'मंदाची आअी' व 'सूनबाअीचा संसार' या कथांवरून दिसून येतो. समाजांतील व्यक्तींच्या दुःखांना मुख्यतः कारण त्यांतील आर्थिक विषमता असते याचीहि जाणीव 'कांचेचें कपाट', 'हाडाचीं काडें', 'पहिला पगार' अित्यादि गोष्टींतून होते. 'पीर डोंगरी', 'पहिला पगार' अशा कांही गोष्टींतून अतिरंजकतेचा जरी भास होत असला तरी श्री. मायनेकर यांच्या कथांचें अेकंदर स्वरूप साधें, सोपें आणि वास्तवतापूर्ण आहे. जीवनाबद्दलचा हा वास्तववादी दृष्टिकोण, जीवनाबद्दलचा जिव्हाळा आणि लेखनशैलींतील अकृत्रिमता अित्यादि गोष्टी त्यांनी आपल्या लेखनांत अशाच चालू ठेवल्या तर 'हरिभाअू आपटे यांच्या पंथामधील अेक आधुनिक स्वरूपाचे लेखक' म्हणून श्री. मायनेकर पुढेमागे ओळखले जातील अशी आशा श्री. वरेरकरांनी प्रस्तावनेंत व्यक्त केली आहे ती खरी ठरणें अशक्य वाटत नाही.

गं. बा. ग्रा.

डॉ. शरच्चंद्र चतर्जी यांच्या प्रभावी लेखणीचा मराठी वाचकांस परिचय होण्याचा हा आणखी अेक सुयोग आहे. श्री. मा. वि. वरेरकर यांच्या या कार्याबद्दल मराठी

वाचकांनी त्यांना आजपर्यंत धन्यवाद दिले त्याचप्रमाणे याहि प्रसंगी ते देतील यांत शंका नाही.

कादंबरींतील वातावरण आणि कथानक हीं मराठी वाचकांस बरींचशीं अपरिचित असलीं तरी त्यांतील मानवी जीवन सहज कळण्यासारखें आहे. शंकराचार्यांच्या पीठाप्रमाणे भैरवीचें पीठ आहे. त्या पीठावर स्त्रीचीच स्थापना होते. त्या पीठाविषयी त्या प्रदेशांतील लोकांना देवतेइतका आदर वाटत असल्याने भैरवीपदावरील व्यक्तीविषयीच्या त्यांच्या अपेक्षाहि अलैकिक अशाच असतात. भैरवी ही सर्व मानवी सुखदुःखापासून अलिप्त अशी संन्यासिनी आहे. लोकसेवा हा तिचा धर्म. तो धर्म पाळतांना कोणत्याहि वैयक्तिक भावनांचा तिला स्पर्शहि होत नाही अशी भैरवीपदावर असलेल्या षोडशीबद्दल चंडीगडच्या लोकांची श्रद्धा होती. त्या श्रद्धेला पोषक असेंच षोडशीचें वर्तन आहे. अनेक प्रसंगीं तिनें टिकविलेली अलिप्तता पाहून तिच्या असामान्यत्वाबद्दल पदोपदीं खात्री होते. परंतु त्या अलिप्ततेंत, त्या स्थानबद्ध निर्विकारतेंत असलेलें मानवी मन जिवंत आहे; तें तिने मारून टाकलें नाही. अेका नादान अरेराव जमीनदाराच्या अरेरावीला हटकण्याइतका तिचा स्वाभिमान जिवंत आहे. त्याबरोबरच त्याच्या आकस्मिक आजारामुळे त्याला असह्य यातना होऊं लागल्यानंतर त्याची शुश्रूषा करण्यासाठीहि ती निःसंकोचपणें पुढे झाली. ती शुश्रूषा करतांना तो पुरुष अनाचाराबद्दल ख्याति असलेला जमीनदार, आपण स्त्री— भैरवीपदाची जबाबदारी असलेली स्त्री— या परिस्थितीची तिने पर्वा केली नाही. अेक रात्र त्याच्या शुश्रूषेंत घालविण्यांत आपण आपल्याविषयीच्या लौकिककल्पनांना धक्के देत आहोंत याची तिला पूर्ण जाणीव असूनहि त्याची क्षति न बाळगतां तिने मानवधर्माचें पालन केलें. परंतु सरंजामी आचारविचारांत गढलेल्या चंडीगडांत या तिच्या कृत्यामुळे भयंकर वादळ अुठलें. त्या वादळामुळे भैरवी-षोडशी-भोवतीं प्रक्षुब्ध लोकमताचा जो वणवा भडकला त्याचें रौद्र स्वरूप कादंबरीभर पसरलें आहे. षोडशीने ज्यांचें मुलाप्रमाणे पालनपोषण केलें असे अनेक गरीब लोकहि त्यांत होरपळूं लागले. शेवटीं षोडशीने भैरवीपदाचा त्याग केला आणि आपल्या ठिकाणीं जागृत झालेल्या मानवधर्माचा स्वीकार केला. ज्या जीवानंदाची 'रुग्ण' म्हणून शुश्रूषा केल्याबद्दल तिला छळ सहन करावा लागला त्याच जीवानंदाचा तिने स्वीकार केला. कारण तो तिचा पति होता. ती बालसंन्यासिनी पुन्हां गृहस्थधर्मांत परत गेली. षोडशीचें झालेलें हें मानसिक स्थित्यंतर आणि त्यामागील सरंजामी वृत्तीच्या लोकांची नीतिबाजीच्या अरेरावीची पार्श्वभूमि यामुळे ही कथा मनोवेधक झाली आहे. मराठी भाषा या दृष्टीने बऱ्याच ठिकाणीं वाचक दचकतो, अडखळतो; पण तें कांहीं विशिष्ट हेतूने झालें आहे असें लेखकानीच प्रस्तावनेंत सांगितलें आहे.

गं. भा. नि.

## लघुनिबंध

१ **लघुनिबंध आणि लघुनिबंधकार—** ले० श्री. भि. अ. परब; प्रका० श्री. के. भि. ढवळे, मुंबअी; मूल्य आणे बारा.

२ **मला नाहीं पटत—** ले० प्रो. श्री. स. भावे; प्रका० द. पु. भागवत, मौज प्रिंटिंग ब्यूरो; मूल्य रु. सव्वा.

लघुनिबंध हा वाङ्मयप्रकार मराठी वाङ्मयांत रुजून त्याला आता बहर येऊं लागला आहे. प्रो. फडके, खांडेकर, काणेकर, दांडेकर यांसारखे लेखक या प्रकारचें विपुल लेखन करीत आहेत, तर नवोदित लेखकहि या वाङ्मयप्रकारांत आपलें वैशिष्ट्य प्रकट करण्याचे प्रयत्न करीत आहेत. नियतकालिकांतून प्रसिद्ध होणारें पुष्कळसें लघुनिबंधवाङ्मय गुणाने आणि वैशिष्ट्याने डोळ्यांत भरण्यासारखें आहे. अशा वेळीं नामवंत ठरलेल्या लेखकांच्या लघु-निबंधवाङ्मयाचें कसून परीक्षण करून या वाङ्मयप्रकाराचें अंतर्बाह्य स्वरूप काय आहे हें ठरविणें अुपकारक होअील. अशा तऱ्हेचे त्रोटक प्रयत्न आजपर्यंत थोडेफार झाले, परंतु ही दृष्टि ठेवून साकल्याने असा प्रयत्न व्हावयास पाहिजे होता तो श्री. भि. अ. परब यांनी केला याबद्दल ते निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत.

दुय्यम शाळांतून वर्षांत अमुक अितके निबंध लिहिले पाहिजेत अशी सक्ती करण्यांत आलेली असते. परंतु निष्काळजीपणामुळे अथवा अज्ञानामुळे विद्यार्थ्यांच्या मनांत वसत असलेल्या निबंधलेखनाच्या प्रवृत्तीवर विरजण पडतें. विद्यार्थ्यांचा कल निबंधलेखनापेक्षा लघु-निबंधात्मक लेखनाकडे असतो हें ओळखून त्याची जोपासना योग्य तऱ्हेने केली तर विद्या-र्थ्यांना लेखनाची आणि आत्मप्रकटीकरणाची हौस वाटूं लागेल यांत शंका नाही. ही गोष्ट ओळखून श्री. परब यांनी या पुस्तकाला जें थोडें शालेय स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे तो स्तुत्य आहे.

श्री. परब यांनी प्रा. फडके, श्री. खांडेकर, प्रा. काणेकर, प्रा. दांडेकर व श्री. सरदेसाअी या पांच लघुनिबंधकारांना आपल्या पुस्तकांत स्थान दिलें असून त्यांच्या लघुनिबंधलेखनाचा विश्लेषणात्मक परामर्श निरनिराळ्या लेखांत घेतला आहे. या पांचहि लेखकांचे दोन दोन लघु-निबंध त्यांच्या वैशिष्ट्याचे मासले म्हणून पुस्तकांत देण्यांत आले आहेत. शिवाय पुस्तकाला दोन प्रस्ताव जोडून अेकांत लघुनिबंधाच्या स्वरूपाचें दिग्दर्शन व दुसऱ्यांत या वाङ्मय-प्रकाराला लघुनिबंध कीं ललितप्रबंध हें नांव सार्थ व योग्य होअील याचा विचार केला आहे.

लघुकथेच्या चालीवर या वाङ्मयप्रकाराला प्राप्त झालेलें लघुनिबंध हें नांव अर्थाच्या आणि अभिप्रायाच्या दृष्टीने अनुचित आहे याची जाणीव श्री. परब यांना आहे. ललितनिबंध हें नांव त्यांच्या दृष्टीने अतिव्याप्त असलें तरी अभिप्रायाच्या दृष्टीने तें लघुनिबंधाहून खचित सरस आहे. लघुत्व हें या वाङ्मयप्रकाराचें वैशिष्ट्य नसून आनंदनिर्मिति करणें हें त्याच्या अनेक वैशिष्ट्यांपैकी अेक असल्याने ललितनिबंध या संज्ञेचा या वाङ्मयप्रकारावर जास्त हक्क पोचतो. लघुनिबंध हें रूढ झालेलें नांव मागे घेण्याची अडचण श्री. परब यांना वाटत असली तर अिंग्रजी वाङ्मयांत काय घडत आहे अिकडे लक्ष पुरविलें म्हणजे बस. अिंग्रजींत प्रबंधाला देण्यांत आलेलें Essay हें नांव लघुनिबंधाला देअून निबंधाला Treatise ही संज्ञा देण्याची खटपट तिकडचे लेखक करुन राहिले आहेत. ही नवीन नामकरणाची खटपट लघुनिबंधाच्या अडीचशे वर्षांच्या हयातीनंतर सुरू आहे ही लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे.

आपल्या प्रस्तावांत श्री. परब यांनी लघुनिबंधाच्या स्वरूपाची जी चर्चा केली आहे ती अधिक मूलगामी व्हावयास हवी होती. लघुनिबंध म्हणजे लेखकाच्या व्यक्तित्वाचें ललित-दर्शन ही थोडक्यांत त्याची सूत्रमय व्याख्या देतां आली तरी व्यक्तित्व म्हणजे काय, त्याचीं सारींच अंगें लघुनिबंधाला पोषक आहेत काय, नसलीं तर कोणतीं पोषक आहेत व कोणती मारक आहेत, लघुनिबंधाला कांही तंत्र आहे काय, तें असल्यास त्याचें स्वरूप काय, लघु-निबंधाची टोकळपणें सामग्री कोणती यांचें विवेचन व्हावयास पाहिजे होतें. त्याचप्रमाणे त्या

त्या लघुनिबंधकाराच्या लघुनिबंधलेखनाचा परामर्श घेतांना त्याच्या व्यक्तित्वाचा केंद्रबिंदु हेरून त्याच्या अनुरोधाने त्याच्या लघुनिबंधांचा विकास कसा झाला हें दाखविणें योग्य झालें असतें. फडक्यांची रसिक वृत्ति, खांडेकरांची काव्यात्मक वृत्ति आणि काणेकरांची टीकाकाराची वृत्ति या गोष्टी लक्षांत घेतल्या तर त्यांच्या लेखनांतील गुणदोषांचा अुलगडा सोपा होअील. अतिरिक्त काव्यात्मता, कल्पनाविलासाची हाव आणि आलंकारिक भाषेची रेलचेल यांमुळे खांडेकरांचे लघुनिबंध डागळले असले तर कठोर सडेतोडपणा, फाजील तार्किकता आणि भाषेचा रूक्ष खडबडीतपणा यांमुळे काणेकरांचे लघुनिबंध कलंकित झाले आहेत. फडक्यांचें लघुनिबंध-लेखन हृद्य आणि मधुर झालें आहे याचें कारण त्यांची सहृदय, अभिजात रसिक वृति.

हीं न्यूनें या पुस्तकांत राहिलीं याचें अेक कारण या पुस्तकांतील निरनिराळे भाग निरनिराळ्या वेळीं नियतकालिकांकरिता लिहिण्यांत आले होते हें असावें. परंतु या गोष्टी सोडल्या तर श्री. परब यांचा 'लघुनिबंध आणि लघुनिबंधकार' यांचा परामर्श घेण्याचा हेतु स्थूल मानाने साध्य झाला आहे. हें पुस्तक वाचल्यावर लघुनिबंधाचें स्वरूप आणि आजच्या नामवंत लघुनिबंधकारांचें वैशिष्ट्य व त्यांची कामगिरी लक्षांत भरते. फडके, खांडेकर व विशेषतः काणेकर यांच्या लघुनिबंधांचा परामर्श लेखकाने कांटेकोरपणाने घेतला आहे. गणू-काकांचें पात्र निर्माण करून काणेकरांनी आपल्या लघुनिबंधांना जिवंतपणा आणि विनोद यांची जोड कशी करून दिली याचें विवेचन मार्मिक आणि अुल्लेखनीय झालें आहे.

'मला नाहीं पटत !' या नांवाखाली मौज साप्ताहिकांत वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले लघु-निबंध श्री. भावे यांनी पुस्तकरूपाने वाचकांना सादर केले आहेत. 'पहिल्या अुडीने' श्री. भावे यांनी वाचकांच्या मनांत ज्या अपेक्षा निर्माण करून ठेवल्या होत्या त्या पुष्कळशा सुफलित होण्याच्या मार्गावर आहेत असें प्रस्तुतचें पुस्तक वाचून म्हणावेंसें वाटतें. 'पहिल्या अुडी'तला नवखेपणा आता या लघुनिबंधांत दिसत नसून आपल्या विशिष्ट क्षेत्रांत त्यांची लेखणी मोकळेपणाने संचार करूं लागली आहे. लघुनिबंध हा वाङ्मयप्रकारच अितका नाजूक म्हणावा लागेल की त्याला कृत्रिमाचा जराहि वास खपत नाही. कारण सहजता, मोकळेपणा, यांचा लोप झाला की तेथे व्यक्तित्वाचा संकोच झाला आणि अुसन्या अवसानाचें राज्य सुरू झालें असें समजावें. अर्थात् अशा अुसन्या अवसानांतहि त्या व्यक्तीचें वैशिष्ट्य व्यक्त होत असतें. पण तें व्यक्तित्वाचें दर्शन नसून व्यक्तित्वाच्या अुणीवेचें निदर्शन होय.

श्री. भावे यांचे 'पांचामुखीं परमेश्वर', 'अनुभवाचे औपधोपचार', 'आजचें काम अुद्यांवर ढकलूं नका !', 'अुत्तम आरंभाने अर्धें काम फत्ते !' हे सुरस अुतरलेले लघुनिबंध घेतले तर त्यांत त्यांची चोखंदळ निरीक्षकाची भूमिका स्पष्ट होते. जीवनाकडे ते आसक्तीने पाहतात पण जीवनानुभव घेतांना तो ते चोखंदळपणाच्या निकषावर घासून घेतात. पांचामुखीं परमेश्वर ही म्हण त्यांनी लहानपणींच मुखोद्गत केली असेल, पण विसंवादी अनुभव येतांच त्यांनी त्या म्हणीची राळ अुडविली आहे. अितर वाक्प्रचारांबाबत हीच गत झाल्याचें त्यांच्या बाबतींत दिसतें. ही गत होण्याचें कारण त्यांना आलेले—क्षुल्लक बाबतींतहि आलेले—अनुभव. पांचामुखीं परमेश्वर या लघुनिबंधांत ओव्हरकोट खरेदी करतांना आलेला अनुभव मजेदार आहे, आणि त्याच्याच चित्रणाने लघुनिबंध जिवंत आणि चटकदार झाला आहे. 'अनुभवाचे औपधोपचार' यांत आपलेंच औषध खात्रीचें असा अहंभाव बाळगणाऱ्यांचा जो सूक्ष्म अुपहास केला आहे तो बहारदार आहे. 'आजचें काम अुद्यांवर ढकलूं नका !' या लघु-निबंधांत, आलेल्या पत्रांना अुत्तरें देण्यांत चालढकलपणाने जी खुमारी अुत्पन्न होते तिच्या

वर्णनाने रंगत अुत्पन्न झाली आहे, तर 'अुत्तम आरंभाने अर्धे काम फत्ते !' या लघुनिबंधांत पहिल्याच तासाला अुत्कृष्ट तयारी करून गेल्याने पुढे जी फजीतीची पाळी येते तिच्या वर्णनाने मोठा चटकदारपणा आला आहे.

पण न पटणाऱ्या गोष्टींविषयीच लिहावयाचें ठरविल्यामुळे बऱ्याच निबंधांना तेंच तें स्वरूप प्राप्त झालें आहे. कारण जी म्हण किंवा वाक्प्रचार वर अुद्धृत केला त्याच्या अुलट बाजू सिद्ध होणार हें वाचकाला कळलेलेंच असतें. या लघुनिबंधांच्या ओघांत आपण कोठून कसे जाणार आहोंत आणि कोठे थडकणार आहोंत याचें कुतूहल राहिलें नसल्यामुळे, फक्त जें सिद्ध व्हावयाचें आहे तें कसें सिद्ध होणार आहे येवढ्याचपुरती वाचकाची अुत्कंठा जागृत राहते. आणि पुष्कळ वेळां असेंहि झाल्याचें दिसतें की बाजू अुलट सिद्ध करावयाची म्हणूनच केली आहे. तें करण्याकरिता अुदाहरणें व अनुभवहि गोळा केल्याचें दिसतें. शिवाय अशा लघुनिबंधांचें अधिष्ठान युक्तिवादावरच असल्यामुळे त्यांना भूमितीच्या सिद्धांताचें स्वरूप प्राप्त होतें. 'शिष्टपणा', 'फटाके वाजवूं नंका', 'कीर्तिरूपें अुरावें' अित्यादि लघुनिबंधांची थोडी-फार अशी स्थिति झाली आहे.

ना. मा. सं.

## शब्दचित्रें-व्यक्तिचित्रें

१ **चिमण्या**— लें० डॉ. कमळाबाई देशपांडे; प्रका० श्री. य. न. केळकर, पुष्करिणी, प्रभात रोड, पुणें ४; मूल्य आणे बारा.

२ **अनौपचारिक मुलाखती**— लें० श्री. य. गो. जोशी; प्रका० वि. ह. दामले, नवीन किताबखाना, पुणें २; मूल्य रु. दीड.

३ **ऋणानुबंधी**— लें० श्री. प्र. श्री. कोल्हटकर; प्रका० श्री. रा. दि. गद्रे, ४१ बुधवार, पुणें २; मूल्य रु. दीड.

४ **मनांतील मांडे**— लें० श्री. लखजी आंबराअीकर; प्रका० श्री. ल. स. केळकर, जनार्दन सदाशिव लिमि.चा प्रेस, पुणें २; मूल्य रु. सव्वा.

डॉ. कमलाबाअी देशपांडे यांनी बालमनाचीं काढलेलीं हीं सुंदर शब्दचित्रें आहेत. आधुनिक मानसशास्त्राने मानवी मनांतील व विशेषतः बालमनांतील अनेक रहस्यें अुकललीं आहेत आणि मुलांविषयी प्रौढांना स्वभावतःच वाटणारी ओढ जास्तच सुख-प्रद केली आहे. बाललीलांचें अगदी सहज होणारें दर्शनहि किती सुखावह असतें ! मानस-शास्त्राप्रमाणे आपल्या प्रौढ मनाला पुनःप्रत्ययाचा आनंद यांत लाभतो. त्यांत बाललीलांचा अर्थ कळला, त्यांतील मनोव्यापारांचें स्वरूप कळलें म्हणजे तर त्या आनंदांत मोठीच भर पडते. असें वेड लावणारें 'रम्यत्व' या शब्दचित्रसंग्रहांत आहे. सहृदय शिक्षकाच्या सृष्टीचें हें वैभव आहे. या 'चिमण्या' वाचून प्रत्येक जाणत्या प्रौढ माणसास आपल्याभोवतीं अस-लेल्या चिमण्या जगांतील सौंदर्याची जाणीव होअील. आपण आपल्या संकेताप्रमाणे भोव-तालच्या घडामोडींचा अर्थ लावतों. पण मुलांचेंहि कांही स्वतंत्र जग आहेच. त्याहि जगांत त्यांचे कांही संकेत आहेत. तें जग स्वयंपूर्ण आणि स्वयंविकासी आहे. त्या जगाशीं

आपण आपलें मन संवादी राखलें तर आपणच आपल्या सुखांत भर घातल्यासारखें होईल. 'चिमण्या' या लहानशा पुस्तकांतील शब्दचित्रें या दृष्टीनें मनोवेधक आहेत. त्या बाल-बालिकांच्या हालचालींचें लेखिकेनें अतिशय सूक्ष्मपणें अवलोकन केलें आहे. त्या अवलोकना-मागें जी शास्त्रीय दृष्टि आहे ती या पुस्तकाच्या या स्वरूपांत अव्यक्त असली तरी शास्त्रज्ञास तिची ओळख पटल्याखेरीज राहत नाही. चिमण्यांच्या जगांत वावरणाऱ्या अनेकांना हा ग्रंथ स्फूर्ति देईल यांत शंका नाही. श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी गृहरत्नें लिहून मराठी वाङ्मयांत जें नवें दालन अुघडलें आहे त्यांत 'चिमण्या' या ग्रंथानें मोठी भर घातली आहे.

श्री. य. गो. जोशी यांच्या 'अनौपचारिक मुलाखती' या अभिनव पुस्तकानें थोडीशी खळबळ माजविली यांत फारसें आश्चर्य नाही. कारण 'मुलाखती' या सदराखाली ज्या तऱ्हेचें लिखाण आपण वाचतों त्यापेक्षा या मुलाखतींचें तंत्र-मंत्र अगदी निराळें आहे. मुलाखतींत आराध्यदैवतानें बोलावें आणि मुलाखतदारानें तें धोरणीपणानें टिपून कौशल्यानें त्याचें संक-लन करावें असें होतें. परंतु या मुलाखतींत लेखकानेच मुलाखतविषयीभूत व्यक्तींना 'बोल-विलें' आहे. निरनिराळ्या व्यक्तींकडून पूर्वसंकल्पित अशा कांही मतांविषयी, कल्पनांविषयी, लेखकानें खुलासे करून घेतले आहेत. ते खुलासे मुलाखत म्हणून अेकत्र करतांना आपले वैयक्तिक अभिप्राय ठिकठिकाणीं जोडले आहेत. त्यामुळे या सर्व मुलाखतींतून श्री. य. गो. जोशी यांच्या मतांचा प्रभाव दिसून येतो. अशा लेखनपद्धतीमुळे या मुलाखतींना अनौप-चारिकपण आलें आहे. निरनिराळ्या स्वभावाच्या, वृत्तीच्या, व्यवसायाच्या माणसांच्या लौकिक जीवनामागे असलेली वैयक्तिक जीवनाची बैठक पाहणें हा लेखकाचा मुख्य हेतु आहे. लौकिकदृष्ट्या माहीत झालेल्या माणसाविषयीं असें कांहीं कळण्याची जिज्ञासा प्रत्येकाच्या मनांत असते. ती पूर्ण होण्यास अनौपचारिक मुलाखतीसारखें माध्यम अतिशय चांगलें अुपयोगीं पडणारें आहे. मुलाखतींच्या नांवाखर चाललेल्या झब्बूगिरीवर झोड अुठविणें हाहि श्री. य. गो. जोशी यांचा अेक हेतु आहे. प्रत्येकाचें जीवन हें कांही तरी वैशिष्ट्यानें रंगलेलें असतें. जीवनां-तील आकर्षकता ही लौकिक मोठेपणावर अवलंबून नसते हें श्री. जोशी यांनी प्रत्यक्षच दाख-विलें आहे. त्यासाठीं त्यांनी भिन्न व्यवसायांतील, भिन्न वृत्तींचीं माणसें निवडलीं आहेत. त्यांना बोलविण्यांत त्यांनी आपलें कौशल्य दाखविलें आहे. अर्थात् भिन्न वृत्तीच्या माणसाशीं लेखकाच्या भूमिकेवरहि सारख्याच प्रमाणांत समरस होतां येणें स्वभावतःच अशक्य असल्यानें याहि मुलाखतींत अुत्कटतेच्या दृष्टीनें कांहीसे चढ-अुतार दिसतात. पण त्यांच्याविषयींची लेखकाची आस्था सर्वत्र व्यक्त झाली आहे. लेखकाची भूमिका समजली म्हणजे या ग्रंथांतील मुलाखतींत त्या त्या व्यक्तीचें अंतरंग पूर्णपणें व्यक्त झालें कीं नाही हें सहज पाहतां येतें. हीं त्या त्या व्यक्तींच्या जीवनाचीं छायाचित्रें नाहीत; त्यांच्या जीवनाचीं प्रतिबिंबेंहि नाहीत; त्यांच्या जीवनांतील कांही हृद्य भागांचें हें चित्रण आहे. ठिकठिकाणीं श्री. य. गो. जोशी यांनी संवादांत जीं मतें व्यक्त केलीं आहेत त्यांत श्री. य. गो. जोशी यांचीहि मुलाखत नकळत येअून गेली आहे.

श्री. प्र. श्री. कोल्हटकर यांच्या ऋणानुबंधी या पुस्तकाची बैठक श्री. य. गो. जोशी यांच्या पुस्तकापेक्षा निराळी आहे. सडेतोडपणा, निर्भीडपणा अित्यादि गुण दोन्ही ग्रंथांत दिसले, तरी परिचित आणि ऋणानुबंधी या संबंधांत राहणारें अंतर या दोन्ही ग्रंथांत राहिलें आहे. श्री. कोल्हटकर यांना व्यक्तिशः ज्या ज्या व्यक्तींविषयी कांही ना कांही

कारणामुळे विशेष आपुलकी वाटते अशा व्यक्तींचीं 'स्मृतिचित्रें' या ग्रंथांत रेखाटलीं आहेत. त्या त्या व्यक्तीविषयी त्यांना स्वतःस वाटतें तें त्यांनी मनमोकळेपणानें लिहिलें आहे. या ग्रंथांतील कांही व्यक्तींविषयी अितरांनीहि प्रसिद्धपणें लिहिलें आहे. त्या मजकुराची या ग्रंथांतील मजकुराशीं तुलना केली म्हणजे श्री. कोल्हटकर यांची दृष्टि आत्मनिष्ठ आहे हें लक्षांत येतें. या आत्मनिष्ठेमुळे पुस्तकांत पानोपानीं जिव्हाळा व्यक्त होतो. अेखाद्या व्यक्तीच्या अेखाद्या हालचालीविषयी त्यांनी तीव्र नापसंती व्यक्त केली तरी तेथेहि हा जिव्हाळा कमी झालेला नाही. आपल्या सहवासांत आलेला हा गृहस्थ आपणांस किती हृतन्द्रेने आठवत आहे हें यांतील ऋणानुबंधी वाचतील तेव्हा त्यांना किती अकल्पित समाधान वाटेल ! आपुलकी, आदर, कळकळ अित्यादि भावनांच्या बरोबरच येथे जागरूक, विवेकहि वावरत आहे. आपुलकीच्या पोटीं आंधळेपण येतें असें म्हणतात. परंतु डोळस आपुलकी कशी असते हें पहावयाचें असेल तर 'ऋणानुबंधी' वाचावें. श्री. कोल्हटकर यांच्या लेखणींतील प्रासंगिक शब्दनिष्ठेमुळे त्यांचें लेखन चुरचुरीत होतें. गडकरीसंप्रदायाचे माफक संस्कार त्यांच्या लेखणीवर झाले आहेत. तें त्यांचें वडिलोपार्जितहि असेल. त्यांच्या दृष्टिकोनाचा आणि भाषासरणीचा 'आकाशवाणी' 'मोड आणि खुर्दा' अित्यादि ग्रंथांत मराठी वाचकांस अविस्मरणीय परिचय झालाच आहे. तो परिचय या ग्रंथाने द्विगुणित होअील. ग्रंथाची प्रस्तावना या लेखनप्रकाराचा योग्य प्रस्ताव करणारी अशी आहे. लेखकानेच प्रस्तावना लिहिणें अनेक दृष्टींनी कसें अुपकारक असतें तें अशा प्रस्तावनांवरून कळतें. मुलाखत, शब्दचित्र, अित्यादि नांवांनी वावरणाऱ्या वाङ्मयाचें स्वरूप त्याच्या गुणदोषांसह प्रस्तावनेंत फार चांगलें विशद झालें आहे.

अुपरोधक आणि वक्रोक्ति यांवर अुभारलेल्या लेखांचा 'मनांतील मांडे' हा अेक वाचनीय संग्रह आहे. पुस्तकांच्या पहिल्या ३७ पानांत आत्मचरित्र या सदरांतील ढोंगीपणा अुपरोधाने व्यक्त करून दाखविला आहे. विडंबनविषयाची ओळख मधून मधून पटल्यावर तेथे तर लेखकाच्या टीकेचें स्वरूप स्पष्ट होतें. विडंबनास मूळ विषयाशीं अतिशय सूक्ष्म परिचय आवश्यक असतो. तसा परिचय या लेखकाचा झाला आहेसें दिसतें. मराठींतील कांही प्रसिद्ध आत्मचरित्रांतील भंपकपणा डोळ्यासमोर ठेवून त्यावर लेखकाने मोठ्या कौशल्याने हल्ला केला आहे. आणि चारित्र्याची पर्वा न करितां आत्मचरित्र लिहिणाऱ्यांचा अुथळपणा विनोदाच्या आधारें दाखविला आहे. या दीर्घ लेखाखेरीज आणखी आठ लेख या पुस्तकांत आहेत. त्यांत कुत्रा हा शेवटचा लेख वक्रोक्तीचा अुत्कृष्ट नमुना म्हणून दाखवितां येअील. श्री. कृ. कोल्हटकर व शि. म. परांजपे या दोन लेखकांच्या लेखनशैलीचें प्रतिबिंब श्री. लखजी यांच्या या पुस्तकांत दिसतें आणि त्या दोघांत काळकर्त्योंशीं त्यांचे नातें जवळचें आहे असें वाटतें. रूपकादिकांच्या द्वारें सामाजिक दोषांवर विदारक टीका करणें, त्या कामीं वक्रोक्तीचा यशस्वी अुपयोग करणें अित्यादि गुण कुत्रा या लेखांत आहेत. विनोदासाठी विनोद करण्याच्या भानगडींत न पडतां त्यांनी 'काळकर्त्यों'च्या लेखनपद्धतीचा विशेष अभ्यास करून आपलें वक्रोक्ति हें हत्यार चांगलें परजावें असें त्यांस सांगावेंसें वाटतें. श्री. लखजी हे अेक नवोदित लेखक आहेत. असें असूनहि भोवतालच्या विकृत प्रणयपंथापासून ते अलित आहेत ही अभिनंदनीय गोष्ट आहे. सामाजिक जीवनांतील मुखपृष्ठांवर न भाळतां अंतरंगाकडे त्यांचें लक्ष आहे यामुळे त्यांचें हें वाङ्मयपदार्पण आशादायी आहे यांत शंका नाही.

गं. भा. नि.

अनुक्रमणिका

# भाषाभगिनींचा गेल्या तिमाहींमधील संसार

**कन्नड—** कर्नाटक साहित्यसंमेलन यंदा नाताळच्या सुट्टींत म्हैसूर संस्थानांतील शिमोगा येथे भरावयाचें होतें. परंतु सद्यःपरिस्थितीमुळे तें बेमुदत पुढे ढकललें गेलें. कर्नाटक साहित्यपरिषदेच्या साधारण सभेची बैठक मात्र २० डिसेंबर रोजीं बंगळूर येथें होअून पुढील वर्षाकरिता पदाधिकाऱ्यांची निवड झाली. प्रो. श्रीकंठय्या हे अुपाध्यक्षपदावरून निवृत्त होअून त्यांच्या जागीं श्री. मास्ती वेंकटेश आयंगार यांची निवड झाली. प्रो. श्रीकंठय्या यांच्या अुज्ज्वल कामगिरीबद्दल सर्व कर्नाटक त्यांचा ऋणी राहील.

नवरात्रांत कर्नाटकांत सर्वत्र साजरा होणारा राष्ट्रीय सण म्हणजे नाडहब्ब. यंदाच्या परिस्थितीमुळे तो जवळजवळ साऱ्याच ठिकाणीं साजरा झाला नाहीं. क्वचित् गुलबर्ग्यासारख्या ठिकाणीं तो साजरा करण्यांत आला. तेथे कांहीं साहित्यसेवकांचीं व्याख्यानें झालीं.

कागदाच्या दुर्मिळतेमुळे प्रकाशनावर प्रतिकूल परिणाम झाला आहे, तथापि मनोहर ग्रंथमाला व तीसारख्या अितर माला आपलें कार्य चालवीत आहेतच. या मालेचें पन्नासावें पुष्प म्हणून "आशुनाटकगळु" या नांवाचा अेक तीन नाटकांचा संग्रह प्रसिद्ध झाला. हीं नाटकें गेल्या मेमध्ये तात्कालिक विषयांवर रचून करण्यांत आलीं. हा प्रयोग यशस्वी झाला असून अनुकरणीय वाटतो.

नुकत्याच दोन नवीन ग्रंथमाला सुरू झाल्या आहेत. 'ललितसाहित्यमाले'चे संपादक श्री. चुळकि हे असून 'वसंतग्रंथमाला' श्री. अ. न. कृष्णराव हे संपादीत आहेत. त्यांच्या हातून चांगली कामगिरी होअील अशी आशा वाटते. 'प्रचारपुस्तकमाला' सामान्य वाचकांकरिता ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें आपलीं प्रत्येकीं दोनआणेवालीं प्रकाशनें काढण्याचें कार्य करीत आहेच.

श्री. मास्ती यांनी आपलें 'जीवन' मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झालेलें 'रामनवमी' हें काव्य पुस्तकरूपाने प्रसिद्ध केलें आहे. सामान्य जीवनामधील कथा सांगत असतां आपलें जीवनविषयक तत्त्वज्ञान ग्रथित करण्याची त्यांची हातोटी या काव्यांत प्रकर्ष पावली आहे. या तिमाहींत श्री. कैलासम् यांनी बऱ्याच काळापूर्वी लिहिलेलीं कांहीं छोटीं नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत. श्री. बेंद्रे यांनी आपला मेघदूताचा सुंदर अनुवाद नुकताच संपविला आहे. संदेशार्थ अधिक स्पष्ट करणारे स्वतःचे कांहीं श्लोकहि त्यांत त्यांनी घातले आहेत. तें अद्यापि प्रकाशित व्हावयाचें असून आजपर्यंत झालेल्या मेघदूताच्या चार पांच कन्नड भाषान्तरांपेक्षा तें सरस ठरेल अशी अपेक्षा आहे.

**रं. श्री. मुगळी**

**गुजराती—** गेल्या तीन महिन्यांत गुजराती भाषेंतील प्रकाशन अगदी स्थगित झाल्यासारखें आहे. याला दोन मुख्य कारणें आहेत. पहिलें कारण राजकीय चळवळ व दुसरें कारण कागदाची भयंकर महर्गता. कागद पूर्वीच्या मानाने सातशे आठशे टक्के महाग झाला असून शिवाय मिळत नाही. याचा परिणाम ग्रंथप्रकाशनावर फार होणें क्रमप्राप्तच आहे. गेल्या तीन महिन्यांत मुंबअी, बडोदें, सुरत, अहमदाबाद या मुख्य केंद्रांच्या ठिकाणीं साहित्यविषयक अशा कांहींच चळवळी किंवा समारंभ झाले नाहीत.

या काळांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपैकी प्रमुख पुस्तकें खालीलप्रमाणे होत.

१. **तेजछाया**— लेखक-श्री. रमणलाल वसंतलाल देसाअी; प्रकाशक आर. आर. शेठनी कंपनी, मुंबअी; किं. ३ रुपये. या पुस्तकांत श्री. रमणलाल देसाअी यांनी आपल्या आकर्षक व प्रसादपूर्ण भाषाशैलीने श्रीकृष्ण, श्रीशिवाजी, महात्मा गांधी, महाराणा प्रताप अित्यादि थोर पुरुषांचीं शब्दचित्रें काढिलीं आहेत.

२. **तरंग**— प्रो. मोहनलाल पार्वतीशंकर दवे यांनी आपल्या विविध विषयांवरील लघुनिबंधांचा संग्रह यांत केला आहे. ग्रंथ रसाळ झाला आहे. किं. १॥ रु.

३. **दीवडिया**— 'प्र' या टोपणनांवाने लिहिणाऱ्या अेका सत्कवीच्या काव्याचा संग्रह यांत करण्यांत आला असून, काव्य सध्याच्या परिस्थितीवर आधारलेलें असून शिवाय प्रासादिकहि आहे. प्रकाशक- शंकरलाल नाथजी दवे, नवसारी; किं. १॥ रु.

४. **साम्राज्यवाद**— लेखक व प्रकाशक- रावतभाअी देसाभाअी खुमाण, पो. दामनगर; किं. १-१२-०.

५. **अक्कलना खां**— सुप्रसिद्ध विनोदी लेखक 'बेकार' यांच्या अेकवीस विनोदी कथांचा हा संग्रह अत्यंत वाचनीय आहे. पुस्तक नवचेतनसाहित्यमंदिर, मद्र, अमदावाद, या संस्थेमार्फत प्रसिद्ध झालें असून त्याची किंमत रु. २॥ आहे.

६. **ब्रह्मदेश**— प्रस्तुत पुस्तकांत ब्रह्मदेशाविषयी सर्व प्रकारची संपूर्ण माहिती अत्यंत आकर्षक पद्धतीने श्री. रमेश रंगनाथ गौतम यांनी दिली असून पुस्तक बडोदें येथील सयाजी-साहित्यमालेतर्फे प्रकाशित करण्यांत आलें आहे. पुस्तकाची किंमत रु. १-२-० आहे.

याशिवाय संदेश, बेधडी मौज, प्रजाबंधु व गुजराती अित्यादि वृत्तपत्रांचे माहितीने व चित्रांनी भरलेले असे दिवाळी अंक याच काळांत प्रसिद्ध झाले.

वि. पां. दांडेकर

## गेल्या चार महिन्यांतील मराठीचा साहित्यसंसार

### १ साहित्यविषयक तात्त्विक चर्चा

| | | |
|---|---|---|
| (१) चरित्रलेखन-कला कीं कारागिरी:— ले. वा. ल. कुलकर्णी, | समीक्षक | डिसें. १९४२ |
| (२) मराठीचें साहित्यशास्त्र म्हणजे काय ?— ले. रा. श्री. जोग | ,, | जाने. १९४३ |
| (३) साहित्य व संगीत:— ले. पांडुरंग हरि देशपांडे | सह्याद्रि | आक्टो. १९४२ |
| (४) राष्ट्र आणि वाङ्मय:— ले. श्री. रा. परांजपे | ,, | जाने. १९४३ |
| (५) लोकगीतांचें स्थान:— ले. वा. ना. देशपांडे | मनोहर | ,, ,, |
| (६) शील व साहित्य:— ले. मा. का. देशपांडे | ,, | ,, ,, |
| (७) विचारसौंदर्य हेंच खरें सौंदर्य काय ?:— ले. वि. पां. करमरकर | धनुर्धारी | ५ डि. १९४२ |
| (८) कला जीवनाच्या पुढे कीं मागे ?:— ले. ग. य. चिटणीस | ,, | १२ डि. ,, |
| (९) आविर्भावगीतें:— ले. पु. कृ. घैसास | सह्याद्रि | जाने. १९४३ |
| (१०) मानवी मनच अश्लील:— ले. शंकर पेंडसे | यशवंत | ,, ,, |
| (११) नायक व नायिका कोणास म्हणावें:— ले. द. सी. पंगु व | झंकार | ११ऑक्टो. १९४२ |
| का. धों. पेडणेकर, | | ११ आक्टो. १९४२ |
| (१२) स्वभावचित्रें:— ले. प्र. श्री. कोल्हटकर | यशवंत | नोव्हें. ,, |

**२ ग्रंथपरीक्षणें**

| | | | |
|---|---|---|---|
| (१) अनौपचारिक "यं. गो."— ले. श्री. के. क्षीरसागर<br>(य. गो. जोशीकृत 'अनौपचारिक मुलाखतींचें परीक्षण') | सह्याद्रि | नोव्हें. | १९४२ |
| (२) शंभर वर्षांपूर्वीचा महाराष्ट्र — ले. दि. वि. काळे<br>(ज्ञानोदयाचीं पहिलीं शंभर वर्षें. सं. दिवाळे यांचें परीक्षण) | ,, | ,, | ,, |
| (३) "अनौपचारिक य. गो."— ले. य. गो. जोशी | ,, | जाने. | १९४३ |
| (४) "माझ्या कलेसाठीं"— ले. वा. ल. कुलकर्णी | समीक्षक | आक्टो. | १९४२ |
| (५) अनौपचारिक मुलाखती— ले. शं श्री. देवभक्त | ,, | ,, | ,, |
| (६) रा. भि. गुंजीकर लेख— ले. श्री. म. वर्दे | ,, | ,, | ,, |
| (७) "डाकबंगला"— ले. वा. ल. कुलकर्णी | ,, | ,, | ,, |
| (८) "सारस्वत"— ,, | ,, | डिसें. | ,, |
| (९) "रसविमर्श"— ले. का. धों. पेडणेकर | झंकार ३ | जाने. | १९४३ |
| (१०) "लघुनिबंध आणि लघुनिबंधकार"— ले. अविनाश | यशवंत | जाने. | ,, |
| (११) क्रौंचवध आणि गांधीवाद— ले. कुमार वसंत | ,, | ,, | ,, |
| (१२) साहित्यांतील दौलत— | झंकार ८ | नोव्हें. | १९४२ |

**३ साहित्य समालोचन**

| | | | |
|---|---|---|---|
| (१) यंदाचे दिवाळी अंक— ले. बा. कृ. गलगली | मनोहर | डिसें. | १९३२ |
| (२) दिवाळी अंकाची आरास— | धनुर्धारी २१ | नोव्हें. | ,, |
| (३) १९४२ चें मराठी वाङ्मय— ,, | ध्रुव | जाने. | १९४३ |

**४ साहित्यिकांचा परिचय**

| | | | |
|---|---|---|---|
| (१) तात्यासाहेब रहाळकर (न. शं. रहाळकर)— ले. मा. गो. गवारीकर | सह्याद्रि | जाने. | १९४३ |
| (२) पां. वा. गाडगीळ – ले. वा. रा. ढवळे | समीक्षक | आक्टो. | १९४२ |
| (३) द. के. केळकर— ,, | ,, | नोव्हें. | ,, |
| (४) रा. अ. काळेले— ,, | ,, | डिसें. | ,, |
| (५) रा. श्री. जोग— ,, | ,, | जाने. | १९४३ |
| (६) य. गो. जोशी | मनोहर<br>,, | ऑक्टो.<br>नोव्हें. | १९४२ |
| (७) वि. ल. बर्वे— ले. वि. प. चितळे | ,, | डिसें. | १९४२ |
| (८) वा. ना. देशपांडे — ले. ह. र. भातखंडे | ,, | जाने. | १९४३ |
| (९) कै. श्री. नी. चापेकर— ले. पु. रा. लेले | समीक्षक | जाने. | ,, |
| (१०) ,, ,, | चित्रमयजगत् | ,, | ,, |
| (११) ,, ,, | ध्रुव | ,, | ,, |
| (१२) कै. वि. औंधकर— ले. चिं. ग. कोल्हटकर | समीक्षक | ,, | ,, |
| (१३) कै. जोतीराव फुले— ले. द. स. दरेकर | मनोहर | ,, | ,, |

**५ अितर लेख**

| | | | |
|---|---|---|---|
| (१) ग्रीक ट्रॅजेडीज्— ले. बा. ग. खापर्डे | सह्याद्रि | आक्टो. | १९४२ |
| (२) ,, ,, | ,, | नोव्हें. | ,, |

(३) ग्रीक रंगभूमि— ले. न. चिं. केळकर सह्याद्रि डिसें. १९४२
(४) कांही भारतीय स्वातंत्र्यगीतें— ले. ज. गं. करंदीकर ,, नोव्हें. ,,
(५) ज्ञानेश्वरमहात्मता— ले. न. चिं. केळकर ,, जाने. १९४३
(६) महाभारत संशोधनकार्य— ले. मा. वा. वैद्य ,, ,, ,,
(७) मराठी पुरुषी विशेषनामांचीं विशिष्ट रूपें (पूर्वपक्ष)—
ले. ना. गो. चापेकर समीक्षक आक्टो. १९४२
(८) मराठी पुरुषी नामांचीं रूपें (अुत्तरपक्ष)—
ले. रा. म. आठवले समीक्षक आक्टो. १९४२
(९) आमच्या संशोधनाचा भ्रमाचा भोपळा—
ले. दा. के. ओक रामदास व रामदासी आक्टो. १९४२
(१०) माझे प्रेक्षक— ले. चिं. य. कोल्हटकर धनुर्धारी २ व ९ जाने. १९४३
(११) फिरून अेकदा मेघदूतविचार— ले. रा. श्री. जोग चित्रमयजगत् नोव्हें. १९४२
(१२) रघुकुमार— ले. ना. ग. जोशी ,, डिसें. ,,
(१३) मेघदूतासंबंधी थोडी चर्चा—
ले. ना. ग. जोशी व रा. श्री. जोग ,, ,, ,,
(१४) साहित्यसेवेंतील स्मृति- क्र. २३—
(१५) आंबराअी व माडखोलकर— ले. मो. रा. वाळंबे यशवंत आक्टो. ,,
(१६) माझ्या कलेसाठी— ले. अरविंद ,, ,, ,,
(१७) यशवंतांची मांडवी— से. शं. के. कानेटकर ,, डिसें. ,,

६ साहित्यिकांचे मृत्यु

(१) रा. ब. दामोदर गणेश पाध्ये ३ डिसेंबर १९४२ मुंबअी येथे
(२) प्रा. श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर १७ ,, ,, ,,
(३) श्री. विष्णुपंत औंधकर १५ ,, ,, कोल्हापूर येथे
(४) प्रा. नी. ब. भवाळकर ,, ,, नागपूर येथे

७ अुल्लेखनीय ग्रंथप्रकाशन

(१) वादळ— ले. ना. सी. फडके
(२) क्रौंचवध— ले. वि. स. खांडेकर
(३) मित्र हो !— ले. ना. सी. फडके
(४) लघुकथा— ले. शं. ह. देशपांडे
(५) कलेचीं क्षितिजें— ले. प्रभाकर पाध्ये
(६) प्रकाशलेखनशास्त्रांतील आश्चर्ये— ले. का. अ. द्रामले
(७) टीका आणि अभ्यास— ले. रा. ग. हर्षे
(८) आअी— ले. माधव मनोहर
(९) आपापलें हितगुज— ले. श्री. म. माटे
(१०) अंतरंग— ले. आनंदीबाअी किर्लोस्कर

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## नियामक मंडळाची सभा

म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची सभा ता. ३० ऑक्टोबर १९४२ शुक्रवारीं दुपारीं तीन वाजतां नाशिक येथे 'लोकसत्ता हॉल'मध्ये भरली. सभेस खालील सभासद अुपस्थित होते :—

१ प्रा. द. वा. पोतदार, पुणें; २ प्रा. वा. म. जोशी, पुणें; ३ श्री. कृ. ग. लिमये, पुणें; ४ प्रा. गं. गो. कानेटकर, सांगली; ५ प्रा. श्री. रा. पारसनीस, पुणें; ६ प्रा. रा. श्री. जोग, पुणें; ७ प्रा. वि. भि. कोलते, अुमरावती; ८ प्रा. वि. ह. निजसुरे, धुळें; ९ श्री. द. ल. महाजन, नांदेड; १० श्री. बा. शि. नाअीक, पुणें; ११ श्री. वा. दा. गोखले, पुणें; १२ डॉ. अ. ना. भालेराव, मुंबअी; १३ के. ना. काळे, पुणें.

परिषदेचे अुपाध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार यांनी अध्यस्थान स्वीकारून कामास प्रारंभ केला. सभासदांकडे पाठविलेल्या सूचनेप्रमाणे ही सभा दोन वाजतां सुरू व्हावयाची, परंतु कार्य-कारी मंडळाच्या सभेचें कामकाज या वेळेपर्यंतो पूर्ण होअूं न शकल्याने सभेस अुशीरा सुरु-वात करावी लागली याबद्दल अध्यक्षांनी कार्यकारी मंडळातर्फे खेद व्यक्त केला. पुरेशी गणसंख्या असल्याचें सभेच्या निदर्शनास आल्यानंतर सभेंत पुढीलप्रमाणे कामें झालीं :—

१ मागील सभेचा वृत्तान्त वाचून सर्वानुमतें पक्का करण्यांत आला.

२ यानंतर वार्षिक सभेपुढे (ता. ३०।१०।४२) मांडावयाच्या कामांचा विचार झाला. वार्षिक सभेच्या सभासदांकडे पाठविलेल्या छापील कार्यक्रमपत्रिकेंतील क्रमांक १ ते ५ हीं कामें मामुली स्वरूपाचीं असल्याने विशेष चर्चा न करतां तीं रीतसर साधारण सभेपुढे ठेविलीं जावीं अशी कार्याध्यक्षांनी विनंती केली, व ती सभेने सर्वानुमतें मान्य केली. क्रमांक ६मधील ट्रस्ट्री व ट्रस्टाविषयक कारभाराबद्दल कार्यकारी मंडळाने केलेल्या कामाचें निवेदन कार्याध्यक्षांनी सभेस केलें व याबद्दलचा योग्य तो ठराव साधारण सभेने करावा असें सभेने ठरविलें. क्रमांक ७ मध्ये सुचविलेल्या घटनेंतील फेरफारास मान्यता देण्यांत आली व हा फेरफार नियामक मंडळाच्या शिफारसीसह साधारण सभेपुढे ठेवावा असें ठरलें.

येणेंप्रमाणे कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा विसर्जन केली.

---

## वार्षिक साधारण सभा

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा ता. ३० ऑक्टोबर १९४२ शुक्रवारीं दुपारीं साडेतीन वाजतां नाशिक येथील 'लोकसत्ता हॉल'मध्ये भरली. सभेस खालील सभासद अुप-स्थित होते :—

१ श्री. वा. दा. गोखले, पुणें; २ श्री. बा. शि. नाअीक, पुणें; ३ श्री. द. व्र. मुद्गल, सोलापूर; ४ श्री. बा. न. जक्कल, सोलापूर; ५ प्रा. गं. बा. सरदार, पुणें; ६ श्री. ल. दे. सुर्वे, सोलापूर; ७ श्री. ग. ना. अंत्रेकर, नांदेड; ८ श्री. द. ल. महाजन, नांदेड; ९ प्रा. वि. ह.

निजसुरे, धुळें; १० प्रा. वि. भि. कोलते, अमरावती; ११ प्रा. रा. श्री. जोग, पुणें; १२ प्रा. श्री. रा. पारसनीस, पुणें; १३ श्री. कृ. गो. मराठे, पुणें; १४ डॉ. वि. भि. फडके, पुणें; १५ श्री. चि. वि. आपटे, जमखंडी; १६ प्रा. गं. गो. कानेटकर, सांगली; १७ श्री. कृ. ग. लिमये, पुणें; १८ श्री. रा. ने. शहा, सोलापूर; १९ श्री. के. नारायण काळे, पुणें; २० प्रा. द. वा. पोतदार, पुणें; २१ प्रा. वा. म. जोशी, पुणें; २२ डॉ. अ. ना. मालेराव, मुंबअी.

परिषदेचे अुपाध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार यांनी अध्यक्षस्थान स्वीकारून कार्यकारी मंडळाच्या सभेचें काम लांबल्यामुळे सभेच्या कामास ठरलेल्या वेळीं प्रारंभ करतां आला नाही याबद्दल कार्यकारी मंडळातर्फे खेद व्यक्त केला, व आवश्यक गणसंख्या असल्याचें सभेच्या निदर्शनास आणून दिल्यानंतर सभेच्या कामास सुरुवात झाल्याचें सांगितलें. सभेंत खालील कामें झालीं :—

(१) मागील वार्षिक साधारण सभा (११ अेप्रिल १९४१) व दोन विशेष साधारण सभा (ता. १६।११।४१ व १६।८।४२) यांचे वृत्तान्त वाचून अेकमतें मंजूर करण्यांत आले.

(२) खालील दुखवट्याचा ठराव सर्वांनी अुभें राहून संमत केलाः—

"१ श्री. दत्तात्रेय गोविंद सडेकर, २ श्री. रामचंद्र गोविंद कानडे, ३ श्रीमंत सरदार नारायणराव यशवंतराव मिरीकर, ४ ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, ५ श्री. भास्कर रामचंद्र तांबे, ६ श्री. लक्ष्मण गंगाधर काळे, ७ श्री. जगन्नाथ अेकनाथ नरवणे, ८ ह. भ. प. केशवराव देशमुख ९ श्री. रामराव मार्तंड भांबुरकर, १० श्री. मुकुंद गणेश मिरजकर अुर्फ कवि मुकुंदराय, ११ कॅ. गणेश वासुदेव मोडक, १२ श्री. शांताराम विठ्ठल मांजरेकर, १३ सौ. आनंदीबाअी किर्लोस्कर, १४ श्री. वैजनाथ लक्ष्मण पेंडसे, १५ पं. रामचंद्रशास्त्री किंजवडेकर, १६ श्री. रा. मु. मोहोळकर, १७ श्री. गोविंद नारायण दातार, १८ श्री. गोविंद हरि खरे, १९ विष्णु बाळकृष्ण महाडेश्वर, २० प्रो. रामचंद्र नारायण भागवत, २१ श्री. शंकर गजानन पुरोहित, २२ श्री. गोपाळ व्यंकटेश पाणंदीकर, २३ श्री. पुरुषोत्तम बापूजी खरे, २४ म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, २५ प्रो. महादेव रामचंद्र परांजपे, २६ श्री. बसलिंग अप्पा शेट्ये, २७ सौ. राजसबाअी आळंदकर, २८ श्री. शंकर बापूजी रानडे, २९ श्री. परशराम हरि यत्ते ३० श्री. सीताराम बाबाजी गुर्जर, ३१ कै. रवीन्द्रनाथ ठाकूर, ३२ कै. महादेवभाअी देसाअी अित्यादि जे साहित्यभक्त व साहित्यसेवक कालवश झाले त्यांच्या निधनाबद्दल या सभेस अतिशय दुःख होत आहे."

(३) यानंतर अि. स. १९४१ चें अितिवृत्त व हिशेब चिटणीस डॉ. अ. ना. मालेराव यांनी मंजुरीसाठी सभेपुढे मांडले. हें अितिवृत्त व हिशेब मंजूर करावेत अशी श्री. वा. शि. नाअीक यांनी सूचना केली. तीस श्री. रा. ने. शहा यांनी अनुमोदन दिल्यानंतर अितिवृत्त व हिशेब हीं सभेनें अेकमतें मान्य केलीं.

(४) नंतर "गतवर्षीचे हिशेबतपासनीस श्री. म. वि. गोखले, पुणें, व श्री. केतकर, मुंबअी, यांचे ही सभा आभार मानीत आहे व १९४२ या वर्षासाठी वरील दोघांची हिशेबतपासनीस म्हणून नेमणूक करीत आहे." असा ठराव श्री. कृ. गो. मराठे यांनी मांडला. त्यास श्री. चि. वि. आपटे यांनी अनुमति दिल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें मान्य झाला.

(५) सोलापूर येथील म. सा. संमेलनांतील ठरावांच्या अमलबजावणीचा टंकलिखित वृत्तान्त सभेस वाचून दाखवण्यांत आला. तो सभेने थोड्या फेरफारांसह सर्वानुमतें मान्य केला व नाशिक संमेलनास सादर करावा असें ठरविलें.

(६) यानंतर ता. १६ नोव्हेंबर १९४१ दिवशीं भरलेल्या विशेष साधारण सभेंतील ट्रस्टी व ट्रस्टविषयक कारभारासंबंधींचा ठराव विचारांत घेण्यांत आला. त्यावर चर्चा होऊन प्रा. वा. म. जोशी यांनी कार्यकारी मंडळातर्फे खालील ठराव मांडला :—

"ता. १६ नोव्हेंबर १९४१ रोजीं भरलेल्या विशेष साधारण सभेंत सूचना केल्याप्रमाणे कार्यकारी मंडळाने प्रि. ज. र. घारपुरे यांना तिसरे ट्रस्टी म्हणून काम करावें अशी विनंती केली आणि ती विनंती प्रि. घारपुरे यांनी मान्य केली म्हणून या साधारण सभेस आनंद होत आहे. ट्रस्टच्या कारभाराविषयी कार्य. मंडळाने तपशीलवार नियम करावे व तदनंतर नवीन मिळकती-वरून नवीन ट्रस्टडीड करणें अथवा जुनें विस्तारणें याची अिष्टता व व्यवहार्यता यांचा विचार करून आपला निर्णय संमतीकरता साधारण सभेपुढे ठेवावा."

हा ठराव सर्वानुमतें मान्य करण्यांत आला.

(७) म. सा. परिषदेच्या घटनानियम ९६मध्ये 'सभासदास' या शब्दापुढे कंसांत '१ ते ६ वर्षे' हे शब्द स्पष्टीकरणार्थ घालावेत ही नियामक मंडळाची शिफारस सभेने सर्वानुमतें मान्य करून घटनेंत त्याप्रमाणे दुरुस्ती करावी असें सर्वानुमतें ठरविलें.

(८) यानंतर अध्यक्षांच्या संमतीने पुढील नवीन कामांचा विचार झाला :—

[१] प्रो. दे. द. वाडेकर यांनी सांगलीहून ता. १६ आक्टोबर १९४२ (आ. क्र. सं. ११४८, १९।१०।४२) च्या पत्रांत वार्षिक साधारण सभेपुढे ठेवण्यासाठी पाठविलेला ठराव अध्यक्षांनी सभेस समग्र वाचून दाखविला. हा ठराव आपणांतर्फे प्रा. गं. गो. कानेटकर हे मांडतील असें प्रा. वाडेकर यांनी लिहिलें होतें, परंतु प्रा. कानेटकर यांस अध्यक्षांनी विचारलें असतां त्यांनी ठराव मांडला नाही. अध्यक्षांनी दुसरे कोणी हा ठराव मांडण्यास तयार आहे काय म्हणून सभेस विचारलें, परंतु कोणी पुढे आलें नाही. थोडी चर्चा झाल्यावर हा ठराव सभेपुढे कोणी मांडीत नाही सबब तो गळाला असें अध्यक्षांनी जाहीर केलें.

[२] यानंतर प्रा. गं. गो. कानेटकर यांनी पुढील ठराव मांडला :—

"म. सा. परिषदेची ही वार्षिक सभा परिषदेचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर, कार्याध्यक्ष प्रो. वा. म. जोशी, चिटणीस रा. सा. र. लु. जोशी व डॉ. अ. ना. भालेराव, खजिनदार प्रि. ध. रा. गाडगीळ, संपादक के. नारायण काळे व कार्यकारी मंडळांतील अितर सभासद यांनी परिषदेची जी सेवा केली तीबद्दल त्यांस साभार धन्यवाद देत आहे. या सर्वांचें सहकार्य अितःपरहि परिषदेस मिळावें अशी अिच्छा आहे."

यास श्री. रा. ने. शहा यांनी अनुमोदन दिल्यानंतर हा ठराव सर्वानुमतें मान्य करण्यांत आला.

(३) यानंतर कृ.गो.मराठे यांनी पाठविलेल्या ठरावाचा विचार सुरू झाला. ह्या ठरावास अवश्य त्या मुदतीची पूर्वसूचना दिली गेली नसल्यामुळे हा ठराव विचारांत घेतां येत नाही असा हरकतीचा मुद्दा (point of order) श्री. कृ. ग. लिमये यांनी अुपस्थित केला. यावर श्री. कृ. गो. मराठे यांनी हा ठराव आपण नियमाप्रमाणे सभेच्या आधी पंधरा दिवस चिटणीसां-

अनुक्रमणिका

कडे पाठविला असल्याचें सांगितलें व चिटणिसांनी श्री. मराठे यांनी निवेदन केलेली माहिती बरोबर असल्याचें अध्यक्षांच्या नजरेस आणल्यावर श्री. लिमये यांनी काढलेल्या मुदतीच्या हरकतीचा मुद्दा लागू होत नसल्याबद्दल अध्यक्षांनी निर्णय दिला. श्री. मराठे यांनी हा ठराव रीतसर मांडला व त्यास प्रा. रा. श्री. जोग यांनी अनुमोदन दिलें. या ठरावाचा विचार सभेने बेमुदत तहकूब ठेवावा अशी श्री. कृ. ग. लिमये यांनी सभेपुढे सूचना आणली व तीस श्री. वा. दा. गोखले यांनी अनुमोदन दिलें. या सूचनेवर मतें घेण्यांत आलीं, व ही सूचना १२ विरुद्ध ३ मतांनी सभेने मान्य केली.

सोलापूर येथील म. सा. संमेलनाच्या २५व्या अधिवेशनाच्या वृत्तान्ताच्या छापील प्रती तयार असल्याबद्दलची माहिती संमेलन कार्याध्यक्ष श्री. जक्कल व चिटणीस श्री. मुद्गल यांच्या विनंतीवरून अध्यक्षांनी सभेस निवेदन केली.

येणेंप्रमाणे कामें झाल्यानंतर सभेचें काम संपल्याचें अध्यक्षांनी जाहीर केलें.

---

## नियामक मंडळाची संमेलनानंतर संमेलनस्थळीं भरणारी दुसरी सभा

ही सभा ता. १।११।४२ दिवशीं रीतसर पूर्वसूचना देऊन संमेलनस्थळीं (चित्रमंदिर, नाशिक) रात्रौ ९॥ वा. भरविण्यांत आली. सभेस खालील सभासद उपस्थित होते :—

१ डॉ. अ. नां. भालेराव, २ प्रा. कृ. पां. कुलकर्णी, ३ प्रा. श्री. रा. पारसनीस, ४ प्रा. वि. भि. कोलते, ५ श्री. दि. वि. आमोणकर, ६ श्री. वा. दा. गोखले, ७ श्री. य. रा. दाते, ८ प्रा. वा. म. जोशी, ९ श्री. कृ. ग. लिमये, १० श्री के. नारायण काळे, ११ प्रा. द. वा. पोतदार.

सभेचें अध्यक्षस्थान प्रा. पोतदार यांनी स्वीकारल्यानंतर सभेने पुढील ठराव केले :—

"(१) नाशिक संमेलनांतील ठरावांच्या अंमलबजावणीची योग्य व शक्य ती व्यवस्था कार्यकारी मंडळाने करावी."

"(२) कार्यकारी मंडळाने झालेल्या अंमलबजावणीचा पहिला सहामाही वृत्तान्त नियामक मंडळास सादर करावा व नियामक मंडळाचा अभिप्राय समजावून घेऊन पुढील खटपट व कार्य करावें. वरील अभिप्राय नियामक मंडळाची जी सभा अंदाजपत्रकाच्या विचारासाठीं भरवावी लागते त्या सभेसहि जरूर सादर करण्यांत यावा."

"(३) घटना नियम ४९ अन्वये संपादकमंडळांत १ प्रा. द. वा. पोतदार, २ श्री. कृ. ग. लिमये, ३ श्री. श्री. म. वर्दे, ४ प्रा. वि. भि. कोलते व श्री. वा. रा. ढवळे ह्या सद्गृहस्थांचा समावेश व्हावा."

---

# परिषद्वार्ता



(चिटणिसांकडून)

मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर कार्यकारी मंडळाच्या ता. ३० ऑक्टोबर व १३ डिसेंबर या दिवशीं सभा झाल्या, पैकी ता. ३० ऑक्टोबर दिवशीं झालेली सभा संमेलन-प्रसंगीं नाशकास झाली. सोलापूर संमेलन ठराव अंमलबजावणीचा चिटणिसांनी तयार केलेला वृत्तान्त या सभेने मान्य केली व तो नियामक मंडळाची सभा व साधारण सभा यांच्यापुढे रीतसर जावा असें ठरविलें. १९४३ सालीं होणाऱ्या संमेलनासाठी सांगली येथील निमंत्रण स्वीकारण्याच्या प्रश्नाबद्दलहि सांगली येथील प्रतिनिधि प्रा. गं. गो. कानेटकर यांच्याशीं विचारविनिमय केला.

ता. १३ डिसेंबर दिवशीं झालेली सभा ही जुन्या कार्यकारी मंडळाची (१९४०-४२) शेवटचीच सभा असल्याने परिषदेच्या अध्यक्षासमवेत कार्यकारी मंडळाचें छायाचित्र घेण्यांत आलें. व खालीलप्रमाणे ठराव करण्यांत आले—

"(१) महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अनेक वर्षें ट्रस्टी आणि कांही वर्षें अुपाध्यक्ष आणि कार्याध्यक्ष असलेले मुंबअीचे प्रसिद्ध साहित्यिक आणि पत्रकार रा. ब. दामोदर गणेश पाध्ये यांस ता. ३ डिसेंबर १९४२ दिवशीं देवाज्ञा झाली याबद्दल कार्यकारी मंडळाची ही सभा दुःख प्रदर्शित करीत आहे. रा. ब. पाध्ये यांनी मराठी भाषेची लेखक या नात्याने मोठी सेवा केली असून महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक या नात्याने त्यांनी केलेलें कार्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाला अुल्लेखनीय वाटतें. रा. ब. पाध्ये यांच्या निधनामुळे परिषदेची व मराठी साहित्याची मोठी हानि झाली असून त्यांच्या कुटुंबीयांच्या दुःखांत कार्यकारी मंडळ सह-भागी आहे."

"(२) नागपूर येथील सुप्रसिद्ध विद्वान प्रोफेसर नीलकंठ बलवंत अुर्फ बापूसाहेब मवाळ-कर हे ता. ४ नोव्हेंबर १९४२ मंगळवारीं मृत्युवश झाले हें अैकून म. सा. परिषदेच्या कार्य-कारी मंडळास दुःख होत आहे. 'पद्यपद्माकर' आणि 'बहेन पिरोज' हीं त्यांचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध असून विविधज्ञानविस्तारादि वगैरे मासिकांत त्यांनी अनेक विषयांवर विस्तृत आणि मार्मिक लेख लिहिले होते. महानुभावीय वाङ्मयासंबंधीच्या संशोधनाची त्यांना विशेष आवड होती. त्यांच्या निधनामुळे त्यांच्या आप्तेष्टांस होणाऱ्या दुःखांत म. सा. परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

"(३) कै. नानासाहेब पावगी यांचे चिरंजीव रा. अण्णासाहेब पावगी ह्यांच्या निधनामुळे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळास दुःख होत आहे. पुणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचे संस्थापनेंत त्यांचें प्रमुख अंग होतें, आणि या संग्रहाल-याच्या चालकांपैकी ते अेक आस्थेवाअीक व प्रमुख होते. विद्येची त्यांना विशेष आवड असून अंगच्या सौजन्यामुळे ते सर्वांना प्रिय असत. त्यांच्या निधनामुळे मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या चालकांना व आप्तेष्टांना होणाऱ्या दुःखांत परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

**ट्रस्टी व ट्रस्टडीड विषयक**-- "कै. रा. ब. भाभे यांच्या निधनामुळे अुत्पन्न झालेल्या परिस्थितीचा विचार करून ट्रस्टी नेमणें, नवीन ट्रस्टडीड करणें, तद्विषयक पोट-नियम करणें अित्यादि बाबत कार्यकारी मंडळास शिफारशी करण्याबाबत पूर्वी नेमिलेल्या समिती-अैवजी पुढील समिति नेमण्यांत येत आहे— (१) प्रि. ज. र. घारपुरे, (२) प्रि. ध. रा. गाडगीळ (कार्यवाह), व (३) श्री. के. नारायण काळे."

जुन्या कार्यकारी मंडळाच्या वरील सभानंतर नवीन कार्य. मंडळाची (१९४३-४५) ता. २१ डिसेंबर दिवशीं विशेष सभा बोलाविण्यांत आली. सभेपुढे परिषद्-घटना नियम १९ अन्वये नवीन कार्यकारी मंडळासाठी दोन अधिक समासद स्वीकृत करणें हें काम होतें. सभेस आवश्यक ती गणसंख्या होती, परंतु अधिक समासद अुपस्थित राहण्याच्या दृष्टीने ही सभा तहकूब करून ता. २४ गुरुवारीं भरविण्यांत आली. या सभेंत श्री. गं. मा. निरंतर व प्रा. श्री. रा. पारसनीस यांस अधिक समासद म्हणून स्वीकृत करून घेण्यांत आलें.

या विशेष सभेनंतर नवीन कार्यकारी मंडळाच्या ता. ९ व ३० जानेवारी या दिवशीं सभा भरल्या. सभांत खालीलप्रमाणे कामें झालीं—

ता. ९ जानेवारी दिवशीं भरलेल्या सभेंत खालीलप्रमाणे कामें झालीं:—

(१) म. सा. परिषदेचे चिटणीस म्हणून श्री. के. नारायण काळे व श्री. वासुदेव दामोदर गोखले यांची व 'म. सा. पत्रिके'चे संपादक म्हणून प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग यांची निवड झाली.

(२) कै. प्रा. श्री. नी. चापेकर यांजबद्दल खालील दुखवट्याचा ठराव झाला—

"महाराष्ट्रांतील प्रसिद्ध साहित्यिक व वक्ते प्रा. श्री. नी. चापेकर यांनी मराठी भाषेची बहुमूल्य सेवा केली असून विशेषतः परकीय भाषांतील शब्दांना समर्पक व योग्य प्रतिशब्द योजण्याच्या बाबतींतील त्यांचें कौशल्य विलोभनीय होतें. त्यांच्या मृत्यूने मराठी भाषेची व साहित्याची मोठी हानि झाली आहे. त्यांच्या मृत्यूमुळे त्यांचे वृद्ध वडील व अितर आप्तेष्ट यांस होणाऱ्या दुःखांत परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

ता. ३० जानेवारी दिवशीं भरलेल्या सभेंत खालीलप्रमाणे कामें झालीं—

१ परिषदेचे अध्यक्ष प्रा. वामन मल्हार जोशी यांच्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त त्यांचा सत्कारसमारंभ करण्याच्या बाबतींत अितर साहित्यसंस्थांचें सहकार्य घेअून हा समारंभ घडवून आणण्याचें ठरविण्यांत आलें.

२ नाशिक येथील म. सा. संमेलनांत मान्य झालेल्या ठरावांची अंमलबजावणी कर-ण्याच्या दृष्टीने चर्चा झाली. मामुली स्वरूपाच्या ठरावांच्या अंमलबजावणीबाबत चिटणिसांस सूचना देण्यांत आल्या व महत्त्वाच्या ठरावांच्या अंमलबजावणीचें कार्य करण्यासाठी अेक अुप-समिति नेमण्यांत आली.

सभेचें काम बराच वेळ चालल्याने व तें न संपल्यामुळे ता. ३१ जानेवारी दिवशीं सकाळीं १० वाजतां पुन्हा सभा भरविण्यांत आली व खालील कामें झालीं—

३ माधवराव पटवर्धन साहित्य मंदिर भाड्याने देण्याबद्दल पुढील ठराव झाला—

"(१) विवाह, मौंजीबंधन अि० कार्यासाठी मंदिर भाड्याने देण्यांत येअूं नये. (२) मंदिरांत स्वयंपाक, चहा अि० करण्यास परवानगी देअूं नये. (३) परिषदेच्या हेतूंना व कार्यास विघातक अशा कार्यासाठी मंदिराचा अुपयोग करण्यांत येअूं नये.

भाड्यासंबंधी— (अ) परिषदेच्या संलग्न संस्थास प्रतिदिनीं रु. २, (आ) अितर साहित्यसंस्थांस प्रतिदिनीं रु. ३ व (अि) साहित्येतर संस्थांस प्रतिदिनीं किमान रु. ५ याप्रमाणे आकार असावा.'' मंदिर भाड्याने देण्याबाबतच्या निर्णयाचें व अिमारत डागडुजीचें काम अेका अुपसमितीवर सोपविण्यांत आलें.

४ परिषदेच्या निरनिराळ्या कार्यांसाठी खालीलप्रमाणे अुपसमित्या नेमण्यांत आल्या—

(१) अभ्यासक्रमसमिति (परिषदेच्या प्रथमा ते आचार्य या परीक्षांबाबत आलेल्या अभ्यासक्रमविषयक सूचनांचा विचार करून अभ्यासक्रम तयार करणें), (२) परीक्षासमिति (परिषदेच्या परीक्षांबद्दलची दैनंदिन कामकाजाची व्यवस्था पाहणें), (३) ट्रस्टडीड समिति (ट्रस्टी व ट्रस्टडीडविषयक प्रश्नांचा निर्णय करणें), (४) घटनासमिति (घटनेंत आवश्यक असलेल्या फेरफारांबद्दल सूचना करणें).

५ या समित्यांव्यतिरिक्त पूर्वी काम करीत असलेल्या व्याकरणसमिति व परिभाषासमिति या कायम करण्यांत झाल्या.

६ यानंतर चिटणिसांनी मांडलेल्या योजनांबाबत पुढील व्यवस्थेसाठी खालील अुपसमित्या नेमण्यांत आल्या—

(१) प्रकाशनसमिति (परिषदेतर्फे करावयाच्या प्रकाशनाची योजना, व्यवहार्यता, अिष्टता अित्यादींचा विचार करणें), (२) व्याख्यानयोजनासमिति (व्याख्यान, ग्रंथचर्चा अित्यादींबद्दल योजना करणें), (३) शैक्षणिक संस्था सहकार्य समिति (विद्यालयें, महाविद्यालयें अित्यादि शैक्षणिक संस्थांतील मराठीचें शिक्षण, मराठी भाषा, वाङ्मयाभ्यास अित्यादींबद्दल योजना–सूचना करणें; या संस्थांतील वाङ्मयमंडळांशीं परिचय करून घेणें, सहकार वाढविणें), (४) वाङ्मयेतर सांस्कृतिक कलांचा परामर्श घेणाऱ्या संस्थांशीं सहकार्य व संयोजन करण्यासाठीहि अेक अुपसमिति नेमण्यांत आली.

७ दुखवट्याचे खालील ठराव करण्यांत आले —

''(१) डॉ. विष्णु सीताराम सुकथनकर हे ता. २१ जानेवारी १९४३ दिवशीं कालवश झाले याबद्दल कार्यकारी मंडळाच्या या सभेस अत्यंत दुःख होत आहे. डॉ. सुकथनकर हे अनेकभाषाकोविद व संस्कृतभाषापंडित असून प्राच्यविद्यासंशोधक या नात्याने त्यांनी आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळविली होती. त्यांच्या या गुणांमुळे भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमंदिराने योजलेल्या जगप्रसिद्ध राष्ट्रीय महत्त्वाच्या महाभारतसंशोधन कार्याचें नेतृत्व त्यांजकडे आलें, व या महाग्रंथाचे ते प्रमुख संपादक होते. त्यांच्या निधनाने प्राच्यविद्यासंशोधनक्षेत्रांतील अेक गाढ विद्वान नाहींसा झाला. त्यांच्या निधनामुळे त्यांच्या आप्तस्वकीयांस होणाऱ्या दुःखांत परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे.''

''(२) सुप्रसिद्ध नाटककार, नट व चित्रपटकथालेखक श्री. विष्णु हरि औंधकर हे ता. १५ डिसेंबर १९४२ दिवशीं कालवश झाले. श्री. औंधकर हे अेकेकाळीं मराठी रंगभूमीवरील पहिल्या प्रतीचे नट म्हणून ओळखले जात असून पुढे चित्रपटकथालेखक व चित्रपटसृष्टींतील नट म्हणून त्यांनी लौकिक संपादन केला होता. त्यांचीं 'बेबंदशाही' व 'आग्र्याहून सुटका' हीं नाटकें प्रयोगदृष्ट्या अत्यंत यशस्वी होत. 'सावकारी पाश' व 'भरतभेट' या त्यांच्या चित्रपटकथा संस्मरणीय आहेत. त्यांच्या मृत्यूमुळे मराठी नाट्य व चित्रपटसृष्टींची मोठी हानि झाली असून त्यांच्या आप्तस्वकीयांस होणाऱ्या दुःखांत परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे.''

"(३) मुंबअी येथील सुप्रसिद्ध वैद्य श्री. आप्पाशास्त्री साठे यांच्या निधनामुळे परिषदेच्या कार्यकारी मंडळास खेद होत आहे. आयुर्विद्येसंबंधी साधार माहिती लोकांत प्रसृत व्हावी व त्या विषयाची चर्चा व्हावी या हेतूने 'आयुर्वेद' या नांवाचें मराठी मासिक त्यांनी बरींच वर्षे चालविलें होतें. त्यांच्या मृत्यूमुळे त्यांच्या आप्तस्वकीयांस होणाऱ्या दुःखांत परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

"(४) पुणें येथील सुप्रसिद्ध नागरिक व प्राच्यविद्याभ्यासक डॉ. नरहर गोपाळ सरदेसाअी हे ता. २२ जानेवारी १९४३ दिवशीं कालवश झाले. डॉ. सरदेसाअी यांनी जावा, सुमात्रा अित्यादि ठिकाणीं प्रवास केला होता व तेथील रामायणाची हिंदी रामायणाशीं तुलना करून त्यांनी अनेक चिकित्सक लेख लिहिले होते. त्यांच्या कैलास-मानस-सरोवरापर्यंतच्या यात्रांचे वर्णनात्मक लेखहि केसरींतून प्रसिद्ध झालेले आहेत. पुणें येथील जगप्रसिद्ध डॉ. भांडारकर प्राच्यविद्यासंशोधकमंदिरस्थापनेंत त्यांचा भाग असून प्राच्यविद्याविषयक संशोधन व ग्रंथप्रकाशन या बाबतींत त्यांनी मोठी कामगिरी केली आहे. त्यांच्या निधनामुळे परिषदेच्या कार्यकारी मंडळास दुःख होत असून त्यांच्या आप्तस्वकीयांस होणाऱ्या दुःखांत मंडळ सहभागी आहे."

**संमेलन**— म. सा. संमेलनाचें २६ वें अधिवेशन नाशिक येथे ता. ३०, ३१ ऑक्टोबर व १ नोव्हेंबर या दिवशीं सुप्रसिद्ध नाटककार व विनोदी लेखक आचार्य प्र. के. अत्रे यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वी रीतीने पार पडलें. संमेलनाने अेकूण १९ ठराव संमत केले असून ठराव अंमलबजावणीसाठी कार्यकारी मंडळाने निरनिराळ्या अुपसमित्या नेमल्या असून त्यांच्या कामाचा वृत्तान्त पुढील अंकीं देण्याची व्यवस्था होअील.

सोलापूर संमेलनाचा अहवाल तेथील स्वागतमंडळाने छापून प्रसिद्ध केला असून नाशिक संमेलनप्रसंगीं तो परिषदेच्या वार्षिक साधारण सभेस अवलोकनार्थ संमेलनकार्याध्यक्षांकडून सादर करण्यांत आला होता.

**निवडणुकी**— नियामक मंडळांत निवडून आलेल्या सभासदांची यादी मागील अंकीं प्रसिद्ध करण्यांत आली आहेच. तदनंतर स्वीकृत सभासदांची निवडणूक होअून पुढील सभासद स्वीकृत म्हणून निवडून आले— (१) श्री. पुरुषोत्तम मंगेश लाड, बेळगांव; (२) प्रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी, नागपूर; (३) सौ. प्रो. कुसुमावती देशपांडे, नागपूर; (४) प्रा. श्रीपाद रामचंद्र पारसनीस, पुणें; (५) श्री. वासुदेव दामोदर गोखले, पुणें; (६) श्री. गणपत सखाराम राजाध्यक्ष, पुणें; (७) प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार, पुणें; (८) दि. ब. काशीनाथ नारायण दीक्षित, नवी दिल्ली; (९) प्रा. देविदास दत्तात्रेय वाडेकर, सांगली; (१०) डॉ. रामकृष्ण गणेश हर्षे, पुणें.

वरीलप्रमाणे सभासदस्वीकृतीनंतर नवीन कार्यकारी मंडळाची निवडणूक होअून पुढील सभासद निवडून आले—(१) श्री. विठ्ठल दत्तात्रय घाटे, (२) श्री. के. नारायण काळे, (३) श्री. कृष्णाजी गणेश लिमये, (४) डॉ. अमृत नारायण मालेराव, (५) प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग, (६) प्रा. श्री. नारायण बनहट्टी, (७) श्री. वासुदेव दामोदर गोखले व (८) प्रा. डॉ. नरहर काशीनाथ घारपुरे.

**परीक्षा**— प्रतिवर्षाप्रमाणे प्राज्ञ व विशारद या परीक्षा डिसेंबर १९४२ मध्ये घेण्यांत आल्या. मुंबअी, पुणें, नागपूर या कायमच्या केंद्रांशिवाय जळगांव, पंढरपूर, हैदराबाद, औरंगाबाद, मोमीनाबाद ह्या ठिकाणीं केंद्रें स्थापन करण्यांत आलीं. प्राज्ञ परीक्षेसाठी १०१

व विशारदेसाठी २६ याप्रमाणे अुमेदवारांकडून अर्ज आले होते. प्राज्ञ परीक्षेस ९३ व विशारद परीक्षेस २२ याप्रमाणे अुमेदवार अुपस्थित होते. पैकी प्राज्ञ परीक्षेत ५८ व विशारदेंत सर्व अुमेदवार अुत्तीर्ण झाले. यशस्वी झालेले अुमेदवार खालीलप्रमाणे—

## विशारद परीक्षा

**पुणें केंद्र**— १ माधव गोविंद कडे*, २ चिंतामण यादव चौधरी*, ३ विष्णु यशवंत जोशी*, ४ विठ्ठल नारायण ठकार, ५ श्रीपाद दामोदर पंडित, ६ वसंत हरिभाअू पाठक*, ७ सरोजिनी नारायण पाठक*, ८ दत्तात्रेय धोंडो पानसे, ९ विमल दत्तात्रय साने, १० रघुनाथ विनायक हेरवाडकर*, ११ भिकू नाना सावळे. **जळगांव केंद्र**— १२ देवराम कृष्ण वढे. **पंढरपूर केंद्र**— १३ त्र्यंबक शिवराम देशपांडे. **हैद्राबाद केंद्र**—१४ आनंदीबाअी कुंटे, १५ सुधा रामचंद्र डोंगरगांवकर, १६ कल्याण नारायण तडवलकर, १७ नीलकंठ कृष्ण देशमूख, १८ नरहर शेषराव पोहनेरकर*. **मुंबअी केंद्र**— १९ दिगम्बर महादेव ओक, २० वसंत शंकर कुलकर्णी, २१ दामोदर श्रीधर देवकुळे, २२ दत्तात्रय नारायण बापट.

## प्राज्ञ परीक्षा

**पुणें केंद्र**— १ गजानन गंगाधर अेरंडे, २ विनायक शंकर कडेकर, ३ मोरेश्वर मारुती कानडे, ४ लक्ष्मीबाअी पुरुषोत्तम गुर्जर, ५ प्रमिला केशव गोखले, ६ यशवंत शंकर गोडबोले, ७ मधुसूदन गोपाळ चंद्रचूड*, ८ व्यंकटेश कृष्णाजी चांदेकर*, ९ हनुमंत रामचंद्र चितळे, १० मुकुंद बुधाजी चुरी, ११ केशव श्रीधर जोगळेकर, १२ वासुदेव विश्वनाथ जोशी, १३ विनायक शंकर ढवळे, १४ नारायण यशवंत ढेकणे, १५ सीता राजाराम तत्रीव, १६ जगन्नाथ शंकर दीक्षित, १७ अच्युत मोरेश्वर देशपांडे, १८ देविदास शंकर देशमूख, १९ रघुनाथ रामकृष्ण देवधर*, २० अुमाजी विठोबा नवले, २१ धोंडो दत्तात्रेय नाबर, २२ सहदेव महादेव प्रभु, २३ केशव काशीनाथ बापट, २४ पुरुषोत्तम श्रीपाद भट, २५ लक्ष्मण चिंतामण लाटकर, २६ बाबुराव मारुती शिंदे*, २७ महादेव विष्णु सहस्रबुद्धे, २८ गोपाळ कृष्ण सिनकर, २९ लीला काशीनाथ सोहनी. **नागपूर केंद्र**— ३० धनपाल बळवंत गुंडे*, ३१ धन्यकुमार गंगासा भेरे. **जळगांव केंद्र**— ३२ पोपट धना तळेले, ३३ नारायण राजाराम भावे, ३४ भगीरथ बाबुराव शिंपी. **मोमिनाबाद केंद्र**— ३५ रामचंद्र हरि अयाचित, ३६ प्रल्हाद गोपाळराव रामदासी, ३७ विनायक वैजनाथराव रामपूरकर, ३८ नीलकंठ लक्ष्मणराव वालुजकर. **औरंगाबाद केंद्र**— ३९ नरहर माणिकराव कुलकर्णी, ४० सदाशिव मार्तंड गर्गे. **हैदराबाद केंद्र**—४१ कृष्ण शंकर चौधरी, ४२ नागेश गणेश दिवाण, ४३ विठ्ठल भाअूराव पाठक, ४४ अहिल्या मणूरकर, ४५ विश्वंभर रायखेलकर, ४६ दिगंबर विश्वनाथ लाखकर. **पंढरपूर केंद्र**—४७ रघुनाथ माधव केसकर, ४८ प्रभावती नृसिंह केसकर, ४९ सुशिला माधव केसकर, ५० नरहरि दत्तात्रेय घुगरदरे, ५१ यमुना त्रिंबक देशमूख, ५२ शामराव नरहर परांडकर, ५३ अनंत चिंतामण पाठक, ५४ आनंद अिच्छाराम भारम्बे. **मुंबअी केंद्र**— ५५ वीरेंद्र द्वारकादास अढिया, ५६ हरी कृष्ण गुर्जर*, ५७ शंकर चिंतामण धर्माधिकारी, ५८ तुकाराम तानाजी सावंत*.

(* अशी खूण असलेले अुमेदवार दुसऱ्या कक्षेत अुत्तीर्ण झाले आहेत)

याकामीं त्या त्या ठिकाणचें केंद्राधिकारी व परीक्षक यांजकडून परिषदेस जें बहुमोल साहाय्य झालें त्याबद्दल परिषद् त्यांची ऋणी आहे.

**शाखा सभा वृत्त**— मध्यप्रांत शाखा सभा, नागपूर, या परिषदेच्या शाखा सभेने प्रि. दा. के. ओक यांच्या अध्यक्षतेखाली नागपूर येथील सुप्रसिद्ध विद्वान व महानुभावी वाङ्मयसंशोधक कै. प्रा. नी. व. अुर्फ बापूसाहेब भवाळकर यांजबद्दल दुखवट्याची जाहीर सभा घेतली. कै. भवाळकर यांच्या शोकजनक निधनाने अेक विद्वान प्राध्यापक, मार्मिक समीक्षक, सखोल संशोधक व शिक्षणविषयक आणि वाङ्मयात्मक चळवळींशीं दृढ संबंध ठेवणारे सद्‌गृहस्थ नाहीसे झाले असून त्यांच्या निधनामुळे मराठी वाङ्मयाची मोठी हानि झाली असल्याबद्दल सभेंत श्री. नेने, प्रा. डॉ. पेंडसे, प्रा. पंडित, प्रा. डॉ. देशमूख वगैरे वक्त्यांनी सांगितलें.

कै. प्रा. श्री. नी. अुर्फ बापूसाहेब चापेकर यांजबद्दलहि दुखवट्याचा ठराव सभा घेअून करण्यांत आला.

**अितर**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे विश्वस्त (ट्रस्टी) मुंबअीचे कै. रा. ब. दामोदर गणेश पाध्ये यांच्या निधनानिमित्त दुःख व्यक्त करण्याकरितां परिषदेच्या सदस्यांची व हितचिंतकांची जाहीर सभा मे. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या परवानगीने ता. ३ जानेवारी १९४३ रोजीं माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरात भरली होती. प्रा. वामनराव जोशी अध्यक्षस्थानीं होते. त्यांनी आपल्या भाषणांत कै. रा. ब. पाध्ये यांनी केलेल्या साहित्यिक कामगिरीची माहिती दिली. ते म्हणाले, “रा. ब. पाध्ये यांची नवीन पिढीला तितकीशी माहिती नाही. राजकारणांत ते नेमस्त पक्षाचे होते आणि अिंदुप्रकाशचे संपादक या नात्याने त्यांनी आपल्या काळांत पुष्कळच कार्य केलें आहे. मराठीप्रमाणेच अिंग्रजी भाषेचे प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केलें. विशेषतः साहित्य-परिषदेचे विश्वस्त म्हणून केलेल्या कार्यामुळे परिषदेला त्यांनीं अुपकृत केलें आहे. परिषदेच्या कायम-निधीची त्यांनी केलेली आस्थापूर्वक जोपासना विशेष कौतुकास्पद आहे.” श्री. नी. शं. नवरे यांनी दुखवट्याचा ठराव वाचून दाखविला आणि मुंबअी कॉर्पोरेशनच्या स्कूल कमिटीचे अध्यक्ष असतांना मुंबअींतील प्राथमिक शिक्षकांचा पगार वाढविण्यासंबंधी रा. ब. पाध्ये यांनी केलेल्या यशस्वी प्रयत्नाची माहिती सांगितली. प्रि. कृ. म. खाड्ये आणि प्रा. डॉ. नै. का. घारपुरे यांचींहि भाषणें झालीं. त्यानंतर प्रा. रा. श्री. जोग आपल्या भाषणांत म्हणाले, “आतापर्यंत ज्यांचीं भाषणें झालीं त्यांच्यापेक्षा रा. ब. पाध्ये यांजबरोबर माझा निकटचा संबंध आलेला होता. नाशिक येथील कॉलेजमध्ये रा. ब. पाध्ये हे माझे पांच-सहा वर्षे सहकारी होते. व्यक्ति या नात्याने त्यांचें वर्णन करावयाचें तर त्यांचा दुर्दमनीय अुत्साह हा पहिला गुण सांगतां येअील. तरुणांनासुद्धा लाजविणारा त्यांचा अुत्साह साठीच नव्हे तर सत्तरी अुलटल्यावरहि कायम होता. त्यांची खिलाडू वृत्तीहि मोठी वाखाणण्यासारखी होती. त्यांच्या सहवासांत वयांतील अंतर आम्ही तेव्हाच विसरत होतों. या त्यांच्या वृत्तीमुळेच विद्यार्थिवर्गांतहि ते प्रिय असत.” सर्वांनी अुभे राहून ठराव मान्य केल्यावर सभेचें काम संपलें.

ता. ४ जानेवारी दिवशीं परिषदेचे अेक आश्रयदाते श्रीमंत राजेसाहेब बाळासाहेब पंत-प्रतिनिधि यांनी चिटणिसांच्या विनंतीवरुन परिषदेने बांधलेल्या ‘माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरा’स भेट दिली व ‘मंदिर’ पाहून समाधान व्यक्त केलें.

म. सा. प. (१६-१-१३)

## नवीन सभासद

### तहहयात सभासद

१ श्री. रामचंद्र नारायण वळे पुणें
२ ,, धुं. गो. विनोद पुणें
३ सौ. यमुनादेवी शहाणे नागपूर

### साधारणांतून तहहयात

१ श्री. मोहन ज्ञानेश्वर शहाणे नागपूर
२ ,, दत्त गणेश काळे पारनेर

### साधारण सभासद

१ श्री. दिनानाथ बापूजी मंगुडकर अहमदनगर
२ ,, गोपाळ दिगंबर मालवणकर पंढरपूर
३ कु. कमल परांजपे रत्नागिरी
४ प्रा. सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर दादर
५ श्री. गजानन गंगाधर अेरंडे सातारा
६ ,, शंकर रामचंद्र जोशी मंदुरबार
७ श्री. रमेश नाडकर्णी मुंबअी
८ ,, श्रीधर वामन देवभर अहमदाबाद
९ ,, यशवंत शंकर गोडबोले पुणें
१० ,, वासुदेव विष्णु मट मुंबअी
११ ,, गोविंद गणेश जोशी पुणें
१२ डॉ. नारायण गोपाळ भदे ,,
१३ प्रा. मट मुंबअी
१४ श्री. वा. ल. कुलकर्णी ,,
१५ ,, विनायक व्यंकटेश वैद्य सांगली
१६ ,, कृष्णाजी श्रीवल्लभ शिराळकर ,,
१७ ,, त्र्यंबक गोविंद माअीणकर ,,
१८ ,, अच्युत गोविंद रानडे पुणें
१९ प्रा. केशव विश्वनाथ हेर्लेकर ,,
२० श्री. शांताराम कृष्ण क्षीरसागर ,,
२१ ,, मल्हारराव नारायण झोळ ,,
२२ ,, राम हरि अयाचित मोमीनाबाद
२३ ,, अेकनाथ माधव कुलकर्णी ,,
२४ ,, नरहर गंगाधरराव गोरे ,,
२५ ,, प्रल्हाद गोपाळ रामदासी ,,
२६ ,, विनायक वैजनाथ रामपूरकर ,,
२७ ,, निळकंठ लक्ष्मण वाळुजकर ,,

---

## 'माधवराव पटवर्धन साहित्यमंदिरा'चें अुद्घाटन

महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध पंडितकवि कै. डॉ. माधवराव् पटवर्धन यांचें स्मारक म्हणून बांधण्यांत आलेल्या 'माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरा'चें अुद्घाटन फलटणसंस्थानाधिपति मेजर श्रीमंत राजे सर मालोजीराव नाअीक निंबाळकर यांच्या हस्तें ता. ३० नोव्हेंबर १९४२ दिवशीं सायंकाळीं ६ वाजतां करण्यांत आलें. या समारंभास श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत सौ. मातुश्री लक्ष्मीदेवी राणीसाहेब, फलटण संस्थानचे दिवाण रा. सा. के. वि. गोडबोले व अितर प्रमुख नागरिक हजर असून अेकूण अुपस्थितांची संख्या ३००-४०० वर होती. 'मंदिर' व 'मंदिरा'च्या भोवतालची जागा पताकांनी शृंगारली असून मंदिराच्या प्रवेशद्वारा-

पुढे कांही अंतरावर अेक भव्य कमानहि अुभारली होती. श्रीमंत राजेसाहेबांचें आगमन होतांच त्यांचें व श्री. सौ. राणीसाहेब यांचें परिषदेचे व स्मारकसमितीचे अध्यक्ष श्री. न. चिं. अुर्फ तात्यासाहेब केळकर यांनी स्वागत केलें व समारंभास अुपस्थित असलेल्या स्मारकसमितींतील सभासदांचा व परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या सभासदांचा श्रीमंत राजेसाहेब व सौ. राणीसाहेब यांस परिचय करून दिला. नंतर श्रीमंत राजेसाहेब व सौ. राणीसाहेब यांचें सभासदांसमवेत प्रदेशद्वारीं छायाचित्र घेण्यांत आलें व श्रीमंत राजेसाहेब व श्री. सौ. राणीसाहेब यांनी नियोजित स्थान स्वीकारलें. प्रारंभीं महाराष्ट्र गर्ल्स अेज्यु. सोसायटी हायस्कूलमधील मुलींनी अीशस्तवनपर व स्वागतपर पद्यें म्हटल्यानंतर स्मारकसमितीचे चिटणीस श्री. गो. ग. तळवलकर यांनी समारंभास शुभचिंतनपर संदेश पाठविणाऱ्यांचीं नांवें वाचलीं व परिषदेचे व स्मारकसमितीचे चिटणीस रा. सा. र. लु. जोशी यांनी समितीच्या कार्याचें 'निवेदन' वाचून दाखविलें. यानंतर स्मारकसमितीचे दुसरे चिटणीस श्री. गिरीश यांनी श्री. श्री. वि. आपटेकृत 'रणझुंझार' ही कविता गाअून दाखविली व श्री. गजाननराव वाटवे यांनी 'माझ्या हृदयांत तूंच राणी' व 'जीव तूझा लोभला' हे कै. माधव जूलियनांचे गजल अत्यंत तन्मयतेने गाअून दाखविले. श्री. तात्यासाहेब केळकर यांनी कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांची थोरवी वर्णन करून हें मंदिर अुभारण्याचें श्रेय रा. सा. र. लु. जोशी व डॉ. पटवर्धनांचे परमस्नेही श्री. वि. द. घाटे यांजकडे प्रामुख्याने असल्याचें सांगितलें व श्रीमंत राजेसाहेब यांस पुष्पहार घालून 'मंदिरा'चें रीतसर अुद्घाटन करण्यास विनंती केली.

श्रीमंत राजेसाहेबांनी 'मंदिरा'चें औपचारिक अुद्घाटन झाल्याचें जाहीर केलें व आपलें छापील अध्यक्षीय भाषण वाचून दाखविलें. आपल्या भाषणांत श्रीमंत राजेसाहेब यांनी कै. माधवराव पटवर्धन यांची अभिजात कवि व पंडित या दोन्ही नात्यांनी योग्यता वर्णन करून त्यांस प्राप्त झालेली प्रतिकूल परिस्थिति व त्यांजवर झालेले टीकाकारांचे अनुचित प्रहार यांमुळे त्यांच्या सहज गुणांस अुजळाच मिळाला असल्याचें सांगितलें. स्मारकसमितीच्या निवेदनांतील माहितीप्रमाणे स्मारकसमितीने अेकंदर स्मारकाची आंखलेली योजना योग्य असून हल्लीच्या परिस्थितींत 'मंदिरा'स आलेला खर्च अपरिहार्य असल्याचें मान्य केलें व द्रव्यसाहाय्य मिळविण्याबाबत स्मारकसमितीने केलेल्या प्रयत्नांबद्दल समितीस धन्यवाद देअून समितीने स्वीकारलेल्या आर्थिक भाग आपणांस शक्य तेवढा अुचलूं असें आश्वासन दिलें. मराठी भाषेचें वैभव वाढविण्यासाठीं डॉ. पटवर्धन यांच्याप्रमाणे आपणा सर्वांच्याकडून प्रयत्न होवो अशी आशा व्यक्त करून आपलें भाषण संपविलें.

यानंतर प्रा. द. वा. पोतदार यांनी समयोचित आभार मानले व श्री. तात्यासाहेब केळकर यांस पुष्पहार अर्पण केला. यानंतर 'बहु असोत सुंदर संपन्न कीं महा' हें कै. श्रीपाद कृष्णांचें महाराष्ट्रगीत मुलींनी गायिल्यानंतर या अुद्घाटनसमारंभाची समाप्ति झाली.

---

अनुक्रमणिका

# कै. रा. ब. दामोदर गणेश पाध्ये

कोणी कांही म्हणो, कांही वेळाच अशा येतात की त्या वेळीं अशुभाचीच कृष्णछाया अेखाद्या समाजावर घनदाट पसरते. सांप्रतच का पाहा ना, महाराष्ट्रांतील कोणातरी कर्त्या माणसाच्या मृत्यूची अशुभ वार्ता कानीं पडल्याशिवाय पंधरवडा कांही सुना जात नाही ! आपल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेचे प्रथमपासूनचे अेक विश्वस्त रा. ब. दामोदर गणेश पाध्ये हे वयाने वृद्ध असले तरी मृत्यु त्यांच्या अितका समीप आला होता असें तो त्यांना प्रत्यक्ष घेअून जाअीपर्यंत कोणासहि क्वचितच वाटलें असेल. ता. ३ डिसेंबर १९४२ रोजीं माटुंगा येथे त्यांच्या 'काशीकेतन' बंगल्यांत त्यांचा मृत्यु घडून आला. अगदी अलीकडे त्यांनी मुंबअीच्या अुपनगरांत कांही नवीन शाळा चालविण्याच्या कामांत आपलें मन गुंतविलें होतें. त्यांच्या सार्वजनिक आयुष्याला सुरुवात झाली त्या वेळीं ते अेल्फिन्स्टन कॉलेजांत अेक अध्यापकच होते. पुढे मुंबअी येथील गोकुळदास तेजपाल हायस्कूलचे प्रिन्सिपल म्हणून त्यांनी बरींच वर्षें काम केलें. सदरील हायस्कूलमधून निवृत्त झाल्यावर ते मुंबअी नगरपालिकेंतील शिक्षासमितीचे मंत्री होते. तेथून निवृत्त झाल्यावर नाशिक येथील हंसराज प्रागजी ठाकरसी महाविद्यालयाचे अध्यापक म्हणून त्यांनी कांही दिवस काम केलें. आणि त्यानंतर वर अुल्लेखिल्याप्रमाणे त्यांनी माटुंगा येथे अध्यापनाचें कार्य चालविलें होतें. यावरून पाध्ये हे मुख्यतः अध्यापनाच्या व्यवसायांत आयुष्यभर रमलेले होते असें म्हणण्यास चिंता नाही.



प्रथमपासून रावबहादुरांची बुद्धि तरतरीत होती. त्यांचा जन्म जरी पुण्यास झाला असला तरी त्यांचें बहुतेक आयुष्य मुंबअींतच गेलें आणि सार्वजनिक कामाची जात्याच हौस असल्यामुळे मुंबअींतील विविध क्षेत्रांतील चळवळींशीं पाध्ये यांचा बराच संबंध आला. मुंबअीचे 'अनभिषिक्त राजे' किंवा मुंबअीचे 'सिंह' ही यथार्थ प्रख्या पावलेले सर फिरोजशहा मेहता यांच्या प्रभावळींतील अेक अेकनिष्ठ कार्यकर्ते म्हणून पाध्ये ओळखले जात. याच नात्याने त्यांच्याकडे मुंबअींतील मेहता-गोखलेपक्षीय 'अिंदुप्रकाश' पत्राच्या संपादकाचें

काम बरेंच वर्षें होतें. या पत्राच्या अिंग्रजी बाजूचें लेखन पाध्ये करीत. सरकारानेहि 'रावबहादुर' ही पदवी देअून व मुंबअीस असतांना कांही वर्षें 'जस्टिस ऑफ दी पीस'च्या वर्गात त्यांना दाखल करून त्यांचा बहुमान केला होता. ते मुंबअीच्या युनिव्हर्सिटीमध्येहि सभासद नेमले जात असत आणि मराठीचे परीक्षक म्हणूनहि त्यांची अेम्. अे. परीक्षेत योजना होत असे.

मुंबअींत सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर आणि वऱ्हाडांत रा. ब. विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्याशीं पाध्ये यांचा निकट संबंध होता आणि वरील तिन्ही गृहस्थ ज्या कऱ्हाडे पोटजातींत मोडत त्या कऱ्हाडे ब्राह्मण जातीविषयी पाध्ये यांस जिव्हाळा वाटत असे. म्हणूनच ते मुंबअीच्या कऱ्हाडे ब्राह्मणसंघांत अुत्साहाने लक्ष घालीत. पाध्ये यांच्या पूर्वीच्या पिढींतील मुंबअींतील प्रसिद्ध आणि तेजस्वी पुढारी कै. ना. विश्वनाथ नारायण मंडलिक यांच्या घराण्याशींहि पाध्ये यांचा घरोब्याचा संबंध होता; आणि मंडलिकांच्या भाषणाचें व लेखनाचें जें पुस्तक सन १८९६ त त्यांच्या चिरंजीवांनी प्रसिद्ध केलें त्याला मंडलिकांच्या अिंग्रजींत लिहिलेल्या छोट्या पण सुरस चरित्राची जोड पाध्ये यांच्या कलमानेच प्राप्त झालेली आहे.

मराठी साहित्याविषयी म्हणावयाचें तर पाध्ये यांचा संबंध अिंदुप्रकाश, विविधज्ञानविस्तार, मुंबअी मराठी ग्रंथसंग्रहालय आणि महाराष्ट्र साहित्य परिषद् या संस्थांशीं मुख्यत्वें होता. ते अधूनमधून कांही मराठी कविता लिहून प्रसिद्ध करीत असत किंवा क्वचित् अेखादा लेखहि मराठींतून लिहीत असत. परंतु गद्य किंवा पद्य या दोन्ही शाखांत नांव घेण्याजोगी विशेष निष्पत्ति पाध्ये यांच्या हातून झालेली नाही. त्यांचें लिहिणें क्लिष्ट, बोजड आणि रूक्ष असे, तथापि सांगण्यासारखे कांही मुद्दे त्यांचेजवळ नेहमी तयार असत आणि जुन्या तऱ्हेच्या प्रौढ अिंग्रजी भाषेंतून ते त्यांची मांडणी स्वभाषेपेक्षाहि लीलेने आणि तत्परतेने करीत. अिंग्रजी व्याख्यानें देण्याचाहि त्यांना अधूनमधून योग येअी.

पुण्यास कै. वासुदेवराव आपटे प्रभृतींनी महाराष्ट्र साहित्य संमेलनें भरवून जो अुद्योग चालविला होता त्यांत कै. रा. ब. महाजनी यांचें पहिल्यापासूनच लक्ष होतें आणि १९०७ सालच्या संमेलनाचे ते अध्यक्षहि होते. पाध्ये हे महाजनींचे निकटचे आप्त होते आणि महाजनींच्या या वृद्धापकाळीं साहित्यपरिषदेच्या आणि संमेलनांच्या अुद्योगांत पाध्यांनी आपल्या वृद्ध मामांना त्यांच्याबरोबर वागून पुष्कळ साहाय्य दिलें. पुढे जेव्हा १९१२ सालीं अकोला येथे महाराष्ट्र साहित्य संमेलनाची बैठक भरली आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे नियम तयार झाले त्या वेळीं रा. ब. महाजनी हे परिषदेचे पहिले अध्यक्ष व रा. ब. पाध्ये हे अेक अुपाध्यक्ष म्हणून जोडीने पदारूढ झाले. या वेळेपासून कार्याध्यक्ष, कार्योपाध्यक्ष अशा कोणत्यानाकोणत्या तरी पदावर रा. ब. पाध्ये हे १९२७ सालापर्यंत होते. या काळांत परिषदेचा कारभार पुष्कळ अंशीं पाध्ये यांच्या तंत्राने चालत असे. १९१७ सालीं अिंदूर संमेलनाच्या प्रसंगीं श्रीमन्महाराज होळकर यांजकडून मिळालेली १०००० रु.ची मोठी देणगी परिषदेच्या हातीं आली आणि पाध्ये यांनी कायदेशीर ट्रस्टडीड (निधिपत्र) करून ती रक्कम गुंतविली व परिषदेला अेक कायमचें अुत्पन्न मिळण्याची व्यवस्था झाली. तेव्हापासून रा. ब. पाध्ये या निधीचे अेक विश्वस्त (ट्रस्टी) या नात्याने आमरण काम पाहत होते. या निधीची व्यवस्थाहि वस्तुतः पाध्ये यांच्याच हातीं होती आणि तो त्यांनी अत्यंत दक्षतेने राखून व्याजहि निधींत मिळवून त्याची वाढ केली. अर्थात् यामुळे

परिषदेची कांही अंशीं अुपासमार झाली तरीहि आपली कृपणनीति पाध्ये यांनी सोडली नाही. लोकांची अप्रीति झाली तरी तीहि सोसण्यास त्यांनी मागेपुढे पाहिलें नाही. अेखाद्या वृद्ध पित्याला ज्याप्रमाणे आपलीं मुलें अुधळीं निघतील अशी भीति वाटून मुलांकरिताच ठेवलेला पैसा मुलांच्यासाठीच सांभाळावा, पण तो त्यांच्या हातीं देण्यास ते लायक झाले असा भरवसा मनास कधीच पुरूं नये, अशासारखी वृत्ति रा. ब. पाध्ये यांची बनली होती. परंतु साहित्य-परिषदेची अभिवृद्धि व्हावी हीच सदिच्छा त्यांच्या मनांत सदैव वावरत होती यांत शंका नाही. १९२७ सालानंतर परिषदेच्या अधिकारी मंडळांत फरक झाला. बाहेरील तीव्र असंतोषा-मुळे आणि कांही अंशीं रा. ब. पाध्ये यांनी नाशकास स्थलांतर केल्यामुळे परिषदेचें नवें अधि-कारी मंडळ आणि विश्वस्त पाध्ये यांच्यामध्ये मोठा खटका अुडून प्रकरण न्यायालयासमोर जाअील किंवा काय अशी भीति अुत्पन्न झाली. विश्वस्त या नात्याने पाध्ये यांनी आपलें पत्रक प्रसिद्ध करून सभासदांचा कौल मागितला, पण त्यांच्या मनाची खात्री पटविण्याजोग्या गोष्टी त्यांच्यापुढे मांडण्यांत आल्यानंतर अुभयपक्षांच्या संशयाचा निरास झाला आणि अेकमेकांना अेकमेकांच्या सदिच्छेविषयी पूर्ण खात्री पटली व तेव्हापासून या प्रकरणांतील सर्व कटुता नष्ट झाली. या वेळीं रा.ब. पाध्ये यांची मनाची सरलता आणि बुद्धीची स्पष्टता हीं सर्वांस स्वच्छपणें दिसून आलीं आणि त्यांच्या कृपणनीतीचा अुलगडा झाला. साहित्य परिषदेच्या पुणें येथील साहित्यमंदिराची कोनशिला त्यांच्या हस्तें बसविण्याचा समारंभ यानंतर लौकरच घडून आला आणि त्यामुळे पाध्ये यांच्या अंतःकरणासहि विशेष प्रसन्नता वाटली असें दिसून आलें.

रा. ब. पाध्ये यांच्या मृत्यूमुळे महाराष्ट्रांतील जुन्या पिढींतील अेक कर्तबगार, अुत्साही, अनुभवी आणि पोक्त असा संपादक, शिक्षक आणि साहित्यिक नाहीसा झाला याबद्दल सर्वत्र हळहळ वाटल्याशिवाय राहणार नाही. साहित्यपरिषदेची त्यांनी मनोभावें जी सेवा केली तिचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करून हा शोकलेख पुरा करितों.

द. वा. पो.

---

# संपादकीय



पत्रिकेच्या मागच्या अंकांत श्री. के. नारायण काळे यांनी घेतलेला वाचकांचा निरोप तात्पुरताच ठरावा अशी अनेकांची अिच्छा बाजूस सारून श्री. काळे यांनी कार्यवाहपदावर आरोहण केल्यामुळे पत्रिकेची संपादकीय जबाबदारी माझ्याकडे आली आहे. ती अंगावर घेतांना झालेल्या सन्मानापेक्षा येणाऱ्या जबाबदारीचीच जाणीव मला अधिक वाटते. सुदैवाने श्री. काळे यांनी पत्रिकेची घडी चांगली बसवून ठेवली आहे, व त्यांना साहाय्य करणाऱ्या मंडळींनी तें मलाहि करण्याचें आश्वासन दिलें आहे. पत्रिकेच्या या अंकाची जुळवाजुळव बहुतेक श्री. काळे यांनीच केली आहे, व त्यांनी घालून दिलेलें व पत्रिकेच्या वाचकांना पसंत पडलेलेंच धोरण पुढेहि चालवण्यांत येअील; व शक्य तर तिची अुपयुक्तता वाढवण्याचा प्रयत्नहि होअील. अंतरंगाचें स्वरूप याप्रमाणे स्थिर राहिलें तरी बहिरंग तसें ठेवणें संध्याच्या बिकट परिस्थितीमुळे अशक्य झालें आहे. पृष्ठांची संख्या कमी करावी लागली आहे, अेवढेंच नव्हे तर कागदाच्या व मलपृष्ठाच्या रूपांतहि फरक करावा लागला आहे. मलपृष्ठ हें नांव आता कदाचित् सार्थ झालेलें दिसेल. पण पत्रिकेच्या वाचकांच्या अुदारतेवर विश्वसण्याखेरीज दुसरा अुपाय नाही. नवीन अंकांत अेकदोन नवीन गोष्टी आल्या आहेत तिकडे वाचकांचें लक्ष जाअीलच. मराठीच्या भगिनीभापांचा संसार कसा चाललेला आहे याची वार्ता देणारीं दोन पत्रें आणि गेल्या चार महिन्यांमधील मराठीच्याच वाङ्मयसंपदेची स्थूल कल्पना देणारें अेक पत्रक वाचकांना मान्य होअील अशी आशा आहे. झाला हा केवळ आरंभ आहे. हें कार्य अधिक कसोशीने करून आणखीहि कांही अुपयुक्त गोष्टी अुत्तरोत्तर करतां येण्याजोग्या आहेत याची आम्हांस जाणीव आहे.

× × ×

परिषदेच्या पदाधिकाऱ्यांचें झालेलें स्थानांतर सभासदांस आता परिचित झालें आहेच. कार्याध्यक्षपदावर असलेले प्रा. बा. म. जोशी हे आता परिषदेच्या अध्यक्षपदावर गेले आहेत हें त्या पदास व तें अलंकृत करणारास गौरवावह व अुपकारक आहे. आजवर श्री. जोशी यांनी केलेल्या साहित्यसेवेस व परिषदेच्या कार्यास योग्य असें तें मानाचें पद आहे. व तें श्री. जोशी यांस मिळालें हें क्रमप्राप्तच झालें. पण त्यांत त्या पदाचाहि गौरव झाला हें निःसंशय. त्या पदावरून अेक तात्या निवृत्त झाले तरी तितकेच मोठे असे दुसरे साहित्यिक तात्या त्याला लाभले ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. कार्याध्यक्षाच्या अधिक दगदगीच्या जागेवरून अध्यक्षाच्या अधिक मानाच्या जागेवर जाणें हें तात्यांच्या वैयक्तिक स्वास्थ्याच्या दृष्टीने अुपकारक झालें आहे, तथापि कार्याध्यक्ष या नात्याने परिषदेच्या कार्यात विशेष लक्ष घालण्याची झालेली संवय त्यांना तटस्थ राहूं देणार नाही अशी आमची खात्री आहे. परिषदेचे अुत्साही वृद्ध तरुण चिटणीस रा. सा. जोशी हे आता कार्याध्यक्ष झाल्याने ती अधिक कार्यक्षम होअील हें कोणास सांगावयास नको. परिषदेबद्दल त्यांना वाटणारा जिव्हाळा सर्वांच्याच परिचयाचा आहे. गेलीं पांचसहा वर्षें आपला सारा वेळ आणि सारें कर्तृत्व त्यांनी परिषदेकरिता खर्च केलें याबद्दल परिषद् त्यांची सदैव ऋणीच राहील. पत्रिकेचे संपादक श्री. काळे हे आपल्या

कर्तृत्वास अधिक वाव असणाऱ्या कार्यवाहपदावर गेले आहेत. पत्रिकेप्रमाणेच तेथूनहि ते आपल्या नवीन कल्पना व्यवहारांत आणून दाखवितील अशी अपेक्षा करणें अयोग्य होणार नाही.

× × ×

गेली तिमाही महाराष्ट्रीय वाङ्मयसेवकांस वरीच घातक ठरली. मराठी भाषेचे शिल्पकार प्रा. श्री. नी. चापेकर यांच्या निधनाने मराठीचा अेक विद्वान् प्राध्यापक, जुन्या वाङ्मयाचा विचक्षण रसिक व नव्या वाङ्मयाचा निष्ठुर टीकाकार नाहीसा झाला. त्यांचे सुवर्णचंपक व अेकावली हे काव्यसंग्रह त्यांच्या कवित्वशक्तीची कल्पना आणून देणारे असले तरी मतभेदाचे विषय आहेत; परंतु त्यांनी जें लिहिलें त्याने मराठी वाङ्मयाची जी सेवा झाली तीपेक्षा ते जें बोलले व त्यांनी जें शिकविलें त्यानेच ती अधिक झाली आहे याबद्दल मतभेद होणें शक्य नाहीं. श्री. विष्णुपंत औंधकर यांचें निधन तर फारच अकाली झालें. ठराविक शिक्षणप्रणालीमधून न जातांहि मराठी नाट्यसाहित्याची सेवा त्यांनी केली. नाट्यदृष्ट्या लोकप्रिय होणारे विषय हेरून त्यांवर बहुजनसमाजावर परिणाम करणारें लेखन करणें त्यांना चांगलें साधलें. मध्यप्रांतामध्ये जाअून स्थायिक झालेले श्री. नी. व. भवाळकर हे दिवंगत झाल्याने त्यांचे मित्र बापूसाहेब चापेकर यांच्याप्रमाणेच मराठीचे रसिक टीकाकार व विद्वान् प्राध्यापक असे दुसरे बापूसाहेब नाहीसे झाले. परिषदेच्या दृष्टीने मोठी हानि तिचे विश्वस्त राव. दा. ग. पाध्ये यांच्या निधनाने झाली. अिंदूर संमेलनामध्ये परिषदेस मिळालेल्या देणगीचा परिषदेच्याच हिताकरिता अेखाद्या कृपणाप्रमाणे त्यांनी सांभाळ केला ही गोष्ट महत्त्वाची खरीच, परंतु मराठी जनतेचें वाङ्मयकार्याकडे व तें करणाऱ्या संस्थेकडे पुरेसें लक्ष नव्हतें त्या वेळीं परिषदेचाहि सांभाळ यावत् शक्य त्यांनी केला ही गोष्ट डोळ्यांआड होतां कामा नये.

× × ×

पत्रिकेचा मागचा अंक निघाल्यावर नाशिक येथील साहित्यसंमेलन निर्विघ्नपणें पार पडलें. स्थानिक अशा स्वरूपाच्या गौण मतभेदाखेरीज अितर वातावरण अेकोप्याचें व संघटनेचेंच होतें. सद्यःस्थितींत जमली अितकी मंडळीहि येतील कीं नाही अशी शंका होती. संमेलनांत संमत झालेल्या ठरावांपैकी अेका ठरावाविषयी येथे थोडें लिहावयाचें आहे. संमेलनाचा वार्षिक सोहळा जो होतो तो व्हावाच, पण त्यामध्ये होणारें कार्य विद्यावृद्धीच्या दृष्टीने भरीव होत नाही असें वाटूनच कीं काय श्री. काळे यांनी या संमेलनाशिवाय आणखीहि अेक विद्वत्परिषद् साहित्यविषयक किंवा भाषाविषयक चर्चा करण्याकरिता पुणें, मुंबअी, कोल्हापूर, नागपूर अशासारख्या ठिकाणीं परिषदेने भरवावी असा ठराव आणला, व ता संमेलनास मान्यहि झाला. अेका परीने ती परिषदेवी स्वतःच्याच कार्यावर टीका झाली. संमेलनास सोहाळ्याचें स्वरूप येरेच असून तत्त्वबोधाच्या किंवा ज्ञानवृद्धीच्या दृष्टीने त्याचा फारसा अुपयोग होत नाही असा अनुभव आल्याने अनेक विद्वान् तेथे अुपस्थित होत नाहीत असा अनुभव येतो हें खरें. कोल्हापूर, बडोदें अित्यादि ठिकाणीं संमेलनाच्या वाङ्मयीन अुपशाखांच्या बैठकीहि झाल्या. ती प्रथा अलीकडील संमेलनातून मोडली व केवळ कांही चर्चांवर वाङ्मयकार्य भागविण्यांत येअूं लागलें. त्या चर्चाहि श्रोतृवृंदाला आकर्षक कशा वाटतील या दृष्टीने विवादसभांप्रमाणे चालविण्यांत येतात, यामुळेच निराळ्या विद्वत्परिषदेची आवश्यकता भासूं लागली आहे व तिचें दृश्य स्वरूप म्हणजे वरील ठराव होय. या ठरावास अनुसरून कार्यकारी मंडळीचे येत चालू आहेत. वाङ्मयदृष्ट्या परिषदेची अुपयुक्तता वाढवण्याच्या दृष्टीने

व्याख्यानांची व प्रकाशनाची योजना कार्यकारी मंडळासमोर आहे. वाङ्मयकार्यास जवळ असणाऱ्या अितर कलांच्या पुरस्कारार्थ परिषदेला काय करितां येअील याचाहि विचार चालू आहे. परिषदेच्या घटनेंत व्यवहाराच्या दृष्टीने असणाऱ्या कांही अुणीवा दूर होणें अिष्ट असल्याने तिचाहि विचार परिषदेच्या डोळ्यांपुढे आहे. शैक्षणिक संस्थांशीं परिषदेचा संबंध वाढविण्याचा प्रयत्नहि होअील. व्याकरण व परिभाषा यांविषयींच्या समितींचें जुनें कार्य पुढे चालू राहीलच. या साऱ्या योजनांपैकी परिस्थितीच्या साहाय्याने काय प्रत्यक्षांत अुतरेल तें पाहणें आहे.

× × ×

या अंकांत दुसरीकडे द. म. सा. पुरस्कारसमितीचें पत्रक प्रसिद्ध होत आहे. या समितीच्या कार्याची अुपयुक्तता आम्हीं तरी विशद करून सांगावयास हवी असें नाही. वस्तुतः परिषदेसारख्या मध्यवर्ती संस्थेकडूनच यासारखीं कामें चालावयास हवींत. अुपरिनिर्दिष्ट समितीस आजवर ज्यांनी अुदार अंतःकरणाने आर्थिक साहाय्य केलें व पुढेहि करावयाचें ज्यांनी मान्य केलें आहे त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच. तसेंच या समितीने आपलें कार्य नेटाने चालविलें याबद्दल ती व तिचे कार्यवाह दोघेहि अभिनंदनास पात्र आहेत. समितीस अेक सूचना करावयाची ती अशी. आज तिचीं पारितोषिकें अेका वाङ्मयप्रकारांतील अेकाच वर्षे दीड वर्षाच्या अवधींत लिहिल्या गेलेल्या ग्रंथांना मिळूं शकतात. त्या कालांत प्रसिद्ध होणाऱ्या अितर प्रकारच्या वाङ्मयग्रंथांना तें मिळण्याचा केव्हाच संभव नाही. तेव्हा आमच्या मतें कादंबरी, नाटक, काव्य, टीका व शास्त्रीय ग्रंथ असे वाङ्मयाचे किंवा साहित्याचे पांच प्रकार करून अेकेका वर्षी अेकेका प्रकारांतील ग्रंथास, परंतु या पांच वर्षांच्या अवधींत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांस, तें मिळणें शक्य असावें. म्हणजे कोणताहि ग्रंथ कालव्याप्तेच्या कारणाने पारितोषिकास अपात्र ठरूं नये. पांच वर्षांत केव्हा ना केव्हा त्याची कसोटी लागून पारितोषिक मिळणें शक्य होअील. ही सूचना यंदा विचारांत घेतां न आली तरी पुढे घेतां येणें शक्य आहे.

× × ×

परिषदेचे नवीन अध्यक्ष प्रि. वा. म. जोशी यांना २० जानेवारी १९४३ रोजीं ६० वर्षे पूर्ण झालीं. याबद्दल त्यांचें औपचारिक रीत्या, परंतु मनःपूर्वक, अभिनंदन परिषदेच्या वतीने आम्ही करितों. आपल्या वाङ्मयाने अपरिचित अशा वाचकांचें व वाङ्मया-बरोबरच आपल्या संपूर्ण निरहंकारी वृत्तीने परिचितांचें मन त्यांनी ओढून घेतलें आहे. साठी अुलटूनहि बालसुलभ मोकळेपणा, निरागस विनोद, विनोदाचा विषय झालेलें सौजन्य, खऱ्या विद्वत्तेचें फल असणारी अनाग्रही वृत्ति आणि साहित्यांत तरी असलेलें त्यांचें अजातशत्रुत्व यांमुळे ते कोणालाहि हवेहवेसे वाटतात. 'स्मृतिलहरी' लिहिण्याचें त्यांचें वय झालें असलें तरी साहित्यनिर्मितीचा ताजेपणा अद्यापि कायम असल्याचें तें गमक आहे. यापुढे त्यांना आणखी साहित्यनिर्मिति करण्यास लागणारें स्वास्थ्य लाभावें अशी सर्वांचीच अिच्छा असणार. पण साहित्यनिर्मिति न झाली तरीहि तें स्वास्थ्य लाभावें असें आम्ही अिच्छितों. त्यांच्या 'सुशिलेचा देव' कोणीहि असो, तो त्यांना दीर्घायुष्य व त्याबरोबर आरोग्य देवो.

× × ×

# दक्षिण महाराष्ट्र साहित्यपुरस्कार समिति, सांगली

(प्रा. गं. गो. कानेटकर, कार्यवाह, यांजकडून)

या समितीच्या विनंतीस मान देऊन फलटण संस्थानचे उदार व सुविद्य अधिपति श्रीमन्त सर मालोजीराव निंबाळकर यांनी 'वाङ्मयसमीक्षा' या विषयावरील उत्कृष्ट ग्रन्थास रु. ५०० चें पारितोषिक देण्याचें आश्वासन दिलें.

पारितोषिकार्थ एकंदर नऊ ग्रन्थ समितीकडे आले. या ग्रन्थांच्या परीक्षणार्थ पुढे दिलेल्या सद्‌गृहस्थांचें परीक्षकमंडळ नेमण्यांत आलें.

१ प्रा. कृ. पां. कुलकर्णी, अेम्. अे., अेल्फिन्स्टन् कॉलेज, मुम्बअी.
२ ,, द. के. केळकर, अेम्. अे , रामनारायण रुअिया कॉलेज, मुम्बअी.
३ ,, डॉ. रा. ना. दांडेकर, अेम्. अे., पीअेच. डी., फर्गसन कॉलेज, पुणें.
४ ,, डॉ. रा. ग. हर्षे, डी. लिट्., डे. कॉ. रिसर्च अिन्स्टिटयूट, पुणें.
५ ,, डॉ. शं. दा. पेंडसे, अेम्. अे., पीअेच. डी., हिस्लॉप कॉलेज, नागपूर.

प्रा. रा. श्री. जोग, अेम्. अे., फर्गसन कॉलेज, पुणें, यांचा 'सौन्दर्यशोध व आनंद-बोध' हा ग्रंथ परीक्षकांच्या मोठ्या बहुमताने निःसंशय सर्वोत्कृष्ट व श्रेष्ठ प्रतीचा ठरला. हा निर्णय मान्य करून प्रा. जोग यांसच प्रस्तुत पारितोषिक देण्याचें समितीने निश्चित केलें आहे.

वरील ग्रन्थाखेरीज (१) प्रा. के. ना. वाटवे, अेम्. अे., पीअेच. डी., यांचा 'रसविमर्श' व डॉ. मा. कृ. देशमुख, अेम्. अे., पीअेच. डी., यांचा 'मराठीचें साहित्यशास्त्र' हे दोन ग्रन्थ श्रेष्ठ प्रतीचे असून मराठी वाङ्मयांत चांगल्या प्रतीची भर घालणारे आहेत असा अभिप्राय-परीक्षकमंडळाने दिला आहे.

याशिवाय (१) श्री. बा. सी. मर्ढेकर यांचा 'वाङ्मयीन महात्मता' व (२) प्रा. जोशी व माचवेकृत 'चरित्र, आत्मचरित्र व टीका' हे दोन छोटेखानी ग्रन्थहि चांगल्या-पैकी असून, लेखकांच्या यशाविषयी आशा उत्पन्न करणारे आहेत असें परीक्षकांनी म्हटलें आहे.

परीक्षकांनी परीक्षणाचें काम विनामूल्य अत्यंत कसोशीने केल्याबद्दल त्यांची व ज्यांच्या औदार्याने मराठी भाषेच्या ग्रंथसंपत्तींत प्रस्तुतची अमूल्य भर पडली आहे त्या श्रीमंत राजे-साहेब फलटणकर यांची समिति अत्यंत ऋणी आहे.

१९४३ चें श्रीमंत सांगलीकर पारितोषिक उत्कृष्ट मराठी नाटकास द्यावयाचें असल्या-बद्दलची जाहिरात पूर्वी दिलेलीच आहे. त्या पारितोषिकार्थ नाटकें पाठविण्याची मुदत ३१ मे १९४३ पर्यंत वाढविण्यांत आली आहे. जास्त माहितीसाठी पत्रव्यवहार करावा.

## १९४४ चें श्रीमंत छत्रपति कोल्हापूरकर पारितोषिक रु. ५००

कळविण्यास आनंद वाटतो की या समितीमार्फत दरसाल उत्कृष्ट मराठी वाङ्मयास देण्यांत येणाऱ्या पारितोषिकांपैकी **पांचवें** पारितोषिक श्री. महाराज छत्रपति, संस्थान कोल्हापूर, यांजकडून मिळण्याचें अभिवचन मिळालें आहे. या औदार्याबद्दल समिति कोल्हापूर दरबारची अत्यंत ऋणी आहे.

---

# गुंजीकर व्याख्यानमाला

प्राचीन मराठी वाङ्मयाची प्रथम निर्मिति जशी विदर्भ व मराठवाडा या भागांत झाली तशीच अर्वाचीन मराठी वाङ्मयाची प्रथम निर्मिति मुंबअींत झाली. आज या निर्मितीस कारणीभूत झालेल्या व्यक्ति स्मृतिशेष झालेल्या आहेत. महाराष्ट्रीयांना अभिमानास्पद वाटणाऱ्या आमच्या भव्य वाङ्मयमंदिराचा पाया सदाशिवशास्त्री छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, माभू महाजन, गोविंद नारायण माडगांवकर, हरि केशवजी, दादोबा पांडुरंग, मोरोबा कान्होबा, बाबा पदमनजी यांसारख्या ज्या कळकळीच्या भाषासेवकांनी रचिला त्यांच्या कर्तृत्वाचा पुसट सुद्धा परिचय चालू पिढीला नाही; मग गुणग्रहण तर बाजूलाच राहिलें. अशी परिस्थिति राहणें मुंबअीकरांना तरी खास भूषणावह नाही. या थोर व्यक्तींच्या व त्यांच्या काळांत निर्माण झालेल्या वाङ्मयाच्या स्मृतीला अुजाळा देण्याचें कार्य आपल्याकडून अवश्य झालें पाहिजे. त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट की ही त्या वेळच्या वाङ्मयाचा कोठेहि नसलेला संग्रह मुंबअी मराठी ग्रंथसंग्रहालयामध्ये आहे. या संग्रहाकडे लोकांचें लक्ष वेधविणें हें आपलें अेक कर्तव्यच आहे. या दृष्टीने संग्रहालयाच्या प्रथम वार्षिक समारंभाच्या प्रसंगीं मुख्य वक्ते म्हणून महर्षि रानडे यांच्या अध्यक्षतेखाली ज्यांनें व्याख्यान झालें, ज्यांच्या वाङ्मयामुळे व संस्थापिलेल्या विविधज्ञानविस्तारामुळे मराठी भाषेचे शिवाजी जे विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना लेखनस्फूर्ति मिळाली, त्यांना मराठी भाषेचे रामदास असें म्हणणें सार्थ ठरेल. त्या कै. रा. भि. गुंजीकर यांच्या लवकरच येणाऱ्या जन्मतिथीच्या दिवशीं कांही प्रयत्न करावा असें आम्हांस वाटत आहे. ही जन्मतिथि रामचंद्र भिकाजी गुंजीकर व्याख्यानमाला गुंफून साजरी करावी असें आम्ही ठरवीत आहोंत.

रा. भि. गुंजीकर व्याख्यानमालेचें स्वरूप पुढीलप्रमाणे राहील. या मालेंत सन १८०० ते १८६७ म्हणजे विविधज्ञानविस्तार स्थापन होअीपर्यंतच्या मराठी वाङ्मयाचा परामर्श घेणारीं निरनिराळ्या विद्वानांकडून व्याख्यानपुष्पें गुंफण्यांत येतील. हीं सर्व व्याख्यानें निबंधरूपाने आधी लिहून घेअून तीं शक्य तितकीं लवकर छापून ग्रंथरूपाने प्रसिद्ध करण्याचा मुख्य अुद्देश आहे. यापुढील वाङ्मयविभाग म्हणजे अि. स. १८६७ पासूनचा ठराविक कालखंड बाळशास्त्री जांभेकरांची पुण्यतिथि १९४६ सालीं येते त्या वेळीं अशाच स्वरूपाने तयार करावयाचा आहे. तसेंच त्याच्यापुढील कालखंड १९५० सालीं मराठीचे शिवाजी धाकटे चिपळूणकर यांच्या जन्मतिथीचे निमित्ताने हातीं घ्यावयाचा आहे.

अशा प्रकारें 'दि केंब्रिज हिस्टरी ऑफ अिंग्लिश लिटरेचर'च्या धर्तीवर हळूहळू आधुनिक मराठी वाङ्मयाचा अितिहास निर्माण व्हावा असा आमचा हेतु आहे.

अुपरिनिर्दिष्ट व्याख्यानमालेची योजना संग्रहालयांत पाहावयास मिळेल. ही योजना यशस्वी करण्यास आमच्या व्यासंगी विद्वानांनी मदत करावी अशी त्यांस विनंती आहे. अुपरिनिर्दिष्ट कालखंडांतील वाङ्मयासंबंधी अधिक माहिती अगर सूचना कोणास करावयाच्या असतील त्यांनी त्या संग्रहालयांत कराव्या अगर मुंबअींतील जुन्या वाङ्मयसेवकांच्या कृति अगर त्यांसंबंधी माहिती ज्या कोणाकडे असेल त्यांनी ती संग्रहालयास पुरवून या महत्त्वाच्या वाङ्मयकार्यास मदत करावी अशी सर्वांस नम्र विनंती आहे.

ता. २०।१०।४२.
संग्रहालय कचेरी, मुंबअी नं. २.

अ. वा. गजेंद्रगडकर
अध्यक्ष, व्यवस्थापक मंडळ,
मुंबअी मराठी ग्रंथसंग्रहालय.

(पुढील मजकूर कव्हर पान ३ वर)

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.






